


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




**संपादक**
डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

**रचना**
हर्मिष देव्हारे

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुखपृष्ठावरील चित्र**
प्रख्यात इंग्लिश लेखक
जोसेफ कॉनरॅड यांचे.

**मुद्रण व मुखपृष्ठ छपाई**
सौ. रूपा नाशिककर
श्रेयस डिझायनर्स अँड प्रिंटर्स,
ठाणे.

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२.

# तपशील

अंक १२ खंड २ २०००

## अनुक्रमणिका

**लेखकाचा परिचय**

डॉ. आल्फ्रेड डोएब्लीन
- विष्णु सदाशिव ब्रम्हे

**लेखकाचे विचार आणि त्याचे साहित्य**

रात्र आणि धुके
- डॉ. मंगला सरदेशपांडे

**लेखक आणि त्यांच्या कादंबरीतील व्यक्ती**

जोसेफ कॉनरॅड – अलमायेर्स
फॉली-तील सांम्बीर
- नाना जोशी

**निमित्त**

हेमिंग्वेचे अखेरचे शब्द
जे त्यानं लिहिले होते, आणि
जे त्यानं लिहिले नव्हते
- अ. ना. महाशब्दे

**साहित्य-कल्पित-वास्तव**

क्लिओपात्रा
- डॉ. मीना वैशंपायन

**नोंदवही**

तळटीप
- सौ. सुमती जोशी





## संपादकीय

तपशीलच्या या अंकात प्रख्यात जर्मन लेखक डोएब्लीनचा परिचय वाचावयास मिळेल. हा लेखक युरोप, अमेरिकेत विख्यात असला तरी भारतात त्यांचे नाव कोणी ऐकलेले नाही. सेलीन या प्रख्यात फ्रेंच लेखकाचे अनुभव त्याच्या साहित्यात कशा प्रकारे डोकावतात हे 'रात्र आणि धुके' या लेखात आहे. कॉनरॅड यांच्या पहिल्या कादंबरीतल्या व्यक्तींचा शोध मराठी वाचकास नवा अनुभव देईल. 'निमित्त' मध्ये हेमिंग्वेचे अखेरचे शब्द या विषयी अ. ना. महाशब्दे यांनी लिहिले आहे. क्लिओपात्राचे चौथे प्रकरण आणि तळटीपेचा उगम केव्हा व कोठे झाला, व त्यात काय स्थित्यंतरे होत गेली हे ही या अंकात आहे. रसिक वाचकास हे साहित्य पसंत पडेल अशी अपेक्षा आहे.

तपशीलचा हा बारावा अंक. या अंकाबरोबर वर्गणी संपली आहे यांची नोंद वर्गणीदारांनी घ्यावी आणि आपल्या वर्गणीचे नूतनीकरण करावे अशी विनंती आहे. चित्रकार कराडकर आणि चित्रकार हर्मिष देव्हारे यांनी रचना व मुखपृष्ठ तयार केले. श्री. अभिजित पंडित यांनी सुबक छपाई करून दिली. सौ. प्रतिभा टिल्लू, श्री. विष्णु सदाशिव ब्रम्हे, श्री. श्रीकृष्ण कामत, श्री. बाळ शुक्ल, श्री. अ. ना. महाशब्दे या लेखकांनी लेखन सहाय्य केले. श्री. सांगलीकर, श्री. डी. एस. ठाकूर, श्री. रायकर, श्री. धिरजलाल शहा, श्री. गोळवलकर यांनी वर्गणीदार मिळवून दिले.

MOORSTOWN NEW JERSEY येथील ELEANOR KELEMEN एलनॉर केलेमन यांनी तपशीलसाठी अनेक पुस्तके पाठविली.

या सर्वांचे आभार.

- नाना जोशी

## 'तपशील'चा तपशील

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-
* (६ अकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात अकराव्या अंकापासून वर्गणी पाठवली तरी नवव्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.

अनुक्रमणिका

# लेखकाचा परिचय

## डॉ. आल्फ्रेड डोएब्लीन

– विष्णू सदाशिव ब्रह्मे

श्रेष्ठ जर्मन कथा-कादंबरीकार थॉमस मानन‌ं डॉ. ऑल्फ्रेड डोएब्लीनच्या संदर्भात म्हटलं होतं की तो 'जर्मनीच्या बौद्धिक चळवळींमध्ये अग्रस्थान वाटेवर' आहे. मानचे हे उद्‌गार आहेत १९२९ मधील. याच वर्षी त्याला साहित्याचे नोबेल पारितोषिक मिळालं होतं. तर ते पारितोषिक ज्याला मिळू शकेल असा एकमेव जर्मन उमेदवार म्हणून डोएब्लीनचं नाव घेतलं जात होतं. यावेळी त्याचं वय होतं एकावन्न. नुकतीच 'बेर्लीन अलेक्झांडर प्लाट्झ' ही त्याची अत्यंत यशस्वी कादंबरी प्रकाशित झाली होती. आजही बर्लीन या शहराची 'युलिसिस' म्हणून ती मानली जाते. बऱ्याचशा समकालीन समीक्षकांचं एकमत होतं की त्यानं अत्यंत महत्त्वपूर्ण अशी महाकाव्यसदृश जर्मन कादंबरी लिहिली आहे. या कादंबरीने 'या शतकाच्या महान साहित्यिका'मध्ये त्याला मानाचं स्थान मिळवून दिलं आहे. तो एक 'प्रेषित' आणि 'द्रष्टा' होता. ज्यानं साहित्यक्षेत्री 'एक नवीन भाषा' निर्माण करण्यात यश संपादन केले होतं, स्वत:ची अशी वेगळी वाट चोखाळली होती. त्याचं उदाहरण समोर असल्या-असल्यामुळं आपल्याला त्यापासून बराच लाभ झाला अशी थोर जर्मन नाटककार बर्टोल्ट ब्रेख्तनं कबुली दिलेली आहे. आर्थर कोएस्लर या ख्यातनाम साहित्यिकानं म्हटलं आहे की टॉलस्टॉय व फ्लोबेर यांच्याकडून तो जेवढं शिकला त्याहून कितीतरी अधिक पटीनं तो डोएब्लीनकडून शिकला. गुंटर ग्रास या आधुनिक महान कादंबरीकारानं आपल्या वाङ्मशीन पूर्वजांविषयी बोलताना म्हटलं आहे, केवळ डोएब्लीनला त्याचं उचित स्थान देण्यासाठी मान, ब्रेख्त, काफ्का यांना आदरपूर्वक बाजूला करायला हवं, आपल्यावरील त्याचं ऋण महत्त्वाचं आहे. त्याहून विशेष म्हणजे त्याच्या लिखाणात आढळणारं 'फ्युचरिस्ट एलमेंट'. त्यावाचून 'माझ्या गद्याचा विचारच मी करू शकत नाही' ग्रासनं जाहीरपणे सांगितलं आहे की 'मी त्या डोएब्लीनचा वारसा घेतलेला आहे. ज्यानं... इतिहासाकडे एक 'ॲब्सर्ड' प्रक्रिया म्हणून पाहिलं होतं.'

पण वाङ्मयीन इतिहासातील 'ॲब्सर्डिटी' अशी की डोएब्लीनचं नाव जर्मन भाषेचे वाचक नसलेल्या युरोपिय वाचकानाही आजही अज्ञातच आहे. मग मराठी वाचकांबद्दल बोलावयास नको. त्याच्या प्रमुख साहित्यकृतींपैकी एकच इंग्रजीमध्ये भाषांतरित होऊन प्रकाशित झाली. 'अलेक्झांडर प्लाट्ज, बर्लीन'. १९३१ मध्ये ती इंग्रज भाषिक वाचकांसमोर आली, पटकन विसरलीही गेली. गचाळ भाषांतर हे याचं एक कारण. एखाद्याला वाटेल तो एकाच कादंबरीचा लेखक होता की काय ! नाही. विसाव्या शतकातील सर्व जर्मन

साहित्यिकांमध्ये विपुल आणि विविध प्रकारचं लेखन त्याच्या एवढं करणारा विरळा. तो एक चतुरस्त्र लेखक होता. अत्यंत वाचनीय अशा आविष्कारवादी कथा, कादंबरीका, अर्धा डझन कादंबऱ्या, नाट्य व साहित्य यांच्या समीक्षालेखांचा एकेक संग्रह, राजकीय निबंध, उपहासिका यांचे बरेच संग्रह, प्रवासवर्णनं, मुक्तछंदामधील एक कादंबरी, नाटकं, रेडिओ आणि चित्रपट यांच्यासाठी 'स्क्रिप्ट' इ. बरेच लिखाण त्याच्या नावावर आढळते. त्याच्या साहित्याची समग्र सूची लुई ह्यूजनेटनं परिश्रमपूर्वक तयार करून १९७२ मध्ये ती प्रसिद्ध झाली. २७४ पृष्ठांच्या या सूचीत जवळजवळ तीनेक हजार पुस्तकांच्या नोंदी आहेत. त्यानं लिहिलेली आणि त्याच्यावर लिहिली गेलेली. त्याच्या काळात साहित्याच्या क्षेत्रात डॉ. काफ्का, डॉ. टुचोलस्की, डॉ. बेंजामिन यासारखी नावं आढळतात. पण डॉ. डोएब्लीन हा त्यापैकी एकमेव खराखुरा डॉक्टर. बर्लीनच्या एका बकाल जिल्ह्यातील एका गावी त्यानं आपला दवाखाना थाटला होता. आपला व्यवसाय सांभाळून फावल्या वेळात त्यानं लेखन केलं; ट्रेनमध्ये, पेशंट्सची वाट पाहात असताना, हॉस्पिटलच्या इमर्जन्सी वॉर्डमध्ये रात्रपाळी करताना, 'कॅफे ग्रूम्पेर्ट'मधील एखाद्या टेबलावर तिथल्या कोलाहलाच्या संगीतात. इतरांहून आणखीन एका बाबतीत तो वेगळा होता. तो कामगार वर्गातून आला होता. त्या वस्तीच्या काळोख्या अरूंद रस्त्यांमधून बरीच वर्ष तो चालला होता. घराबाहेरील अंगणं आणि त्यामागे पसरलेल्या आवारांच्या कडेकडेनं रहायची जागा अगदी आतल्या बाजूला. भयानक जिने गिरगांवातल्या काही जुन्या चाळीची आठवण देतील अशी अगदी खालच्या दर्जाची घरं. कवींना ग्रहण लागेल असं वातावरण. 'शहराच्या पूर्वेस, बिना-खिडकीच्या खोलीत वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंत मी झोपत होतो, एका अंथरुणावर, माझ्या भावाबरोबर.'

बाल्टिकवरील स्टेटिनच्या बंदराच्या परिसरात १० ऑगस्ट १८७८ रोजी डोएब्लीनचा जन्म झाला. त्याचे वडील कस्टममध्ये शिंपी होते. पोलंडमधून त्यांनी जर्मनीत स्थलांतर केलं होतं, आणि डोएब्लीनची समज होती की, मानवजातिशास्त्रानुसार, स्थलांतरचा तो बळी होता. त्याची सारी मूल्यं विकृत आणि हिणकस होती. आल्फ्रेड दहा वर्षांचा असताना त्याचे वडील हेनरिएट्टनामक एका मुलीबरोबर अमेरिकेस पळून गेले. ही मुलगी कपडे शिवण्याच्या दुकानात कामाला होती. या घटनेनं डोएब्लीनला आयुष्यभर पछाडलेलं होतं. आपला बाप आपल्या बायकोपोरांना वाऱ्यावर सोडून पळाला याची चीड त्याला होती पण त्याच्याबद्दल त्याला काही प्रमाणात सहानुभूतीही वाटत होती. 'तो माणूस जगत होता पण अत्यंत अस्वस्थपणे. स्टेट्टिनमधील स्त्रियांची विभिन्नता आणि उदार मनोवृत्ती यांचा शोध त्याला लागला होता.... जगात जिथं लाखो स्त्रिया आहेत; एखाद्या माणसानं स्वत:च्या बायकोच्या प्रेमातच का राहावं, एवढ्या स्त्रिया असताना? फ्राऊ डोएब्लीन ही एक कणखर बाई होती. परिस्थिती समजावून घेण्यास असमर्थ. आपले न्याय हक्क जपणारी, हक्क गाजवणारी. यातच एका शोकांतिकेची बीजे होती.'

तिच्या नवऱ्यानं पलायन केलं. त्याच्या बायकोच्या नातेवाईकांवर त्याच्या कुटुंबाचा भार टाकून. रांगडा माणूस. 'एका रात्रीत त्यानं आम्हा साऱ्यांना दारिद्र्यात ढकलून दिलं आणि आम्हाला कंगाल बनवलं.' तरीदेखील या चुकारतट्टू बापाबद्दल आदर न बाळगणं त्याला अवघड जात होतं. तो त्याच्याप्रमाणचं चतुरस्त्र होता. शिवणकामाव्यतिरिक्त चित्रं काढणं, व्हायोलिन आणि पियानो वाजवणं, संगीतरचना करणं आणि कविता रचणं यात त्याला बऱ्यापैकी गती होती. त्याच्या आईची बुद्धी केवळ व्यावहारिक गोष्टींपुरतीच चालायची. कर्जफेडीचं ओझं तिच्या शिरावर होतं. कला, साहित्य वगैरे गोष्टींना तिच्या व्यावहारिक जगात स्थान नव्हतं. 'माझं पहिलं वहिलं लिखाण तिला दाखवण्याची हिम्मत मला नव्हती, छातीच झाली नसती माझी.' त्याची पुस्तके प्रकाशित होऊ लागल्यानंतर तिनं त्याला विचारलं : 'कशाला करतो आहेस तू हे? तुला तुझा व्यवसाय आहे.' तिला म्हणायचं होतं त्याचा व्यवसाय वैद्यकीय आहे, साहित्यसेवा नव्हे.

डोएब्लीनला काही काळ शाळा सोडावी लागली होती. त्यानंतर त्याला शिष्यवृत्ती मिळाली व तो 'ह्यूमॅनिस्टिक जिम्नॅशियम'मध्ये दाखल झाला. शाळेचा त्याला तिटकारा होता. कारण तिथं त्याचा 'आत्यंतिक छळ' करण्यात येत होता. तिथले शिक्षक सरकारी मंत्र्यांच्या तोऱ्यात वावरत. 'एक बंडखोर आणि उपद्रवी म्हणून मला वागणूक मिळत होती. अठराव्या वर्षीही मी मार खाल्ला आहे. विसाव्या वर्षी मला 'पनिशमेंट बेंच'वर बसवण्यात आलं होतं.. एकदा, माझ्या पुस्तकात जेव्हा कांट आणि शोपेनहॉअर आढळून आले तेव्हा असल्या गोष्टींवर वेळ घालवणं थांबव असं प्राध्यापकानं मला सांगितलं.' बंडखोर पोरगा म्हणून त्याला वागणूक दिली जात असली तरी तो पुन:पुन्हा सांगतो त्याचा पिंड बंडखोराचा नव्हता. काय होतं, तो स्वत:च्या विश्वात नेहमी रंगून गेलेला असे. क्लाईस्ट आणि हायलडेरीन हे त्याचे आत्मिक धर्मपालक होते.' त्याचे डोळे अधू तरीही वाचनाचा अतोनात नाद. 'मी पुस्तकं वाचत होतो.... ज्याप्रकारे एखादी ज्योत काष्ट "वाचते" '. नित्शेचं 'जीनिअलजी ऑफ मॉरल्स' आणि डोस्टोएवस्कीच्या कादंबऱ्या त्याच्या हाती आल्या. 'आमच्या प्रारंभीच्या दिवसांच्या सपक, टुकार साहित्यामधून बाहेर कुणी उचललं असेल तर ते केवळ या रशियनांसारख्या जबरदस्त, लोकोत्तर साहित्यिकांमुळं !' त्याचं वाचन चौफेर परंतु ज्यू संस्कृतीविषयक साहित्य त्यानं थोडसंच किंबहुना काहीच वाचलेलं नव्हतं :

'कुटुंबात आमचा ज्यूपणा फारसा नजरेत भरण्याजोगा नव्हता. बाहेर ज्यूविरोधाची झळ लागायची आणि मी ती धरून चाललो होतो.... शाळेत प्रॉटेस्टंट धर्मीय शिक्षणाच्या वर्गात आम्ही सहभागी होत नव्हतो आणि ज्यूसाठींचे वर्ग अनियमित आणि बरेचसे ऐच्छिक होते... मी थोडसं हिब्रू शिकलो, परंतु मी ते तडीस नेऊ शकलो नाही. नाहीतरी परकी भाषांचा पोकळ फॉर्म्युला मला उबग आणत असताना लॅटिन, ग्रीक आणि फ्रेंच यांच्या बरोबरीनं हिब्रू मी शिकावं यात काय हशील? 'इेलियड' आणि 'ओडिसी' एड्डा, निबेलुंग आणि गुडूँ

'सागा' अभ्यासल्यानंतर इस्त्राएलच्या जमातीच्या प्राचीन इतिहासाबद्दल मला तसं स्वारस्य नव्हतं, जी जमात पुढील काळात विरून गेली, जिची पांगापांग झाली.... माझी आई हिब्रू वाचू शकत होती आणि सणासुदीलाही काबाडकष्ट उपसणारी ही स्त्री– आमच्यासाठी ती एवढं करत असे की वर्तमानपत्र वाचायलाही तिला फुरसत मिळत नसे — खोलीच्या एखाद्या कोनाड्यात आपल्यातच शांतपणे बसून असायची, तिच्या हातात एक पुस्तक, हलक्या आवाजात हिब्रू वाचत असायची, हे पाहाणं काळजाला हात घालत असे. क्वचित प्रसंगी हे केवळ पुटपुटणं असायचं. जेव्हा जेव्हा ज्यूंच्यांबद्दल मी विचार करतो. तेव्हा तेव्हा माझ्या आईचं हे चित्र माझ्या नजरेसमोर येतं. आम्हा मुलांसाठी तिची धावपळ चालायची, त्यात ती अतोनात दमून जायची. .... नंतर आली पार्किन्सनची व्याधी आणि आमच्या पालकाची भूमिका पार पाडणाऱ्या सर्वात थोरल्या भावाच्या घरी तिचं निधन झालं. तिच्या थडग्यावरील दगडावर आम्ही खोदून घेतलं : ''प्रेम कधीच संपुष्टात येत नाही.'' मुकाटपणे खोलीत बसणारी, हातात पुस्तक आणि प्रार्थना करणारी अशी ही स्त्री, तिच्याशी माझ्या काळजाचे अनुबंध गुंतले होते.'

जिम्नॅशियमच्या अखेरच्या वर्षी डोएब्लीननं गंभीरपणे लिहायला सुरूवात केली. तो वापर करत असलेल्या भाषेच्या अधिकाराबाबत त्याला यत्किंचितही अपराधी भावना नव्हती, आणि अगदी प्रारंभापासून सराइतागत तो तिचा वापर करायचा. 'माझ्यामध्ये ती संथपणे खळबळ करते, श्वासोच्छ्वास करते. जणू काही माझ्यात खोलवर संगीताची धून सुरू झाली असल्यागत. झाडामधील एक हलकिशी गुणगणु. विस्तारित जाणाऱ्या शक्तीला स्वभाषा शोधण्याची इच्छा असते....' त्यानं शोपेनहॉअर आणि स्पिनोझा वाचला होता. पण बर्लिन विद्यापीठात वैद्यकशास्त्राच्या विद्यार्थी म्हणून 'माझ्या आत्मिक जन्माच्या वेळी सुईणीची भूमिका पार पाडू शकेल असा मला कुणी आढळला नाही. ती भूमिका पुढं पार पाडली हेवाथ वॉल्डन आणि त्याचे मित्र यांनी. त्यांचा अड्डा जमायचा' काफे डेस वेस्टेन्स'मध्ये. यात एल्से लास्केर श्यूलर ही ज्यू कवयित्री सहभाग घेत असे. तिनं त्याच्या 'अत्यंत तरल संवेदनाशील तेथे त्याचे तोंड भरून कौतुक केलं होतं.' ''कॅफे मेगॅलामॅनिया'' मध्ये आम्ही त्या काळातील बूर्झ्वांच्या दैवतांची खिल्ली उडवत असू, गेरहार्ट हॉप्टमान आणि त्याच्या बोगस परिकथा आणि स्टेफन जॉर्जचे पारंपारिक पद्धतीचे वाङ्मयीन आळोखेपिळोखे. १९१० मध्ये वॉल्डननं 'देर स्टुर्म' हे आविष्कारवादी मासिक सुरू केलं आणि डोएब्लीनचे निबंध, लघुकथा तो आवर्जून प्रसिद्ध करू लागला.

एव्हाना डोएब्लीननं त्याचं वैद्यकीय शिक्षण पूर्ण केलं होतं. पदवीसाठी त्यानं सादर केलेला प्रबंध ६० पानी होता आणि त्याचा विषय होता : 'लॉस ऑफ मेमरी इन पेशंट्स विथ कोर्साकोफ्फ सायकोसिस.' पदवी संपादन केल्यानंतर 'बेर्लीन-बुखं-सायकियाट्रिक हॉस्पिटल'च्या स्टाफमध्ये दाखल झाला. काही वर्षातच त्यानं 'हिस्टेरिया','मेलँकोलिया'

आणि 'केमिस्ट्री ऑफ ब्लड' यावर शोधनिबंध लिहून प्रसिद्ध केले. त्याच सुमारास त्यानं एक नाटक लिहिलं. यात पारंपारिक प्रारंभानंतर, लेखकाच्या विरोधात बंड करणारे नट रंगमंचावरून दिग्दर्शकाची हकालपट्टी करतात आणि प्रक्षोभक आणि रक्तपीपासू निष्कर्षात नाटकाची अखेर होते.

इटालियन फ्युचरिस्ट पेंटिंग्जची जर्मनीला तोंड ओळख करून देण्यासाठी फिलिप्पो तोम्मासो मारिनेत्ती १९१२ मध्ये बर्लिनमध्ये आला होता. डोएब्लीनला चित्रं आवडली. 'काफे डालबेल्ली'मध्ये दोघांची भेट झाली. या समयी त्यानं मोरनेत्तीला सांगितलं की फ्युचरिझममध्ये एक नाविन्यपूर्ण झेप आहे, मुक्ततेमध्ये परिणती होणारी ही झेप आहे. अभिनिवेशयुक्त, धाडसी, बेबंद. 'साहित्यातही अशा प्रकारचं आमच्यापाशी काहीतरी असायला हवं !' मारीनेत्तीनं स्वत:चं 'टेक्निकल मॅनिफेस्टो ऑफ फ्युचरिस्ट लिटरेचर' त्याच्या हाती दिलं. त्यात संगीनी आणि femmes fatales फाम फाताल सारख्या लक्ष-वेधी मशीनगन थरारलेल्या खंदकासंबंधीचं नित्याचं चिंतन होतं, शब्दविन्यास (syntax) आणि क्रियाविशेषणं यासारख्या गोष्टींची हकालपट्टी केलेली होती. डोएब्लीनला हे रूचलं नाही. त्यानं Der Strum (देर स्ट्रुम) मध्ये एक अनावृत्त पत्र लिहून मारिनेत्तीचा खरपूस समाचार घेतला. लिहिलं की त्याचा हा प्रयत्न म्हणजे न्हाण्याधुण्याच्याटब साबणासकट बाळाला फेकून देणं. 'तुम्ही असं सांगू शकत नाही की केवळ एकच वास्तव असतं आणि तुमच्या मोटारगाड्या, विमानं आणि मशीनगन याचं जग वास्तव जगाशी सुरू आहे.' या वाग्युद्धातील त्याच्या शरसंधानावर Guillaume Apollinare (गुईल्लोम आपोल्लीनार) भलताच खूष झाला. या फ्रेंच कवीनं पॅरिसहून त्याला मोडक्यातोडक्या जर्मनीत पत्र धाडलं. 'अतिशय उत्कृष्ट होता तुझा लेख. अभिनंदन करतो मी तुझं. डोएब्लीनवाद चिरायू होवो !'

डोएब्लीनला वाटत होतं, आधुनिक साहित्य सीधंसाधं असावं पण बिनडोक नको. साहित्यिकांसाठी त्यानं तयार केलेल्या 'बर्लिन प्रोग्राम'मध्ये आवाहन केले होतं,'सुंदर' लिखाणाचं सौंदर्यशास्त्र आणि मनोदर्शनात्मक कादंबरीचं आत्मकेंद्रित्व यांचा त्यांनी अव्हेर करावा, ते मोडीत काढावं. नवीन कादंबरी काटेकोरपणा आणि वस्तुनिष्ठता याबाबतीत 'सिनेमॅटिक' असायला हवी : 'पत्थर आणि लोह याहून अन्य असा तिचा दर्शनीभाग – 'फसाड'– असणं शक्य नाही.' अन्य कादंबरीकार स्वत:विषयी लिहिणं थांबवणार होते आणि महाकाव्यसदृश्य कथाकथनाची कला पुनरूज्जीवित करण्यासाठी त्याच्या गतिफँटसीचा (कायनेटिक फँटसी) वापर करणार होते.

डोएब्लीन स्वत: अशा कादंबरीच्या लेखनात गुंतलेला होता. एव्हाना आविष्कारवादी कथाचे दोन संग्रह त्याच्या नावावर होते, त्याची लेखणी अशा लेखनाला सरावली होती. 'द थ्री लिप्स ऑफ वांग लुन'चा प्रारंभ चिनी कोळ्याच्या मुलाच्या 'सच्चे दुर्बल' या अहिंसक पंथाच्या स्थापनेनं आणि त्यानं प्रतिनिधित्व केलेल्या अयशस्वी शेतकरी उठावानं तिची

अखेर होते. ही कादंबरी म्हणजे गतिफँटसीमधील एक सर्वोत्कृष्ट कलाकृती. Breisgau (ब्रइसगो) मधील Freiburg (फ्रिबुर्ग) सोडून डोएब्लीन कुठंच कधी बाहेर गेला नव्हता. परंतु चिनी वातावरणनिर्मिती एवढ्या बारीकसारीक तपशीलानं केलेली होती की, 'सिनोलॉजिस्ट'ही प्रभावित झाले होते. म्युझियम आणि ग्रंथसंग्रहालय इथून त्यानं माहिती गोळा केली होती, पुस्तकांमध्ये स्वत:ला बुडवून घेतलं होतं. यावाचून गत्यंतरच नव्हतं. त्याच्या व्यक्तिगत आयुष्यात गोंधळ माजला होता : एका तरूण नर्सनं त्याच्या मुलाला जन्माला घातले होतं. एर्ना Reiss (रिस्स) या वाग्दत्तवधूशी खटके उडत होते, वाङ्‌निश्चय मोडण्याचे विचार चमकून जात होते, उबग आला होता. वाङ्‌निश्चयाच्या पार्टीला जेव्हा त्याला काहीतरी गायला सांगण्यात आलं– त्याचा आवाज चांगला होता आणि त्याला पियानो वाजवता येत होता– तेव्हा त्यानं सुरू केलं : 'ओ डेथ दाऊ आर्ट स्वीट.' या अशा कठीण समयी, मी हरवून बसलो आहे ही भावना, अखेरी. एक जाडजूड चिनी कादंबरी लिहिण्याकडे मी वळलो.'

'वांग लून'वर त्यानं काम करायला सुरूवात केली. तेव्हा चिनी प्राणी, झाडंझुडपं, रत्नं, परिसर, शहरं, लोकसाहित्य, धार्मिक विधी, पुजाऱ्यांचा पेहराव, नृत्यं, खेळ, संगीत वाद्यं ; किताब, शासकीय यंत्रणेची रचना आणि 'मँडरिन'च्या परीक्षा देण्यासाठी आवश्यक असणाऱ्या गोष्टी, शतप्रासादातील तृतीय पंथी शिष्टाचार ; मिंग आणि चिंग या घराण्यांच्या म्हणी आणि कविता, आणि असं बरचं काही त्यानं काळजीपूर्वक नोंदवून ठेवलं. ही सारी मूलतत्त्वं निवेदनात एवढ्या खुषीनं एकजीव झाली की, गद्याचं पोत 'शेजवान' पोलादागत टणक झालं होतं. त्याचबरोबर लेखक आणि विषय यामध्ये प्रचंड मानसिक अंतर राखलं गेल्यानं एकूणच कामकाजाला एखाद्या बेजिंग ऑपेराचं स्वरूप प्राप्त झालं होतं. 'एखाद्या चेटकिणीची कला ; दैवी शक्ती प्राप्त असलेल्याचं काव्य' अशा शब्दात समीक्षक वॉल्टर Musch (मुश)न प्रस्तुत कादंबरीचा गौरव केला होता. जर्मन साहित्यातील ही पहिली श्रेष्ठ कादंबरी ज्यात विपुल पात्रांचा प्रचंड भरणा आहे. कादंबरी-लेखनात अष्टांगी बुडून गेल्यानंतरच तिचा अंतस्तरीय अर्थ त्याच्या ध्यानी आला, एका खर्ड्याच्या मागील बाजूला त्यानं नमूद केलं की, भटक्या चिनी बहिष्कृतांच्या कथेआड उडला आहे. 'एक हिब्रू विषय ज्यूंची हद्दपारी. जनसमुदाय एक व्यक्ती म्हणून.'

प्रसंगावशात्, वांग लूनच्या तीन 'झेपे'पैकी एक झेप आहे, स्वत:ला आणि 'सच्च्या दुर्बळां'च्या समाजाला झगड्याविना नामशेष होऊ न देण्याचा त्यानं घेतलेला निर्णय आपल्या असंख्य अनुयायांपैकी एकाला तो सांगतो : 'सम्राटानं एक फतवा काढला आहे की आमचं संपूर्ण निर्मूलन करण्यात यावं ;' विचारतो : 'पण कोण आहे हा सम्राट? हां, आहे काय ते, "सम्राट"? मला ठाऊक आहे, विजेच्या लोळामध्ये, पाण्यात, बीचवृक्षाखाली माणसांचा जीव घेतात; कोसळलेल्या कड्याखाली एखादा चिरडून जाऊ शकतो; शिवाय पूर, आग आणि हिंस्त्र श्वापदं, साप हे सुद्धा आहेत आणि राक्षस, ते सारे आमचा जीव घेऊ





अनुक्रमणिका

शकतात. त्यांच्यापासून स्वत:चं रक्षण करायचं म्हटलं तरी तसा एखादा मार्ग सापडणं मुष्किल. पण आहे कोण हा "सम्राट"? ऐकिवात नसलेल्या सम्राटाचं हे निर्लज्ज धार्ष्ट्य, आम्हाला जीवे मारायचं, हे न्याय्य कसं काय? 'सच्च्या दुर्बळांचं हे प्राक्तन आहे हे मी अमान्य करतो मी स्वत:हून विषप्राशन करणार नाही. त्यांना अव्हेरणार आहे. आमची जमात या भूतलावर जगत आहे, जे आमच्या मालकीचं आहे.'

'वांग लून' ही एक राजकीय दृष्टांतकथा आहे आणि प्रामुख्यानं एक संगीतमय पुस्तक. डोएब्लीननं एक खासगी पौर्वात्य जग निर्मिलं, इथं ल्यूट आणि झिथर या वाद्यांच्या साथसंगतीत बायका पंचम स्वरात 'मेलडी' गातात; 'स्वरांनी भरून टाकलेलं, भरती-ओहोटीच्या लाटेगत गुणगणाऱ्या तारा, कुजबुजणाऱ्या, स्वर चढत जातात, वाटतं, संगमरवरी फरशीवर मौक्तिकांची बरसात होत आहे.' प्रस्तुत कादंबरी एक 'सिंफनी' म्हणून रचण्यात आलेली आहे', जग आणि जीवन यांच्यागत वैश्विक आणि न संपणारी.' डोएब्लीननं एका ठिकाणी म्हटलं आहे,'जग स्वरात विचार करते.' 'निसर्गाच्या नादानं' भरून गेलेल्या अफाट अवकाशाबद्दल त्याला ओढ होती. कवी अर्न्स्ट ब्लाझ यानं १९२२ मध्ये डोएब्लीनवर प्रथमच महत्त्वपूर्ण निबंध लिहिला. त्यानं म्हटलं आहे की चिनी कादंबरीमध्येही 'सर्वेश्वराच्या धार्मिक प्रांताबद्दलची' गूढ ओढ एखाद्याला सापडू शकेल; दारूबाज बॅकसच्या पौर्वात्य उत्सवात एखाद्याला सुप्त 'ॲश वेन्स्डे'ची (ख्रिस्ती लोकांच्या 'लेंट' नावाच्या ४. दिवसांच्या उपवासाचा पहिला दिवस) प्रचिती येईल. 'लांग लून' वाचून नाटककार बर्टोल्ट ब्रेख्तही प्रभावित झाला होता. ती वाचून संपवल्यानंतर त्यानं त्याच्या डायरीत नोंद केली आहे : 'सगळ्याच गोष्टींना गतिमान करण्यात आले आहे. माणसांचे एकमेकांबरोबरचे संबंध समोर आणले आहेत. ऐकिवात नसलेल्या पारदर्शकपणानं; like a virtuoso he draws all the gestures and expressious into the psychology and removes everything that is merely scholarly.'

'कला' आणि 'संस्कृती' याविषयी त्याला फारशी आस्था नव्हती. तो म्हणतो, 'मी साहित्याला तुच्छ लेखतो', खास करून अलंकारिक, सौंदर्यशास्त्राला प्रमाण मानणारं, कारागिरीचा बडेजाव माजवणाऱ्या संप्रदायांचा– 'आम्हाला गरज नाही सौंदर्यीकरणाची, नाही सुशोभीकरणाची, नाही शैलीची, पृष्ठभागावर काहीही नको, फक्त काठिण्य, गारठा आणि आग, मृदुत्व, अनुभवातीत आणि पृथ्वी हादरवणारं, वेष्ठणाच्या कागदाविना. ग्रीक रोमन ग्रंथांना वेष्ठण लागतं.' हेच त्याच्या कादंबरीतील एक पात्र अधिक परखडपणे व्यक्त करते : 'मी ग्रीक नाही, बर्लिनवासी आहे.' आणि एक बर्लिनकर (वासी) म्हणून त्याची इमानदारी होती, ज्यांच्यामध्ये तो वाढला होता त्या लोकांशी. 'हे भान मला सतत होतं की आम्ही, मी, गरीबांचा आहे. त्या भावनेनं माझं व्यक्तिमत्त्व घडवलं. मी या लोकांचा, या राष्ट्राचा, गरीबांचा आहे.'





पहिला महायुद्धाच्या काळात डोएब्लीननं सैनिक डॉक्टर म्हणून Lorraine (लोरेन) आणि Alsace (आलझाक) या ठिकाणी काम केलं होतं. या अनुभवानं लष्करशाही, सैन्यदलातील अधिकारी आणि प्रशियन सत्ताधारी वर्ग याविषयी त्याला वाटणाऱ्या नफरतीवर शिक्कामोर्तब केलं : 'नित्याच्या सैनिकी डॉक्टरला जेव्हा सांगण्यात आलं की त्याच्या पेशंटांचे प्राण भूकेनं कंठाशी आले आहेत. तेव्हा त्याच्या हे लक्षात आणून देणाऱ्या सोजीरांवर लष्करी कारवाई करण्यात यावी असा त्यानं आग्रह धरला होता. व्यवस्थापकीय डॉक्टर घोडेस्वाराचा चाबूक हाती घेऊन वॉर्डमधून फेऱ्या मारत असत; तुरूंगातील धर्मगुरू घोड्यावरून रपेट करायचा आणि हातात अस्त्रावाचून अन्य काही धरणं त्याला आवडलं नसतं; कैसरच्या जन्मदिवसाचा उत्सव,'अत्यंत प्रिय कैसर', व्याजस्तुती, हे पत्थरदिल बनणं, जीवनापासूनची ही अलिप्तता, मानवतेकडे, जनतेकडे पाठ फिरवणं, ही दिशाहीनता, हे क्रौर्य आणि हा गलथानपणा.'

कित्येक आठवडे डोएब्लीनचे लष्करी ठाणे Verdun (व्हेरड्यून) येथे होते. शत्रूच्या तोफखान्याच्या गोळ्यांच्या टप्प्यात. युद्धाची धुमश्चक्री चालू होती आणि डोएब्लीन एका नव्या कादंबरीकार काम करत होता. युद्ध हाच त्याच्या या कादंबरीचा केंद्रबिंदू होता. पण त्याच्यासमोर चालली होती ती ही लढाई आणि त्या निमित्तानं इतिहासाचं नवं पान उघडणारा थोर जनरल वॉलेनस्टीन. डोएब्लीननं त्याच्या आर्थिक पार्श्वभूमीचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला. यातून बऱ्याच गोष्टी निष्पन्न झाल्या. त्यापैकी, गुंटर ग्रासच्या शब्दात सांगायचं तर 'लष्कर हा गुंतवणूकीचा एक प्रकार', यावरील एक कथा. 'डोएब्लीनचा द्रष्टेपणा पाहून आपण थक्क होऊन जातो. क्रूपनं Verdun (व्हेरड्यून) येथील त्याच्या धंद्याच्या करारामधून अंग काढून घेतलं त्याआधी कित्येक वर्षं वॉलेनस्टीननं त्याची धनसंपत्ती शस्त्रखरेदी-विक्रीच्या धंद्यात गुंतवली होती. क्रूप आणि वॉलेनस्टीन, दोघांनीही स्वहितार्थ सम्राट खरीदला होता.' तथापि, डोएब्लीनची 'वॉलेनस्टीन' ही ऐतिहासिक कादंबरी नव्हती, ज्या अर्थानं ती संज्ञा वापरली जाते त्या अर्थानं : पुढं तो म्हणालाही होता की तीस वर्षं चाललेलं युद्ध हे त्याला एक अज्ञात प्रकरण होतं, एक मिटलेलं पुस्तक. चीनच्या त्याच्या प्रत्यक्ष ज्ञानाइतपतच यात गती : 'त्या काळासंबंधीचं सहानुभूतीपूर्ण स्वारस्य? ज्याची मला माहिती नाही... कारण तीस वर्षं चाललेल्या युद्धाला माझ्या लेखी काडीचंही महत्त्व नाही, आणि या नि:संशय स्वारस्यपूर्ण घटनांमध्ये कुठल्याही प्रकारची व्यक्तिगत भावनिक गुंतवणूक करून न घेण्याची खबरदारी मी घेतली होती, तर मग सहानुभूतीपूर्ण स्वारस्याप्रत मी पोचेनच कसा?.. मला सहाय्यभूत ठरतील असे आकर्षक आणि चिडचिडी अशाच गोष्टींचा वेध मी घेतला.' त्याच्या 'वॉलेनस्टीन'च्या केंद्रस्थानी युद्धसम्राट नाही तर सम्राट फर्डिनांड, ज्याला चांगलं काय, वाईट काय हे कधीच कळू शकलं नाही,''पापाची'' भावना ज्याला कधीच स्पर्शिली नाही असा माणसू.' डोएब्लीननं उपसंहारात विशद केलं होतं की, त्याच्या लेखी महत्त्वपूर्ण बाब

होती. फर्डिनांडच्या आत्म्यासाठीची धडपड. पुस्तकाच्या अखेरीस त्यानं त्या सम्राटाची अगदी अनैतिहासिकपणे वासलात लावलेली आहे. १७व्या शतकापर्यंत तग धरून राहिलेल्या एक मध्ययुगीन जंगली प्राण्याकडून, हॉबगोब्लिनडून तो मारला जातो, सुखमय दु:खभोगाच्या एका क्षणी सम्राटाच्या पाठीत भोसकता यावं यासाठी.

दरम्यान, लष्करी श्रेणीमध्ये झालेल्या बंडाळीनं युद्धाची समाप्ती झाली. इतर अधिकाऱ्यांप्रमाणं डोएब्लीनच्या अंगावरचा लष्करी युनिफॉर्म उतरवून घेतला गेला– आणि लागलीच ढासळून पडू लागलेल्या परिस्थितीकडे कुतूहलानं पहाणारा तो एक निरीक्षक बनला.

'पिवळ्या कासेर्नेससमोर, गेटानजिक, जवळजवळ शंभर लोकांचा जमाव आहे, आरोळ्या ठोकत आहे, ढकलाढकली करत आहे, मागंपुढं सरकत आहे. मी खिडकीपाशी जातो, मला दिसतं की दुसऱ्या मजल्यावरील बऱ्याच खिडक्या उघडलेल्या आहेत. बोडके सोजिर अकस्मात रस्त्यावर अवतीर्ण होतात, हसत, जल्लोष करत. बरेचस सोजिर मागं झुकतात आणि बूट आणि सरंजाम भिरकावून देतात; एकसारखे ते मागं वाकतात, बूटं उचलतात आणि इतस्तत: भिरकावतात. प्रत्येकजण त्यांच्या दिशेनं धाव घेतो, एखादा बूट हाती लागला तरी तो घेऊन मुलं पळ काढतात, बघताबघता प्रत्येकजण एकमेकांना भिडतो, झगडणं, किंचाळणं, हुज्जत घालणं; खटारे आणि वॅगन हाकले जात आहेत. गेटापाशी सोजीरांचा घोळका आहे.... त्यांच्या रायफली त्यांनी त्यांच्या खांद्यावर घेतलेल्या नाहीत तर रशियन स्टाइलमध्ये त्यांचे बूड वर करून त्या धरलेल्या आहेत; त्यांच्या टोप्याही आत चेपलेल्या आणि रशियन आकार त्यांनी घेतलेला.'

युद्धात मरण पावलेल्यांच्या स्मरणार्थ काढण्यात आलेल्या रिपब्लिकनांच्या प्रचंड मोर्च्यास हजर राहाण्यासाठी डोएब्लीन माघारी बर्लिनमध्ये वेळेवर परतला. लाल निशाणं घेतलेल्या लोकांनी रस्ते फुलून गेले होते. 'नेटका पोषाख' केलेले 'सोशल डेमोक्रॅट्स' Marseillaise च्या सुरावर गात होते. 'लांबलचक मिरवणुकीमध्ये लाल रिबीनी गुंडाळलेली पुष्पचक्रे, लाल झेंडे, कामगारवर्गाच्या घोषणा, या व्यतिरिक्त मला राज्यक्रांतीचं स्मरण करून देईल अशी कुठलीही अन्य गोष्ट नव्हती; एक सुनियोजित पेटी– बुर्झ्वा घटना, अवास्तव महत्त्व देण्यात आलेली. पुढं Die Neue Rundshaw (दि नऊ रवंडशो)साठी लिहिलेल्या एका उपहासगर्भ निबंधात त्याच्या अपेक्षाभंगाला वाट मोकळी करून दिली : 'आम्ही जेव्हा सकाळी येऊन पोहोचलो तोवर राज्यक्रांती घडून गेली होती. तरीदेखील त्यांना विशेष विनंती केली की राज्यक्रांती सुरू होईल तेव्हा आम्हाला जागं करा !'

डोएब्लीन आता मोकळा होता. अलेक्झांडर प्लाटझजवळील एका भकास जिल्ह्याच्या ठिकाणी कामगारवर्गातील पेशंटांसाठी मज्जातंतूविशारद– मानसोपचार तज्ज्ञ म्हणून त्यानं बस्तान ठोकलं युद्धोत्तर काळात 'एक अत्यंत मासलेवाईक संशयवादी' म्हणून त्याचं

घडलेलं दर्शन लुडविग मार्क्यूजनं त्याच्या आठवणीवजा ग्रंथात रेखाटलेलं आहे,'याच्या डोळ्याच्या वरच्या भागावर खाली झुकवलेली मऊ हॅट, पेटी उघडताच बाहेर उसळी घेणारा उतावळा जॅक, प्रत्येक गोष्टीत विरुद्ध बाजू घेणारा भांडकुदळ, आणि त्याला वाटत होतं की भिंतीवर आपटून घेण्यासाठीच डोकी असतात.' पण मार्क्यूजनं असंही आवर्जून नमूद केलं आहे की 'त्याच्याबरोबर चांगल्या मूडमध्ये येणं किती सुलभ होतं आणि एखाद्याला तो कसा सहजगत्या हसताखिदळता ठेवत असे.'

तो आणि एर्ना कुटुंबात भर घालत होते. प्रथम तीन नंतर चौथं पोरंगं. 'माझ्या मानेपर्यंत पाणी चढलं पुन्हा. बसून वाट पाहाण्याइतपत तुमच्यापाशी पैसे नसले तर नवीन प्रॅक्टीसमध्ये जम बसवणं सोपं नव्हतं.' तोंड मिळवणी करण्यासाठी त्यानं जर्मन मासिकांसाठी राजकीय निबंध लिहिले आणि Prager Tagblatt प्राजेर तागब्लाटमध्ये नाट्य प्रयोगावर परीक्षणं लिहिली. Linke Port लिंकपोर्ट ('डावा पंजा') या नावानं त्याचे निबंध प्रसिद्ध होत आणि कुर्ट टुचोलस्कीसारख्या स्वतंत्र बाण्याच्या समाजवाद्यांना ते आवडत असत. टुचोलस्कीनं Die Welthuhne दि वेल्ट ह्यूहन मध्ये लिहिलं होतं. Heinrich (हईनरिख) मानला जिथं दंडुका हाती घ्यावा लागतो ते काम Linke Port डावकुलीच्या गुदगुदल्यांनी करतो. नव-जर्मनीशी त्याचे संबंध आपलुकीचे, गाढ आहेत. विनोदाचा त्याचा बाज सर्वस्वी नाविन्यपूर्ण आहे, जर्मनीमध्ये मी तसा यापूर्वी कधी वाचलेला नव्हता. 'तो कोरडा होता, द्वेषभावना त्यात होती, तरीही संयत होती :' परदेशातील एका शहाण्या माणसानं जर्मन साम्राज्यात लोकसत्ता आणली. एखाद्यानं त्यात कसं वागायला हवं हे त्यानं सांगितलं नाही; चालवायचं कसं याबाबत काहीच सूचना नसलेलं ते एक लोकसत्ताक होतं.'

Linke Port नं समाजवादाचा पुरस्कार केला. त्याची व्याख्या होती; समाजवाद म्हणजे 'स्वातंत्र्य, माणसामाणसांमधील उत्स्फूर्त सहयोग, साऱ्या सत्तींना नकार, अन्याय आणि सत्ती यांच्या विरोधात विद्रोह; तो म्हणजे मानवता, सहिष्णुता आणि शांततापूर्ण इरादे.' याउलट, जर्मन साम्यवाद त्याला जाणवला होता लष्करशाही आणि सुलभीकरण. म्हणूनच तो 'नव्या नैसर्गिक मानवा'च्या दिशेप्रत मानवजातीला घेऊन जाण्यास असमर्थ होता. शिवाय, केवळ उत्पादन वाढीवरच भर देणारा समाजवाद त्याला मंजूर नव्हता. – 'वांग लून'च्या लेखकाच्या मनात समाजवादाचं चित्र होतं. 'निनादणाऱ्या घंटांनी भरलेला एक पॅगोडा', भाविकांनी तुडुंब भरलेले साम्यवादी एका कृत्रिम जगात वावरत आहेत हे कळून येण्यासाठी त्यांच्या पक्षाचं साहित्य वाचलं तरी पुरेसं आहे : 'ते वास्तवाचा तिरस्कार करतात. या इहवाद्यांना वास्तवाला भिडण्याची छाती नाही. त्यांना वाटतं त्यांचा लाल बच्चांचा छोटा झेंडा वास्तवावरून फडकवला तरी पुरेसं आहे.' यावर प्रत्युत्तर : *जर्मन साम्यवादी पुढाऱ्यांनी त्याच्या साहित्याच्या संकल्पित आवृत्ती काढली जाऊ नये म्हणून मॉस्कोत हस्तक्षेप करून ती बाहेर येऊ दिली नाही.* Die Links Kurve (दि लींक्सकुरव्हे)

या जर्मन कम्युनिस्ट पक्षाच्या मासिकात एका समीक्षकानं खुलासा केला : ज्यानं जर्मन कामगारवर्गाच्या साहित्याचा एवढ्या बेशरपणानं अवमान केला आहे अशा लेखकाचं साहित्य सोव्हिएट युनियनमधील कामगारांकडून वाचलं जावं हा अधिकार त्याला नाही.'

डोएब्लीननं ठरवून टाकलं होतं की, आपलं विचारस्वातंत्र्य अबाधित राखण्यासाठी लेखक आणि विचारवंत यांनी राजकीय पक्षात सामील होण्यापासून स्वत:ला आवरायला हवं. वॉल्टर बेंजामिनला त्याचा सल्ला अप्रबुद्ध आणि उडवाउडवीचा वाटला. डोएब्लीननं म्हटल होतं की लेखक कामगारांच्या बाजूला त्याची जागा घेतील,'पण ती जागा तरी कुठल्या प्रकारची? शुभचिंतकाची, आदर्शवादी आश्रयदात्याचं स्थान? अशक्यप्राय स्थान.'

त्याहून अधिक समर्थनीय जागा होती. नाट्य समीक्षकाची बर्लिन थिएटरची अत्यंत रोमहर्षक वर्ष अवलोकन करण्यासाठी या जागेनं त्याला एक खास अधिकार असलेलं आसन दिलं. डावे आणि उजवे यांच्यामधील वाढत्या तणावग्रस्त वातावरणात नुकतंच एकोणिसशेविशीतलं रेनेसांस (प्रबोधनकाळ) नुकतंच अवतीर्ण झालं होतं : बऱ्याच पहिल्या रात्रीच्या खेळाचं रूपांतर गदारोळी राजकीय प्रदर्शनात होत असे. अर्न्स्ट टोलरच्या 'द मशिन- रिकर्स'च्या शुभारंभाच्या प्रयोगाच्या वेळी नायकाचा खून होताच Ruthemau (रूथमो)च्या आरोळ्या उठल्या, आणि रंगमंचावरील संवाद श्रोत्यांच्या पसंतीच्या टाळ्यांनी आणि प्रशंसोद्‌गारांनी खंडित केले जात होते. डोएब्लीननं वृत्तांत दिला आहे : मध्यांतराच्या आधी लोकांनी टोलरला उचलून धरला आणि आरोळ्या ठोकल्या,'बव्हेरियन सरकार खाली खेचा!' (टाळ्यांचा कडकडाट). कामगारांच्या बाजूनं आणि विरोधात संतप्त विस्फोट तिथं होत होता; जमावात बरीच उलटसुलट वाद चालू होतं.'

इतरांच्या सामाजिक वास्तवाला उतारा म्हणून असेल बहुधा, डोएब्लीनची पुढील कादंबरी होती एक प्रचंड विज्ञान-कथा, फँटसी, ५८९ पृष्ठांची Berge, Meere und Giganten (बेर्ग, मेअर, उन्ड जायगँटेन) ('पर्वत, समुद्र आणि दानव') १९२४ मध्ये प्रकाशित झाली. आराखड्यासाठी त्यांनी पहिल्यांदा नोंदी केल्या होत्या. त्यामधून तिचे मुख्य विषय आणि आधुनिक औद्योगिक जगाबद्दलच्या त्याच्या विचारसरणीचं सार यांचं दर्शन घडतं :

'अवाढव्य शहर. तिचे उद्योग आणि तंत्रविज्ञान यांचा विकास. ते बलाढ्य आहे. निसर्गाहून बलाढ्य. प्रथम आले राजे. सरदारांचे गीत. या धरतीची कथा. युद्धं-विज्ञान. नंतर आले कामगार. अवाढव्य शहर. बर्लिन निसर्ग आणि तंत्रविज्ञान यांच्यामध्ये संघर्ष. कामोद्दिपक नमुने. अखेरीस ज्वालामुखी कसा उफाळून येतो किंवा घरं कशी ओस पडतात. घरांकडून हुकमत गाजवली जावी हे त्यांना नामंजूर. निसर्गापासून मानवाचं दूरीकरण.'

आजपासून हजारो वर्षानंतर मशिनला जे ईश्वरसदृश महत्त्व प्राप्त होणार आहे त्याचा अंदाज या पुस्तकात व्यक्त करण्यात आला आहे; तंत्रविज्ञानाचं जगात एवढं प्राबल्य माजतं

ग्रीनलँडची बर्फाच्छादित शिखरं वितळवण्यासाठी आइसलँडच्या ज्वालामुखीचा वापर केला जातो. महामानवांच्या या युगात वसतीला असणारे प्रामेथिअन आणि दानव यांच्यात कमकुवतपणा असतो, जो पूर्णपणे मानवी असतो; मानव हा निसर्गापासून केवळ अलग पडलेला नाही तर एका विनाशक 'युरल युद्धा'त गुरफटला गेला आहे.

'निसर्गाच्या महानतेवरील या स्तोत्रात डोएब्लीननं कामोद्दिपक सूर धेडलेला आहे, आश्चर्यकारिकरित्या. त्याची नव्यानं उद्भवलेली लैंगिकता अखेर एका 'समानधर्मी आत्म्या'शी झालेल्या त्याच्या मुलाकातीशी संबंधित होती ही बाब लपून राहिलेली नव्हती. आता तो कात्रीत सापडला गेला होता— एवढी मंडळी असताना एखाद्या पुरुषानं खरोखरीच त्याच्या स्वत:च्या बायकोच्या प्रेमातच का राहावं? १९२९ मध्ये 'बर्लिन कॉस्ट्यून बॉल'मध्ये योल्ला निक्लास या तरुणीशी त्याची भेट झाली. ती छायाचित्रकार होती, लवकरच त्याच्या पुस्तकांची 'आदर्श स्फूर्तिदेवता' म्हणून पुन:पुन्हा भेटणार होती. रॉबर्ट माइन्छ या त्याच्या मित्राच्या मते १९२२ ते १९४० या काळात 'तिचा सहभाग नाही असं त्याचं एकही पुस्तक लिहिलं गेलं नव्हतं'. या 'गूढ वधू'च्या सहवासात तो खूष होता– पण पितृहीन बाळपणाचा त्याचा अनुभव त्याला असल्यामुळं स्वत:चे पुत्र सोडण्यास मात्र त्याला कोणी प्रवृत्त करू शकत नव्हता. त्यानं एके ठिकाणी म्हटलं आहे : 'एखाद्यानं मला विचारलं मी कुठल्या राष्ट्राचा आहे, मी सांगेन : जर्मनांच्या नाही, नाही ज्यूंच्या, तर मुलांच्या आणि पागलांच्या'.

हळूहळू एका तडजोडीपाशी तो पोहोचला ज्यायोगे त्याचं 'ऐहिक जीवन' एर्ना डोएब्लीनशी आणि त्याचं 'आत्मिक आयुष्य' योल्ला निक्लास संगे व्यतीत करणं त्यानं साध्य केलं. त्याच्या मित्रांच्या म्हणण्यानुसार पत्नीबरोबरचं त्याचं जीवन व स्ट्रिंडबर्गचं वैवाहिक जीवन यात विलक्षण साम्य आढळतं. त्यांच्या म्हणण्याला दुजोरा देणारे प्रच्छत्र निर्देश त्याच्या साहित्यकृतींमध्ये आहे. विशेषत:,'बेर्ग, मेअर, उंड जायगँटेन' मध्ये तर विपुल प्रमाणात— तो अशा माणसांबद्दल बोलतो 'जी प्रेमातील दुष्मन म्हणून एकमेकांशी जखडली गेली आहेत, जोडली गेली आहेत एकमेकांचे फाडून तुकडे करण्यासाठी, चावे घेण्यासाठी, छळ मांडण्यासाठी. . . . ' पुढील काळात त्यानं लिहिलेल्या एका कादंबरीत स्वत:च्या बायकोबद्दल एका लेखकाला बोलायला लावलं आहे : 'आमच्या प्रेमात तिरस्कार आणि क्रोध आणि संघर्ष आला आहे. यात दोष तिचा, हां मी तिला जबरदस्तीनं पकडतो आणि माझ्या दातांनी चावून धरतो. . . . आणि नंतर, तिला आवडत असं तस्संच. मी रागानं चवताळेस्तोवर तिला खरोखरीच समाधान लाभत नसे'.

योल्ला निक्लासला याहून वेगळी वागणूक मिळत होती : त्याच्या साहित्यकृतीत तिचं दर्शन घडतं : 'सडसडीत, सौम्य, तरंगणारी' अशी स्त्री. ती 'माणूस आहे, जो माझ्यात नाही माझ्यापाशी नाही असा माझा भाग, तरुण, कोमल स्त्री; मानवी समाजाहून मला जी

अधिक मोलाची वाटते ती निसर्गाची शक्ती.'

चाळीशीच्या मध्यावर पोहोचेपर्यंत डोएब्लीनला त्याच्या ज्यूपणाचे क्वचितच स्मरण करून दिले गेले होते. 'ज्यू आणि ज्यूंच्या समस्या यांची विवंचना मी का करू? मला ठाऊक होतं ते अस्तित्वात आहेत, पण मला सवय होती. माझ्या स्वत:च्या मार्गानं जाण्याची. मी होतो हा असा; त्याबद्दल विचार करण्यात काही अर्थ आहे असं वाटत नव्हतं.' तथापि, १९२३ मध्ये बर्लिनच्या पूर्व भागात ज्यू विरोधी बऱ्याच घटना घडल्या. डोएब्लीनच्या ऑफसजवळच. मारहाण, खिडक्यांची नासधूस. 'नाझींनी उठवलेला पहिला आवाज' या शब्दात डोएब्लीननं त्यांचं पुढं वर्णन केलं आहे. कसं कोण जाणे, पण अचानक त्याला वाटू लागलं की, ज्यूंबद्दल अधिक माहिती असायला हवी. 'ज्याला खरोखरीच ज्यू म्हणून संबोधिता येईल असा एकही ज्यू मला ठाऊक नव्हता. स्वत:ला ज्यू म्हणवून घेणारी काही मंडळी परिचयाची होती, पण त्यांना ज्यू म्हणणं जरा अवघडच.' त्यांच्या श्रद्धा ज्यूंच्या परंपरांना धरून नव्हत्या वा त्यांना हिब्रूही बोलता येत नव्हतं. 'शक्यता आहे, ते नामशेष झालेल्या लोकांमधील उरले सुरलेले असावेत, फार फार वर्षांपूवी त्यांच्या भोवतालच्या परिसरात ते सामावून गेले होते.

डोएब्लीननं ठरवलं पोलंडला जायचं. तिथल्या नेटिव वसाहतीत 'अस्सल ज्यू' पाहाता येतील. त्यानं तिथं जे पाहिलं, अभ्यासिलं त्याचा वृत्तांत Vossische Zeitung (फॉसझिशे झाईतुंग) मध्ये क्रमश: छापून आला. 'अमीरउमरावांसाठी स्वर्ग, ज्यूंसाठी नंदनवन, शेतकऱ्यांसाी नरक' म्हणून पोलंड ओळखला जात होता. त्या काळातील त्याचा इतिहास, तिथल्या राजवटीखालील परिस्थिती यासंबंधीची थोडीबहुत माहिती डोएब्लीनला तिथं पाऊल टाकण्यापूर्वी होती. परंतु अशा बऱ्याच गोष्टी होत्या ज्यांच्याविषयी तो अनभिज्ञ होता. उदाहरणार्थ, 'प्रायश्चित दिनी' सायंकाळी मध्ययुगीन पेहराव परिधान करून परंपरानिष्ठ ज्यूंचा जमाव आपल्या पूर्वजांच्या कबरीपाशी रडत आहेत– पुटपुटत आहेत, विलाप करत आहेत, स्त्रियांचा आक्रोश'– हे दृश्य तो प्रथम पहात होता. दफनभूमीच्या प्रवेशद्वारापाशी भिकाऱ्यांची फौज सुतक्यांची वाट पहात तिष्ठत होती. मृत आणि कंगाल यांचा तो दिवस होता : 'कपड्यात गुंडाळलेली मुलं घेऊन जाणाऱ्या लक्तरातील स्त्रिया. म्हाताऱ्या पिवळ्या पडलेल्या ज्यू बाया केसांची झिपरं घेऊन– प्रत्येक ठिकाणी पैशाची पाकिटं आणि थैल्या उघडल्या जात होत्या, नोटा आणि नाणी बाहेर पडत होती, काही भिकाऱ्यांनी बऱ्याच नोटांची कमाई केली होती.' हे पाहून डोएब्लीनला जबरदस्त धक्का बसला. 'ते काहीतरी भयानक आहे. ते अनैसर्गिक, प्राचीन काळाकडे माघारी वळण्यासारखं आहे. याचा ज्यूडाइझमशी काय संबंध? हे आहेत आदिम अंधश्रद्धेचे अवशेष, मृतांची धास्ती, भोवताली वावरणाऱ्या आत्म्यांची भीती यांचा हा पुढं चालत आलेला वारसा... कुठल्यातरी अन्य धर्माचे, चराचरात आत्म्यांचे अस्तित्व भरून आहे यावरील श्रद्धा, मृतांचा उपासना मार्ग यांचं हे टिकून राहिलेलं अस्तित्व.'

अठराव्या शतकात पोलंडमध्ये, गूढवाद, प्रार्थना, धार्मिक आस्था यांना प्राधान्य असलेला एक पंथ ज्यूंमध्ये स्थापन झाला होता. 'हासिडिक' या नावानं तो ओळखला जात असे. यातील धर्मशास्त्र पढवणारे रॅबाय चमत्कार करत. अशा चमत्कारांच्या आख्यायिका प्रसृत होत. या कथाचं डोएब्लीनलाही अतिशय आकर्षण वाटत असे. 'नाही म्हटलं तरी हा विचार झटकून टाकता येत नाही.... हे ज्यू म्हणजे काय जबदरस्त लोकं आहेत ! यापूर्वी त्यांच्याविषयी मला काहीही माहिती नव्हती.' परंतु, या परंपरानिष्ठ जमातीत सामील व्हावं असं मात्र त्याला वाटलं नाही. 'ज्यूंमध्ये काही परंपरेनं चालत आलेल्या मध्ययुगीन निष्ठा भिनलेल्या होत्या. 'तोरा' हा त्यांचा एक अनन्यसाधारण ग्रंथ आहे, पण त्याच्या जोडीनं जादूटोणा आणि अंधश्रद्धा यांचाही छुप्या पद्धतीनं पगडा आहे. बुद्धाच्या शिकवणीशी याचं साम्य दिसतं. याला स्वत:ची अशी शिकवण आहे. तरीही मूर्तीपूजकांचा परमेश्वर अस्तित्वात आहे यालाही त्यांची संमती आहे.'

आपल्या मुलांना हिब्रू शिकवून पॅलेस्टाईनमध्ये स्थायिक होण्यासाठी त्याची पूर्व तयारी करून घेणाऱ्या 'झीयोनिस्टां'नाही डोएब्लीन भेटला. त्यांचं हे वागणं, त्याच्या मते,'जर्मन फ्रेंच बोलत आहेत.' समाजवादाकडे कल असलेल्या कट्टर 'यिडिरिस्टा' नाही तो भेटला. त्यांना ज्यूंच्या स्वतंत्र राज्याची कल्पना नव्हती. त्यांचं म्हणणं अशा स्वतंत्र राष्ट्रनिमित्तीनं बहुसंख्य ज्यूंच्या आर्थिक समस्या सोडवल्या जाणं केवळ अशक्य होतं. एका 'यिडीश' लेखकानं सांगितलं,'झीओनिस्ट' ज्यूंचे राज्य स्थापन करण्यात यशस्वी होतीलही. 'पण कितीजणांसाठी? आणि ते काय साध्य करणार? त्यांच्यापाशी असतील सोजीर, राजकारण धुरंधर, औद्योगिक कामगार, जणू काही जगात या आधी ते पुरेसे नव्हते. पण ते बर्गसन वा स्पिनोझा निर्माण करणार नाहीत.' डोएब्लीनचा दृष्टिकोन मानवी होती : 'जग आहे त्याहून ते अधिक मानवी करायला हवं. ज्यूंसाठीच गोष्टी वाईट नाही आहेत. जर्मनी, पोल्स, फ्रेंच, अमेरिकन आणि इंग्रज यांचीही परिस्थिती चांगली नाही... प्रत्येक गोष्ट आहे त्याहून अधिक मानवी करायला हवी. !'

या प्रक्रियेतील डोएब्लीनचं स्वत:चं योगदान, त्यानंतर वर्षभरात त्यानं लिहिलेली 'बेर्लिन अलेक्झांडर प्लाट्झ' ही कादंबरी. त्यानं सांगितल्यानुसार तिचा विषय, समर्पित बलिदान– अब्राहम आणि इसाक, जॉब (Job) बर्लिनचे कत्तलखाने आणि न-नायक फ्रांझ बिबेटकोपची 'गर्ल फ्रेंड' Mieze (मिएझ) हिची हकनाक हत्या यांच्या श्रुतयोजनांच्या (allusions) पार्श्वभूमीवर रचलेलेल 'कँटस फर्मस'— ख्रिश्चन चर्चचे प्राचीन पारंपारिक कंठसंगीत. फ्रांझ हा स्वत:च वास्तव जाणून घेण्याच्या त्याच्या स्वत:च्या हाडीमासी खिळलेल्य असमर्थतेचा बळी आहे, बर्लिनच्या 'अंडरवर्ल्ड'ची लांडीलबाडी ठाऊक नसलेला पार्सिफलचा अवतार. श्वास रोधून धरणारं स्तिमित करणारं हे पुस्तक, बर्लिनी स्वरात लिहिलेलं. पानोपानी अतिवास्तववादी महानगरीय प्रतिमा : वृत्तपत्रीय मथळे, जाहिरातींची

घोषवाक्यं, शेअर बाजार वृत्तांत, हवामान, अंदाज, लोकप्रिय गीतं — मालिन्याची विविधता आणि 'ॲब्सर्डिटी', अलेक्झांडराप्लाट्झच्या अवतीभवतीचे खतरनाक रस्ते, जुन्या बर्लिनची 'पिकॅडेली सर्कस'– या साऱ्यांमधून अशुभ लोकगीताचं सातत्यानं आळवलं जाणारं धृपद : 'एक कापणी करणारा आहे, त्याचं नाव आहे कृतांत. आता त्याचा सुरा तो पाजळत आहे, तो आयुष्य खतम करतो. सावधान, माझ्या चिमण्यानीलातील पुष्पा !'

डोएब्लीन स्वत:च या कादंबरीत संपूर्णपणे बुडून गेला होता आणि सावजाचा लपतछपत पाठलाग करणाऱ्या शिकाऱ्यागत त्यानं विषयाचा मागोवा घेतला होता. डान्टेपासून तो शिकला होता 'त्याच्या पात्रांना धक्के देत त्याच्या कवितेमधून कसं यशस्वीरित्या बाहेर पडायचं', आणि उध्वस्त कामगारांमधील जीवनाच्या या महाकाव्यसदृश काहाणीसाठी त्याला हवी होती, साक्षात संबंधाची, अव्यवधानाची भावना. 'लेखक निर्मिती करत असताना वाचक त्याच्या खांद्यावरून पाहात असतो.' असाधारण जोखमीचं हे काम. कामगारवर्गात वीस वर्षं त्यानं वैद्यकीय व्यवसाय केला होता. या काळातील प्रत्यक्ष अनुभव त्याच्या गाठीशी होता. 'अत्यंत भिन्नभिन्न प्रसंगात मी त्यांना न्याहाळालं आहे आणि त्याचं जीवन, त्यांची कामं आणि त्यांचे भोग यात सहभागी होऊन त्यांना न्याहाळणाचा हा अस्सल एकमात्र मार्ग.' वॉल्टर बेंजामिन नमूद करतो : 'तिची बोलीभाषा, त्यातील अनेक ताकदींपैकी एक आहे, ज्यायोगे जुन्या कादंबरीच्या बंदिस्त रचनेवर तो प्रखर हल्ला चढवतो.'

'बेर्लिन अलेक्झांडरप्लाट्झ' हातोहात खपली,'बेस्ट-सेलर' ठरली. समीक्षकांनीही ती बऱ्यापैकी उचलून धरली. त्यांच्या तत्काळ ध्यानी आलं की, शतकातील ती केवळ एक महान नागरी कादंबरी नाही असे तर, जर्मन आविष्कारवादाची 'अल्टिम थुली' ही आहे – एक अत्युच्च शिखर. काही समीक्षक गृहित धरून चालले की त्याची 'सिनेमॅटिक मोन्ताज' पद्धती जॉईसकडून उचलेली आहे; परंतु 'युलिसिस' प्रकाशित होण्याच्या कितीतरी आधी त्यानं 'जाईशियन जर्मन लिहायला सुरूवात केली, आणि त्यानं म्हटल्याप्रमाणं, त्या आयरिश जॉईसकडे कशाला जायला हवं होतं मला? त्या आयरिशाकडे? त्यानं वापरलेली पद्धती (जी सुरेख आहे, मला तिचं कौतुक आहे) मी आधीच शिकलो होतो, त्याचं आणि माझं मुळस्त्रोत : सारखंच : आविष्कारवादी, दादावादी आणि असे बरेच.' त्याच्या पिढीचा अग्रगण्य अत्याधुनिक साहित्यकार म्हणून त्याचं स्थान आता निश्चित झालं होतं हे निर्विवाद, आणि 'प्रशियन अकॅडमी ऑफ आर्ट्स'च्या नव्यानं स्थापन झालेल्या साहित्यिक विभागात त्याची एकमतानं निवड झाली होती. बरीच वर्षं फारशी प्रसिद्धी न लाभलेला डोएब्लीन 'आव्हां गार्द'चा म्होरक्या म्हणून अकस्मात प्रसिद्धी पावला. 'वास्तवाचा सागरसदृश्य ओघ, कथाकथक आणि त्याची कथा यांना वेढून असलेलं उचंबळतं आणि ओघवतं अस्तित्व हेरण्याची त्याला जी दृष्टी होती तशी त्या आधीच्या कुठल्याही लेखकापाशी नव्हती.' याकडे वाल्टेर मुरागनं लक्ष वेधलं आहे. त्याचबरोबर 'काव्यात्मकता आणि अलंकारिता नसलेली

शैली' आवडणारा तो पहिला लेखक होता. अर्थात ती अनुबोध कादंबरी नव्हती. १९१८ मध्ये पराभूत झाल्यानंतर जर्मनी जो मार्ग चोखाळत होती. त्यावरील एक रूपक- विध्वंस होण्याच्या आधीच्या सायंकाळचं सोडोमचं 'व्हिजन'- या शब्दात मुरागनं तिचा अर्थ निरुपिला आहे. ज्यांच्या लेखी नेहमी सर्व काही घडत असतं अशा त्याच्यासारख्या छोट्या माणसांना फ्रांझ बिबेरकोपन दिलेल्या नि:संदिग्ध धोक्याच्या इशाऱ्यानं डोएब्लीननं त्याच्या दृष्टांतकथेची अखेर केली आहे. छोट्या चोऱ्या आणि फौजदारी न्यायालयं यांच्या चक्रव्यूहामधून सहिसलायमत बाहेर पडल्यानंतर फ्रांझ एका छोट्या फॅक्टरीचा असिस्टंट वॉचमन म्हणून नोकरी पत्करतो. डाव्या, उजव्या दोन्ही पक्षांनी जोपासलेल्या खांद्याला खांदा भिडवून काढल्या जाणाऱ्या गूढ संचालनाचा हा काळ असतो :

'कैकदा त्यांच्या खिडकीवरून ते संचलन करत जात, सोबत झेंडे, संगीत आणि गीत. बिबेरकोप शांतपणे दाराबाहेर पाहातो आणि सुरक्षितपणे घरात राहातो. त्यांच्याबरोबर मी संचलन करावं ही त्यांची इच्छा, त्यांनी माझं जे काही करायचं ठरवलं आहे त्यासाठी माझ्या मस्तकाचं मोल पुढं मोजावं लागणार. जर का युद्ध उद्‌भवलं आणि त्यांनी माझ्यावर सक्ती केली, आणि मला ठाऊक नाही. कां? मी सहजी युद्धात खेचला गेलो, तर तो दोष माझा आणि मला योग्य धडा मिळेल. जर का तुम्ही जागृत असाल, भानावर असाल, तर तुम्ही एकाकी नाही. आकाशातून गारा आणि पर्जन्य कोसळेल; त्याबाबतीत कोणीच काही करू शकणार नाही, पण इतर बऱ्याच गोष्टींच्या विरोधात तुम्ही स्वत:चा बचाव करू शकता. म्हणून मी पूर्वी रडायचो तसा आता रडत नाही : हे प्रारब्ध आहे, हे प्रारब्ध आहे ! प्रारब्ध म्हणून अशा गोष्टींची कदर तुम्ही करता कामा नये; तुम्ही ते ओळखायला हवं, ते गच्च पकडून ठेवायला हवं आणि ते नष्ट करायला हवं.'

हा असा उत्कृष्ट सल्ला देऊनही 'स्टॉर्म ट्रुप्स' दिवसेंदिवस वाढत्या संख्येनं संचलन करत होते आणि एक दिवस असा उजाडला रिशस्टाग जाळपोळ पाहून डोएब्लीनला कळून चुकलं, नाझींची सत्ता असलेल्या भूमीवर राहाणं म्हणजे त्याच्या जीविताला धोका. एका सकाळी आपल्या अपार्टमेंटमधून तो बाहेर पडला, चालू लागला आणि काही वेळानं त्याच्या ध्यानी आलं, नाझी युनिफॉर्मवर 'सिव्हिलियन' कोट चढवून एक माणूस त्याचा पाठलाग करत होता. बाका प्रसंग उद्‌भवला होता पण त्यानं संयम राखला. तो भुयारी रस्त्याकडे वळला. स्टेशनवरच्या गर्दी मिसळून आगगाडी पकडली. त्यानंतर आगगाड्या बदलत त्यानं पाठलाग करणाऱ्याला गुंगारा दिला. शेवटी धावतपळत, आपल्याला कोणी ओळखणार नाही याची खबरदारी घेत स्टूटगार्टला जाणाऱ्या ट्रेनवर चढला. एका मित्रानं खाजगी मोटारमधून स्विस हद्द ओलांडण्यास त्याला मदत केली. झ्युरिकमधून त्यानं 'प्रशियन ॲकडमी ऑफ आर्टस्'कडे त्याच्या पदाचा राजीनामा पाठवला : 'ज्यू जमातीत जन्मलेली एक व्यक्ती म्हणून सद्य:परिस्थितीत मी अकादमीला एक मोठी अडचण ठरेन.'



अनुक्रमणिका

अकादमीच्या मिटिंगमध्ये प्रख्यात कवयित्री व रोमॅंटिंक युगाची इतिहासकार रिकार्ड हूच हिच्याशी डोएब्लीनचं मतभिन्नतेमुळं नेहमीच झमकत असे. पण त्याला व (Heinrich Mann) 'हिनरिक मान'ला राजिनामे द्यावे लागल्याचं तिला कळताच, निषेध म्हणून तिन स्वत:चा राजीनामा सादर केला. मॅक्स फॉन शिल्लिंग्सनं तिचं मन वळवण्याचा प्रयत्न केला. 'जर्मन राष्ट्रीय साहित्याच्या विकासासाठी' तिच्यासारखी 'कट्टर पारंपारिक निष्ठा' असलेली व्यक्ती अकादमीमध्ये असणं अकादमीच्या दृष्टीनं महत्त्वाचं होतं. तरीही त्यावर पुनर्विचार करण्यास तिनं ठाम नकार दिला: 'खरं आहे की हेर हिनरिक मान याच्याशी माझे मतभेद आहेत, काही बाबतीत डॉ. डॉएब्लीनशीही. परंतु डोएब्लीन जसा सत्याचा परिश्रमपूर्वक शोध घेतो आणि काय करणं उचित आहे हे जसं तो जाणतो, आणि मला नेहमी जसा तो आढळला आहे, मनमोकळा, प्रामाणिक आणि सौजन्यपूर्ण, त्याच्या या गुणांचं अनुकरण करण्याचा प्रयत्न ज्यू नसलेल्या जर्मनांनी केल्यास बरे.' सार्वजनिक समारंभात सहभागी होण्यास तिनं संमती दिली, युद्ध समाप्तीनंतर. तोवर तिचं बरंच वय झालं होत

स्वित्झर्लंडमध्ये एका नव्या फँटसीवर डोएब्लीन जोमानं कामाला लागला. बर्लिनमध्येच अंतर्ज्ञानानं तिचा प्रारंभ केला होता. हद्दपार करण्यात आलेल्या बॅबिलोनियन परमेश्वराच्या आधुनिक भ्रमंतीची ती कथा होती. 'संपूर्ण चीज म्हणजे कृतिविडंबन, गंमत, आस्था, उपरोधिक गोष्टी यांची एक मालिका व्हायला हवी; एका विवक्षित जगाभोवतीचा प्रवास.' पुढल्या वर्षी ॲमस्टरडॅममध्ये 'बाबिलोनिशे वानडूंग' या नावानं ही कादंबरी प्रकाशित झाली. 'द टाइम मशिन' आणि हाईनची 'गॉड्स इन एक्सायल' याचं मजेदार मिश्रण. एक अफलातून गुढकथा. कोण्या एके काळचा कॉनराड नायक देव पॅरिसमधील एका स्वस्त हॉटेलात प्रवेश करतो आणि त्याच्या अवतीभवती खळखळत्या पाण्याच आवाज त्याच्या कानी पडतो. तेव्हा त्याला वाटतं, अगदी ठामपणे की जलपरी आणि जलदेवता यांच्या गृही त्याला जादूनं हलवण्यात आलं आहे. पण तकलादू पार्टिशनमधून येणारा तो आवाज होता,

नळाचा : 'लोकं स्वत:ला धूत होते, ते स्नान करत होते, अगदी खाजगी जागेतील दोर खेचत होते; स्वत:वर भसाभसा पाणी ओतत होते आणि पाण्याचे फवारे मारत होते.' एखाद् प्रसंगी उपरोध थांबवला जातो आणि डोएब्लीन हर्षोत्फुल्ल संगीताचा विष्कंभक सादर करतो: 'अद्याप नाही, नाही अद्याप नाही तू हरवला गेला आहेस, नाही हरवला गेला आहे, बंधू हृदया. . . . ! कारण हे जग लुटारूचं आणि खुन्यांचं नाही आहे !' परंतु अन्य विष्कंभक नेमकं उलटं सूचित करतात. काळजीपूर्वक तयार करण्यात आलेल्या सरकारी कार्यक्रमाचा एक भाग म्हणून हजारो माणसांची कत्तल करण्यात येणार हे ध्यानी येण्याइतपत तो द्रष्टा होता. हे आहे एक बॅबिलोनियन ऑपरेशन, आणि उपरोधाची धार तिखट करण्यासाठी डोएब्लीन बळींना 'रोमन' या नावानं संबोधतो – 'प्रथम १,५०,००० रोमन ठार मारण्याच मुक्रर करण्यात आले, त्या पाठोपाठ दहा लाख आर्मेनियन.' !

त्याला जेव्हा कळून चुकलं की त्याचे प्रयत्न म्हणजे पालथ्या घागरीवर पाणी ओतणं तेव्हा तो कल्पनाधिष्ठित कादंबरी- लेखनाकडे वळला. 'बिब्लिओथेक नाशिओनेल'मध्ये तो कीर्केगार्ड वाचयला जात असे, तिथं त्याला ॲमेझॉन नदीचा शोध लागला.' 'मी त्यात बुडी मारली, ही आश्चर्यकारक निसर्गघटना, एक नदी समुद्र वाटावी अशी, एक आदीम गोष्ट. तिचे तीर, प्राणी आणि माणसं, तिचे आहेत.' दक्षिण अमेरिकेत पाऊल न टाकता नदी आणि जंगल, परानावर ख्रिश्चन लोकसत्ताक स्थापन करण्याचे जेझुइटांचे प्रयत्न यासंबंधी कादंबरीत्रय लिहिले - 'दा लान्ड ओने तोड' (मृत्यू नसलेली भूमी), देर ब्लो टीगर ('निळा वाघ) आणि 'देर न्यॉय उरवार्ड ('नवीन जंगल').

त्यानं कादंबऱ्यांच्या अन्य मालिकांवर काम करायला सुरूवात केली होती - ही होती १९१८ मधील जर्मन राज्यक्रांतीच्या अपयशासंबंधी - एव्हाना दुसऱ्या महायुद्धाला तोंड फुटलं होतं. नव्यानंच स्थापन करण्यात आलेल्या माहिती मंत्रालयाचा प्रमुख ज्याँ गिराडू यानं जर्मन फौजेला उद्देशून केल्या जाणाऱ्या 'प्रोपोगांडा'चा सल्लागार म्हणून सहकार्य करावं अशी डोएब्लीनला विनंती केली. त्याचे थोरले दोन मुलगे क्लाड (क्लाउस) व व्हिन्सेंट (वोल्फगांग) फ्रेंच सैन्यात दाखल झाले होते. (तिसरा पीटर 'टायपोग्राफिकल डिझाइनर' म्हणून न्यूयॉर्कला गेला होता. तिथे १९३९च्या प्रारंभी आंतरराष्ट्रीय P.E.N. क़्लब काँग्रेसला हजर राहाण्यासाठी डोएब्लीन गेला होता तेव्हा तो मुलाला भेटला होता. (या अमेरिका भेटीत मिसेस रूझवेल्टबरोबर त्यानं 'व्हाइट हाऊस'मध्ये खानाही घेतला होता) 'बनावट युद्धा'च्या काळात- या युद्धाला फ्रेंच 'ड्रोल ड्रेग्युरर' म्हणत असत- ध्वनिक्षेपकावरून ध्वनिमुद्रित प्रसारणासाठी मजकूर लिहिण्यात व्यग्र होता. जर्मन सैन्याच्या आघाडीवरील सैनिकांचं मतपरिवर्तन व्हावं हा उद्देश नजरेसमोर ठेऊन मजकूर तयार केला जात असे. उदाहरणार्थ, त्यांना सांगण्यात येई : 'मॅगिनॉट रेषेवर तुमचा हल्ला मोडून काढला जाईल, जशी ॲडॉल्फ हिटरलच्या लष्करी छावणीवजा राष्ट्राची धूळधाण होणार आहे.' परंतु हा शाब्दिक हल्ला फुसका ठरला. १९४०च्या मेमध्ये बेल्जियम पडलं आणि सहा आठवड्यात पॅरिसही पडलं.

फ्रांस पडलं त्या काळातील डोएब्लीनच्या आठवणी 'शिक्साल्सेइझ'मध्ये ('दैवघटित प्रवास') नोंदलेल्या आहेत. त्याचं हे एक उल्लेखनीय पुस्तक. पण तसं दुर्लक्षित झालेलं. अशा प्रकारचा लक्षणीय दस्तऐवज विरळाच. युद्धात उडालेल्या धुरळ्याचा तो एक सांकेतिक, रूढ पद्धतीचा वृत्तांत नव्हता. युद्धाच्या आघाडीवर जे काही घडत होतं तेवढंच डोएब्लीननं पाहिलं होतं; थकले- भागलेले निर्वासित आणि पराभूत सोजीर, अस्तित्वात नसलेल्या आघाडीवर तातडीनं पाठवण्यात येणारी कुमक. हे एक अनन्यसाधारण पुस्तक ठरलं आहे याचं कारण ऐन बेबंदशाहीतील त्याचे विचार आणि भावना त्यानं आत्यंतिक प्रामाणिकपणानं आणि चिकित्सक काटेकोरपणानं वर्णिलेले आहे. प्रशिक्षित आणि सहानुभूतीपूर्ण निरीक्षण : कित्येक वर्षं अगदी निकटचा परिचय असलेल्या पेशंटवरील

मानसोपचार तज्ज्ञाचं काम. तरीही पेशंटच्या प्रतिक्रिया कैकदा बेभरवशाच्या, अगदी क्विक्झोटला साजेशा– आणि अहो आश्चर्यम ! डोएब्लीनला स्व गवसला, आजवर त्याला कधीच कळून न आलेला : 'माझ्या आयुष्याचा हा संपूर्ण काळ अवास्तव होता. ह्या काळात मी 'मी' नव्हतो. माझ्या कृतींमध्ये 'मी' नव्हतो, (नाहीतरी कैक वेळा कुणी आपखुशीनं 'कृती' करत नाही; एकतर त्याला तसं करणं भाग पडतं, नाहीतर कुणी काहीच न करता केवळ दिवस ढकलत राहातो) माझी विचार करण्याची पद्धत आणि भावना याही पूर्वीप्रमाणं राहिल्या नव्हत्या.' युद्धामुळे उध्वस्त झालेल्या हजारो लाखो माणसांना ग्रासून टाकणाऱ्या निरुत्साह आणि नैराश्य याला साजेशा या त्याच्या प्रतिक्रिया होत्या– फरक एवढाच हे लिहायला तो जिवंत राहिलेला होता आणि त्यानं हे सांगितलं कारण किंमत कितीही मोजावी लागो त्याला सत्य जाणून घ्यायचं होतं. परिणामी, त्याचा हा 'प्रवास' म्हणजे आत्म–विश्लेषणामधील त्याचं अत्यंत शोधक साहस होतं. तो सांगतो : 'या दिवसात मला खात्री होती की अत्यंत महत्त्वाच्या घटना मी अनुभवत होतो. म्हणूनच मी हे लिहित आहे; त्यांना बंदिस्त करण्यासाठी आणि त्यांच जतन करण्यासाठी. कारण अशा प्रकारच्या अनन्यसाधारण घटना शोध-दीपाच्या झोतागत माझ्यावरून केवळ सरकून जाव्यात असं व्हायला नको होतं !'

त्याचा स्वत:चा प्रवास सुरू होण्याआधी दोन आठवडे, त्याची बायको आणि त्यांचा तेरा वर्षाचा मुलगा एटीएन्न यांना पॅरिसमधून हालवण्यात आलं होतं व त्यांची रवानगी ले प्यू येथे केली होतीत. फ्रांसचं हे मध्यवर्ती ठिकाण. नंतर, जर्मनांनी जेव्हा इथं मुसंडी मारली– तेव्हा शहर खाली करण्याची पाळी आली. ती माहिती खात्याच्या मंत्रीमंडळाची. डोएब्लीन जिथं काम करत होता. तो प्रोपागांडा विभाग ट्रेनमधून टूरला रवाना करण्यात आला; एव्हाना, दक्षिणेकडे जाणारे हमरस्ते निर्वासितांच्या लोढ्यांनी बंद झाले होते. पोर्त द इव्रीच्या यार्डात ट्रेनची वाट पाहात उभा असताना त्याला वाटलं, ही माघार म्हणजे मानहानी : 'हे असं पळून जाणं आणि स्वत:च्या व्यक्तिगत सुरक्षिततेची काळजी घेणं हे किती अयोग्य, किती ओंगळ ! छि: यू, पलायन करणं, पलायन करत राहाणं आणि तरीही पळत राहायचं ही पाळी यावी. किती लाजिरवाणं, अनादरणीय नियती. माझी ही दशा कोणी केली?'

टूरमध्ये पोचून तीन दिवस होतात न होतात, त्यांना पुन्हा हलवण्यात आलं या वेळी ट्रकमधून वाढत्या गदरोळातून. 'माझा समज झाला, प्रत्येक हालचालीबरोबर आमच्या फायली त्यांचं महत्त्व गमावून बसत होत्या. आता त्या ट्रकांवर भिरकावून दिल्या जात होत्या– असा एक दिवस येईल जेव्हा या फायली कुठल्यातरी हमरस्त्यावर टाकून देण्यात येतील तो दिवस फार दूर नसल्याची जाणीव मला झाली. . . . त्या फेकून दिल्या जातील आणि प्रत्येकजण स्वत:ची चामडी बचावण्याचा प्रयत्न करील.' त्याच्याबरोबर होती त्याचा

कागदपत्रं, पार्सल. पार्सलात नुकत्याच लिहिलेल्या त्याच्या कादंबरीचं हस्तलिखित आणि बुटाची जोडी एक सूटकेसही होती. कपड्यांनी भरलेली, त्याच्या सुरक्षिततेची हमी, मुक्कामाचा ठिकाणी टाकायचा नांगर. तो आणि त्याचे सहकारी यांना भरगच्च भरलेल्या ट्रकात कसंबसं घुसवल्यानंतर त्यांच्या वागणुकीमधील बदल त्याच्या ध्यानी आलं : "बापरे, आता आम्ही निरीक्षक आणि प्रवासी राहिलेले नव्हतो. आम्ही होतो "जमाव." आमच्या परिवर्तनामधील ही पहिली पायरी होती.'

डोएब्लीनचा विभाग रेल्वेनं पार दक्षिण टोकाला पोहोचला. तो आणि त्याच्याबरोबर चाळीसजण. सर्वांनी तीन दिवस आणि रात्री गुरांच्या डब्यात घालवल्या. 'माझे प्रवासी सोबती एकसारखे त्यांच्या देहाची स्थिती बदलत होते, काही वेळेला बसत, काही वेळेला उकिडवे किंवा पुन्हा अर्धवट लवंडत– शेवटी सगळ्यांनाच कळून चुकलं (यालाही बराच अवधी लागला) की प्रत्यक्षात आरामात बसणं मुष्किल होतं. . . . ' बेत आखण्याचं त्यानं सोडून दिलं. 'माणूस एखाद्या प्रसंगात स्वत:ला सामावून घेतो, आणि त्याचं आयुष्य सुकर करण्याचा प्रयत्न करतो. तो दूरवरचा विचार करत नाही आणि स्वत:ला चालू घडीमध्ये गुंतवून टाकतो. . . . . अत्यंत भयानक परिस्थित विनोद करण्याकडे त्याची प्रवृत्ती असते.' त्याच्या बाजूनं आगगाड्या जात होत्या. त्याच्याविरुद्ध दिशेला तोफा घेऊन, पण एव्हाना प्रत्येकानं आशा सोडून दिली होती की जर्मनांना थोपवता येईल. जर्मनांनी चढाई केली. तेव्हापासून त्याला छळणाऱ्या घोराहून काहीतरी वेगळं आपल्याला क्लेश देत आहे हे डोएब्लीलच्या ध्यानी आलं. 'तो होता माझ्यामधील थरथराट, काही अशी 'रेल्वे-फीवर', काही अशी भीती आणि काही वेळेला केवळ खिन्नता. . . . . मला जाणीव झाली की पराभूत लोक असे दिसतात. जेव्हा ते पळ काढतात, जेव्हा ते हसतात तेव्हाही.'

एका छोट्या स्टेशनवर विश्राम घेत असताना त्यांना माहिती झालं की, तात्पुरत्या युद्धविरामासाठी सरकारनं याचना केली आहे. ही वार्ता त्यांच्या कानी पडल्यानंतर प्रत्येकाच्या मनात वेगवेगळे विचार डोकावले. 'एखादा कुणी सुरक्षिततेसाठी एका गटाला चिकटून राहातो आणि त्याच वेळी संपूर्ण सामाजिक वीण विघटित होते. जीवनाच्या अंतीम टप्प्यावर तो येऊन पोहोचला आहे. मला ही भावना नवीन नाही. सात वर्षांपूर्वी मी ते अनुभवलं आहे, मी जर्मनीचा निरोप घेतला होता तेव्हा. . . . इतरांप्रमाणेच केवळ एक. सूत्र करून टाकणारा जबरदस्त दणका मला जाणवला. . . . त्यानं मला अगदी मुळापासून हादरवून टाकलं.' काहोरल्या प्रवासाची समाप्ती झाली. आक्रमण करणाऱ्या सैन्याच्या पार दूर टोकाला हे ठिकाण होतं. इथं प्रोपोगांडा विभाग अधिकृतरित्या विसर्जित करण्यात आला. त्याच्या होऱ्यानुसार, फायली मार्गात नष्ट केल्या गेल्या होत्या. त्यांना माहिती झालं की यापुढील सुरक्षित स्थळी स्थलांतर आणि सारे अनधिकृत असैनिकी प्रवास यावर सरकारनं बंदी घातली आहे. तरीदेखील हातपाय हलवण्याच्या आकस्मिक इच्छेनं प्रत्येकाचा ताबा घेतला :

'मी सुद्धा कळपातील एका घटकासारखा वागलो आणि वाटलं की मी आता काहीतरी ''करायला'' हवं.'

मिलिटरीकडून त्यानं स्वच्छ वर्तणुकीचा दाखला मिळवला. त्याआधारे ले प्यू येथील त्याच्या बायकोमुलाला तो भेटू शकत होता. आगगाड्या वेळेवर धावत नव्हत्या. त्यामुळं त्याला टप्प्याटप्प्यानं प्रवास करावा लागला. कधी आगगाडीमधून, कधी बसमधून. जिकरीचा प्रवास ! 'एका फ्रेंच गावाहून दुज्या गावाला जाण्याचा तो प्रवास नव्हता तर तो प्रवास होता . स्वर्ग धरामधील.' एका छोट्या गावात त्याला राहायला जागाही मिळू शकली नव्हती निर्मनुष्य स्टेशनावर त्याला रात्र घालवावी लागली होती, तिथल्या पायऱ्यावर झोप काढण्याची पाळी त्यांच्यावर आली होती. पोलीस त्याला अडवत, त्याच्यावर प्रश्नांच्या फैऱ्या झाडत : 'मी, एकाकी माणूस; संपूर्ण प्रवासात एकाकी माणूस म्हणून राहाणं मी सातत्यानं जमवलं; यातच एक लांच्छन होतं, वहिमासाठी कारण.' आपला मार्ग आखण्यासाठी त्यानं रेल्वेचं वेळापत्रक खरीदलं : 'त्या मी दर दिवशी मी पाहात होतो, मी कुठं आहे आणि मला कुठं जायचं आहे. जिथं कुठं मी होतो, तिथं मला जायचं नव्हतं. मला नेहमीच कुठंतरी अन्य ठिकाणी जायचं असायचं. मी आमुलाग्र बदलून गेलो होतो.'

रस्त्यांमध्ये आणि रेलगाड्यांमध्ये माणसांची दाटी झाली होती. त्यांच्या लोंढ्याबरोबर तो ढकलला जात होता. 'माझ्यावर एक जाळं फेकण्यात येतं. माझ्याभोवती आवळल्या गेलेल्या दोरीच्या विळख्यातून सुटका करून घेण्याचा मी शर्थीचा प्रयत्न करतो.' सरतेशेवटी, बऱ्याच दिवसांच्या भटकंतीनंतर तो एकदाचा ले प्यूला पोहोचला. दाढी वाढलेली. कपडे चिखलानं बरबरटलेले. त्याला सांगण्यात आलं, त्याची बायकोमुलगा तीन दिवसापूर्वीच तिथून निघून गेलेत. त्याला शोधायला ते (बोर्डो) Bordeaux ला गेले. तिथं सरकारनं टेंपरवारी आपलं मध्यवर्ती ठाणं थाटलं होतं. त्याला आशा वाटत होती. इंग्लंडला जाणारं जहाज तिथून तिला मिळू शकेल. पुढं काय करावं याचा तो खल करत असताना, तिच्या नावावर असलेली एक तार त्याच्या हाती पडली. दोन दिवसापूर्वी त्यानं केलेली ती तार होती. या युद्धात संपर्क साधणं मुष्किल होतं : 'टपालखातं काम करत नाही, आगगाड्या धावत नाहीत आणि जर त्या धावत्याच तर वेळापत्रकावरहुकूम नाहीत आणि प्रत्येकजण सांप्रत भलतीकडेच कुठंतरी राहातो.' फ्रासंच्या मध्यवर्ती भागात तो होता. पण त्याची गत दूरवरच्या बेटावर अडकून पडलेल्या रॉबिन्सन क्रुसोगत झाली. प्रयत्न करून करून त्याची पुरती दमछाक झाली होती; तो एकसष्ट वर्षाचा होता आणि म्हातारपण त्याला जाणवू लागलं होतं. लेप्यू जवळील Mende मांद गावी चुकल्यामाकल्या माणसांसाठींच्या कँपात त्याला आसरा मिळाला. एका बरॅकमध्ये त्यांनी त्याला भिंतीवर बसवलेली झोपायची एक फळी दिली. पुढील वाटचाल करण्याइतपत त्राण त्याच्या अंगी उरलं नव्हतं. बरेच आठवडे तो तिथून हालला नाही. काय कमावलं, काय गमावलं याचा ताळेबंद करण्याचा तो काळ होता.' कोठून आली

ही रिक्तता आणि हे औदासिन्य? शोध घेण्यासाठी मला फारसे सायास करावे लागले नाहीत. रिक्तता आधीपासूनच अस्तित्वात होती. आता ती उघड झाली एवढंच. . . . माझ्यामध्ये आजवर ठाण माडून असलेली प्रत्येक गोष्ट कवडी मोलाची आहे हे माझ्या ध्यानी आलं.'

तो गावात इथं तिथं भटकत राहिला. पराभूत फ्रांसचे पहिले वहिले दिवस न्याहाळीत. त्याच्या प्रमाणंच फ्रांस 'ट्रॉमॅटिक' धक्का अनुभवत होतं हत्यारं काढून घेण्यात आलेले सैनिक पांगवले जाण्याची प्रतिक्षा करत होते. गावातील एका हॉटेलच्या बागेत असे दोन सैनिक त्याच्या दृष्टीला पडले. त्याचं काहीतरी गुपतगू चाललं होतं. एक गुडघ्यावर टेकला होता. दुसऱ्याच्या हातात दोन डहाळ्या होत्या : 'काय करत होते ते? एव्हाना त्यांचं ते करून झालं ! त्यांनी. . . . एक फुलपाखरू पकडलं आहे !' 'नवा इस्लाम' म्हणून जर्मनांची लोकं स्तुती करू लागले होते. पहिल्या युद्धाच्या वेळी ते हूण, रानटी म्हणून ओखळले जात होते; आता 'यांच्याबद्दल आता कोणी बोलतो ते आदरानं, हां, हेव्यानं.' त्यांचे रेनकोट खरोखरीच वॉटरप्रूफ असतात असं बोललं जात होतं.

कॅंपाला मिळणारं रेशन अपुरं होतं आणि डोएब्लीनचं वजन घटत चाललं होतं. त्यानं स्वत: स्वत:चं रोगनिदान केलं. मानसिकदृष्ट्या आणि शारीरिकदृष्ट्या त्याची स्थिती 'ॲबनॉर्मल' होती. 'हा माणूस, एक फिजिशियन, त्याला कळायला हवं मी कूपोषणाचा बळी आहे. रोगट परिसरात मी जगत आहे. वेळोवेळी एका विवक्षित भ्रांतीच्या कासाविशीचा मला क्लेश होत होता; एका दुपारी, माझ्या 'बंक'च्या कडेला मी बसलो असताना, कसलाही विचार मी करत नव्हतो, माझी बायको बोलत असल्याचं मी स्पष्टपणे ऐकलं. . . .' त्याचं आयुष्य आणि जगाबरोबरचं त्याचं नातं यांचं नेमकं स्वरूप काय याचा शोध घेण्यात तो व्यग्र होता :

'मी घाबरतो माझ्याखातीर? नाझींची भीती मला वाटते? मी क्वचितच त्यांचा विचार करतो. त्यांच्यासंबंधी विचार करण्याचा मला तिटकारा आहे, त्यांची चित्रं बघण्याचाही मला तिटकारा आहे. जर्मनी सोडल्यानंतर नाझी वृत्तपत्रांना मी स्पर्श करू शकतो. तो केवळ शिसारीनं. जर्मनीमध्ये 'शार्लोट्टेनबुर्ग एक्झिबिशन ग्राऊंड'समोर नाझी मेळावा भरला होता. मेळाव्याच्या ठिकाणी ध्वज. मी तो पाहिला तेव्हा मला जाणवलेली भयकंपाची भावना माझ्या स्मरणात आहे. जर्मन दलदलीतील या हाइड्रानं, या बहुमस्तकी सापानं आपले हात आता एथवर फैलावले आहेत. हा असा दैत्य निर्माण केला ही बाब जर्मनींसाठी किती गंभीर अवमानाची आणि शरमेची. मी कुणी एखादा हर्क्युलस नाही जो दलदलीतील हाइड्रा ठार मारू शकेल. . . . . पण त्याच्या विरोधात मी स्वत: काय केलं आहे, तो नष्ट करण्यासाठी या घटकेलाही मी काय करू शकतो? कित्येक वर्षापासून हा हाइड्रा मी ओळखून होतो. . . पण माझ्यापाशी नेकीची अशी कुठली शस्त्र होती? . . . . मी नेहमी विचारत होतो; शस्त्रं माझ्या नजरेसमोर नव्हती.'

राष्ट्रीय दुखवट्याचा दिवस जाहीर झाला त्यादिवशी डोएब्लीन स्थानिक कॅथिड्रलमधील विधीला उपस्थित राहिला. बराच वेळ क्रुसावरील ख्रिस्ताच्या मूर्तीपुढं तो बसून राहिला. एक म्हातारीबाई एका रडणाऱ्या मुलाला घेऊन चर्चच्या दर्शनी भागाकडे आली आणि प्रार्थना करण्यासाठी त्यांनी गुडघे टेकले. 'मी स्वत:ला आणि क्रुसावर चढवलेल्याला जाब विचारला पण उत्तर मिळालं नाही. याहून पुढं जाणं मला अशक्य. पण रडणाऱ्या बाईची मदत मला होते.' पुढील काळात कैकदा तो कॅथिड्रलमध्ये जात होता. 'क्रुसावर चढवलेल्या ख्रिस्ताची मूर्ती मला जाऊ देत नव्हती.' तो 'आपलं प्रारब्ध' म्हणून आता जे तो मानत होता त्यासाठी ती प्रतीक बनली होती.' 'मानवी भोग, आमचा दुबळेपणा आणि असहाय्यता यांचा साक्षात् अवतार म्हणून मी काटेरी मुकुट धारण केलेल्या क्रुसावरील ख्रिस्ताकडे पाहातो.'

कँप सोडून जाण्यास डोएब्लननं अखेर शक्ती एकवटली. एक संशयित व्यक्ती म्हणून पोलिसांची त्याच्यावर नजर होती. बाहेरच्या जगाकडून त्याला एक निरोप आला. 'अरझ (Heureuse) या शब्दानं माझ्या दिशेनं उडी घेतली. मी सही वाचली. माझ्या बायकोकडून तार आली आहे. ती आणि मुलगी तुलोजला राहात आहेत.' निष्क्रियतेत बरेच आठवडे घालवल्यानंतर त्यानं त्याचा प्रवास आरंभला. 'गेले काही आठवडे आजाऱ्यागत गेले आणि मी पूर्वी जसा होतो. त्याहून त्यांनी मला वेगळा बनवला होता. तुलोज स्टेशनवर त्याची बायको-मुलगा त्याची वाट पहात होते. परंतु त्यांच्या समस्या सुटण्याची चिन्हं नव्हती. त्यांच्यापाशी फ्रेंच पासपोर्ट होते. तरीही जर्मन स्थलांतरित म्हणून परदेशस्थ नागरिकांची नाझींपाशी जी यादी होती. तीमध्ये त्यांची नावं असणार हे स्पष्ट होतं आणि युद्धविरामांच्या अटींनुसार नाझींनी मागणी करताच त्यांना त्यांच्या हवाली व्हावे लागणार होतं. त्यानं अमेरिकेतील त्याच्या मुलाला तार केली, लिहिलं 'तीन व्हिसा आणि तिकिटं' त्यानं पाठवून द्यावीत– जणू काही ती अगदी सोप्पी गोष्ट होती. परंतु त्यांनी फ्रांस सोडायचं ठरवलं तरी बाहेर जाण्याचे व्हिसाही त्यांना मिळवावे लागणार होते. स्थानिक लष्करी प्रमुखानं स्पष्ट केलं की नव्या नियमानुसार हे अशक्य आहे, जर्मनांनी मागणी करताच त्यांच्या हवाली करता यावं यासाठी जर्मन निर्वासितांना धरून ठेवणं जरूरी होतं. त्यांचा निर्णय डोएब्लीननं सकृतदर्शनी स्वीकारला, अशा परिस्थितीत दुसरं काही करणं त्यांना शक्य नव्हतं.

'मी एकटा असतो तर मी बिनविरोध राजी झालो असतो, मदत करू शकत नसल्याबद्दल दिलगिरी व्यक्त करणाऱ्या अधिकाऱ्यांबद्दल सहानुभूती बाळगली असती. . . . पण माझी बायको माझ्या बाजूनं उभी होती. सुरूवातीपासूनच, जे काही सांगितलं गेलं होतं. त्याबद्दल ती अगदी नाराज होती. ती संतप्त होती, मनापासून संतप्त, नाझींसाठी आम्हाला इथं धरून ठेवलं जाणार होतं म्हणून– या क्षणीच आम्हाला पकडून जर्मनांच्या हवाली का नाही करीत? तिचा विश्वास बसत नव्हता यावर. अधिकाऱ्यांच्या कर्तव्यभावनाशी तिला काही देणंघेणं नव्हतं. . . . ती भडकली होती आणि तिचा संताप लपवण्याचा प्रयत्न तिनं केला



अनुक्रमणिका

नाही. परिस्थिती तटस्थपणे विचारात घेण्याऐवजी, कर्तव्याविषयीच्या अधिकाऱ्यांच्या जागरूकतेबद्दल त्यांचं अभिनंदन करण्याऐवजी, त्या अधिकाऱ्यांना आमची परिस्थिती समजावून सांगितली : आमचे दोन मुलगे सैन्यात आहेत, एकाला सन्मान लाभला आहे; मी मंत्रीमंडळाचा एक सल्लागार. तिनं सांगायचं काही बाकी ठेवलं नाही आणि या 'हुकूमा'बद्दल तिला जे वाटलं ते सारं सारं सांगून टाकलं. अधिकारांच्या टेबलासमोर उभं राहून असा हुकूम आजवर ऐकलेला नव्हता, त्यावर विश्वास ठेवणंही कठीण हे सुद्धा तिनं सुनावलं. अशी कारवाई करणं ही शरमेची गोष्ट आहे आणि आम्हाला अडकवून ठेवण्याची गंभीर गरज एखाद्याला वाटावी यावरही तिचा विश्वास बसत नव्हता, त्यांनी या देशात आश्रय घेतला होता आणि त्याला पाठिंबा दिला होता. ती रडली अधिकाऱ्यांपाशी तिनं निषेध व्यक्त केला, आवाहन केलं, अधिकारी मुकाट....अधिकाऱ्यांमध्ये कुजबूज झाली, शेवटी एकजण उठला आणि त्यानं जाहीर केला ही बाब तो जनरलपुढे ठेवील. त्यानं आमची कागदपत्रं घेतली आणि तो दृष्टीआड गेला. काही मिनिटांनी तो परतला आणि म्हणाला, "तुम्हाला तुमचे व्हिसा मिळतील."

बाहेर जाण्याचा त्यांचा व्हिसा केवळ सात दिवसांसाठी होता, आणि या काळात सर्वात महत्त्वाचा अमेरिकन व्हिसा मिळवायचा होता. मार्सेल्लेसमधील यु. एस्. व्हाइस काउन्सेलच्या ऑफिसाबाहेर लोकांची प्रचंड रांग लागली होती. त्यापैकी बऱ्याच जणांना हे निष्फळ असल्याचं जाणवत होतं. तरीही आपले जीव बाचवण्याचा अखेरचा निकटाचा प्रयत्न ते करत होते. आल्फ्रेड पोल्गारच्या तिखट शब्दात सांगायचं तर 'आम्हाला वाचू शकणारे व्हिसा देणं ज्यांच्या मर्जीवर अवलंबून होतं त्या वकिलांपेक्षा हिटलर चपळ होता.' डोएब्लीन बर्लिन- पॅरिसमध्ये ज्यांना ओळखत होता असे बरेचजण प्रतिक्षा करणाऱ्या निर्वासितांमध्ये होते. 'भीती आणि घोर लागलेला असूनही, प्रत्येकजण समजत होता की नाझी केवळ त्याच्याच पाठीमागं आहेत, अजबच ! खतरनाक वा स्फोटक असं आपण काही लिहिलं आहे वा बोललो आहे हे प्रत्येकजण आठवण्याचा प्रयत्न करत होता. प्रत्येकजण आपल्या गफलतींचा स्वत:शी घडगत नसल्याचं धरून चालला होता.'

परंतु पुन्हा एकवार डोएब्लीन हा एक 'स्पेशल केस' ठरला. त्याच्या बायकोचं प्रसंगावधान कामी आलं. तिच्या नवऱ्याला आदल्या वर्षी व्हाइट हाऊसचं भोजनाचं निमंत्रण आलं होतं. त्या समारंभाची निमंत्रण-पत्रिका तिनं जपून ठेवली होती. ती तिनं व्हाइस कॉन्सला पुढं ठेवली. 'तो विलक्षण प्रभावित झालेला दिसला. तो उठला आणि दुसऱ्या खोलीत येण्याचं आमंत्रण केलं, त्याच्या स्वत:च्या खोलीत. : . . .' अमेरिकेमधील त्याचे मित्र स्वस्थ बसले नव्हते. न्यूयॉर्कमधील 'इमर्जन्सी रेस्क्यू कमिटी' करवी त्यांच्यासाठी 'इमर्जन्सी व्हिसा' मिळवण्यात आले होते. लिस्बन ते न्यूयॉर्क या त्यांच्या तिकिटांचे पैसे मिसेसे डडली वड्सवर्थ, एरिका मान, लोट्टे लेहमान आणि ब्रूनो वॉल्टर यांनी उभे करून ते त्यांच्याकडे

रवाना केले होते. त्यांची सारी कागदपत्रं, स्पॅनिश आणि पोर्तुगीज 'ट्रान्झिट व्हिसा' सर्व काही रितसर पार पडलं. परंतु नवीन अडचण उद्भवली. डोएब्लीनला सांगण्यात आलं की, पॅरिसमधील बँकेच्या त्याच्या खात्यातून त्याला पैसे काढता येणार नाहीत. म्हणजे लिस्बनपर्यंतच्या तिकिटासाठी खिशात दमडी नव्हती. अगदी अखेरच्या क्षणी फ्रेंच स्कूलचा एक संचालक त्यांच्या मदतीसाठी पुढं आला. ओळखदेख नसतानाही. डोएब्लीनची अडचण त्याच्या एका मित्रानं सहजच त्या संचालकाच्या कानावर घातली आणि त्यानं त्यांना गरज असलेले चार हजार फ्रँक्स त्यांना उसने दिले.' त्यानं त्याच्या जाकिटाच्या खिशात हात घातला, त्याचं पैशाचं पाकीट काढलं आणि आमच्या हाती दिले. रसीट घेण्यास त्यानं नकार दिला. लवकरात लवकर ते परत करण्याचं आश्वासन आम्ही दिलं. त्यानं आमचे आभारही स्वीकारले नाहीत; आम्ही अडचणीत सापडलो होतो, याहून अधिक काही त्याला करता येत नाही याबद्दल त्यानं दिलगिरी प्रदर्शित केली, आम्हाला प्रोत्साहन दिलं, आमचे हात हाती धरले. . .' त्यांच्या पासपोर्टची मुदत संपण्याआधी हद्दी बाहेर पडता यावं म्हणून त्यांनी अखेरची ट्रेन पकडली. 'आमच्या बाबतीत जे घडलं होतं त्यानं प्राचीन ग्रीक पुराणकथेतील नाविकांचं स्मरण करून दिलं. जबड्यागत मिटल्या जाणाऱ्या दोन सरकत्या सुळक्यांमधील एका सामुद्रधुनीमधून त्यांना वल्हवत जायचं होतं. त्यातील बरेचजण पकडले गेले आणि त्यांना जीवे मारण्यात आलं; एकच काय तो निसटला.'

डोएब्लीनसारख्यांना वाचवण्यासाठी न्यूयॉर्कमध्ये घाईघाईनं 'इमर्जन्सी रेस्क्यू कमिटी' स्थापन करण्यात आली होती. ती स्थापन करण्यात 'नेवार्क विद्यापीठा'चा फ्रँक किंग्डन, 'स्मिथ कॉलेज'चा विल्यम ॲलन नील्सन, 'न्यू स्कूल'चा आल्विन जॉन्सन, 'येल'चा चार्ल्स सेमॉर, 'हंटर कॉलेज'चा जार्ज शूस्टर, डोरोथी थॉम्पसन, इन्ग्रीड वॉरबर्ग आणि रेडिओ समालोचक रेमंड ग्रामस्विंग इत्यादी मान्यवरांनी पुढाकार घेतला होता. किंग्डननं स्पष्ट केल्यानुसार त्यांचा हेतू, 'हिटलरमुळं ज्यांच्या जीविताला धोका उत्पन्न झाला आहे अशा लक्षणीय कलावंतविचारवंत. . . . . जे युरोपियन संस्कृतीचे 'ट्रस्टी' होते – सोडवणूक करणं.' या कमिटीच्या अनेक योगदानांपैकी एक महत्त्वपूर्ण योगदान म्हणजे व्हिसावरील निर्बंध सरकारला शिथिर करायला लावणं. पहिल्या वर्षी तिनं सहाशेहून अधिक जीव वाचवले. यात हीनरीक आणि गोलो मान, लिऑं फुक्टवाग्नेर, लिओन्हार्ड फ्रँक, हान्स हाल्दे, फ्रिडरिख तोरबेर्ग, आल्फ्रेड नॉयमान, फ्रिट्ज फॉन उन्रूह, फ्रांझ वेरफेल व त्याची बायको अल्मा माहलर, हान्स साह्ल, कुर्ट वोल्फ, मार्क छागाल, जाक लिपचिट्झ, मॅक्स अर्न्स्ट आणि आन्द्रे ब्रेताँ यासारखी मातब्बर मंडळी होती.

डोएब्लीन सहकुटुंब सहपरिवार लिस्बनला पोहोचला. तेव्हा तिथं सकाळचे दोन वाजले होते. फ्रांसमध्ये ब्लॅकआउटची सवय झालेल्या या पाहुण्यांना रस्त्यावरील झगमगीत उजेड सुखद वाटला. 'लिस्बननं प्रकाश, संगीत आणि हास्य यांनी आमचं स्वागत केलं.' न्यूयॉर्कला

त्यांना घेऊन जाणाऱ्या बोटीची वाट पहात त्यांना चार आठवडे काढावे लागले. जर्मनी, ऑस्ट्रिया आणि झेकोस्लोवाकिया येथील निर्वासितांनी बोट खच्चून भरली होती. 'त्या साऱ्यांपाशी उपजीविकेचं साधन उरलेलं नव्हतं..... आता त्यांनी काय करायचं? तोच जुना गाडा ढकलणं पुढं चालू? त्यांना एवढंच ठाऊक होतं ते अमेरिकेला निघाले होते.... ते अस्वस्थ होते. अमेरिकेला पोहोचणं एवढीच साऱ्यांची इच्छा होती.'

कॅलिफोर्नियामध्ये डोएब्लीनसाठी एक नोकरी वाट पहात होती. मार्लिन डिट्रिज, ऑट्टो प्रेमिंगर, विल्यम वायलर, अर्न्स्ट ब्लूबरिथ आदि बर्लिनमधील चित्रपट व्यवसायातील नामवंत माणसं त्याच्या आधीच हॉलिवूडला जाऊन पोहोचली होती. त्यांनी 'युरोपिअन फिल्म फंड' स्थापन केला होता व 'इमर्जन्सी रेस्कू कमिटी'च्या बरोबरीनं ते कार्यरत होते. जर्मन चित्रपटवाल्यांनी 'वॉर्नर ब्रदर्स' आणि 'मेट्रो गोल्डविन मेयर' यांच्या चालकांना सांगून तेरा निर्वासित लेखकांना 'इमर्जन्सी व्हिसा' मिळवून दिला होता. कारण देण्यात आलं होतं : पटकथा लेखक म्हणून त्यांच्याशी एक वर्षाचा करार करण्यात आला आहे. या पटकथा–कारांचा पगार ठरवण्यात आला होता. आठवड्याला शंभर डॉलर्स. 'एम्‌जीएम्‌'च्या यादीत डोएब्लीन, वॉल्टर मेहरिंग, आल्फ्रेड नॉयमान, हिनरिक मान, लिओनार्ड फ्रँक व आल्फ्रेड पोल्गर ही लेखक मंडळी होती.

त्यांची जी व्यवस्था करण्यात आली होती. त्याबाबत डोएब्लीनची चुकीची समजूत झाली होती. त्याचं 'दुसरं स्थलांतर होतं न्यूयॉर्क व तिसरं लॉस एन्जेलिस.' 'एम्‌जीएम'ला या निर्वासित लेखकांचा तसा काही उपयोग नव्हता. करार हा केवळ सांघिक परोपकाराचा एक प्रकार होता. असं असलं तरी वय झालेल्या हिनरिक मानप्रमाणंच त्यालाही प्रत्येक दिवशी दहा ते पाच ऑफिसमध्ये हजेरी लावावी लागत होती. 'पण मी चारलाच घरी निघतो. खरं सांगायचं म्हणजे इथं कुणीच काम करत नाही. अजिबात नाही. कशावरतरी आम्हीला काम करावं लागेल असं सांगण्यात येतं, पण ती निव्वळ एक अफवा आहे. आम्ही आमचा पत्रव्यवहार करतो, फोनवरून मित्रांशी बोलतो, वर्तमानपत्रं वाचतो, आमचं लिखाण करतो... ते का? तसा प्रघात आहे.' 'एम्‌जीएम्‌'च्या 'पेरोल'वर असतानाच 'फेटफूल जर्नी'चा बराचसा भाग त्यानं लिहिला. शेवटी 'मिसेस मिनिवेर'वर पटकथा लिहिण्याचं काम त्याच्यावर सोपवण्यात आलं. जॉर्ज फ्रोएस्चेलला या पटकथेसाठी अॅकॅडम अॅवार्ड मिळालं. त्याच्या म्हणण्यानुसार या पटकथेसाठी डोएब्लीननं चाळीस अप्रतिम पानांचा मजकूर लिहिला होता. त्यातील बराचसा भाग संकलकाच्या कात्रीनं छाटून टाकण्यात आला असला तरी शाबूत राहिलेल्या भागातील 'डंकर्क एपिसोड' बव्हंशी त्याच्या कल्पनेवर आधारित होता. नंतर 'रँडम हार्वेस्ट'वर एक सल्लागार म्हणून त्याला बोलावण्यात आलं. स्मृतिभ्रंशावरील ही कहाणी. नायकाला दोन वेळा स्मृतिभ्रंश होतो आणि एकाच स्त्रीवर तो दोन्ही वेळा प्रेम करतो. डोएब्लीनचं त्यावरील मत: 'ती बेस्ट सेलर आहे, पण अत्यंत खोट्टंखोट्टं पुस्तक.'

वैद्यकीय पदवीसाठी ज्यानं सायकोसिसच्या स्मृतिभ्रंशावर काही प्रकारातील प्रबंध लिहिला होता. त्याच्यावर पटकथेची सत्यता पहायची जबाबदारी सोपवण्यात आली होती – 'हरे राम!'

चित्रपट कराराचं नूतनीकरण करण्यात आलं नाही आणि डोएब्लीन मिळकतदार बेकारांपैकी एक झाला. 'मी इथं' लॉस एन्जेलिस पब्लिक लायब्ररी'च्या हॉलिवूड शाखेत बसतो आणि पुस्तकं आणि वर्तमानपत्रं चालतो. दुपारी कॅफेमध्ये न जाता प्रत्येकजण इथं येऊन बसतो. दर दिवशी मी तीन ते पाच फेरफटका मारतो, अगदी खगोलशास्त्रीय काटेकोरपणानं, आणि यातच माझा दिवस संपतो. स्वत:ला घरं म्हणवणारी ड्रगस्टोअर आणि टपऱ्या यांनी भरलेल्या या वैराण भागात आहे काय करण्याजोगं?' शोएनबर्गप्रमाणंच Guggenheium गुगनहाईम फेलोशिप मिळवण्यात तो अपेशी ठरला. त्याच्या अर्जावर थॉमस माननं त्याला प्रशस्ती दिलेली असूनही पाच वर्षं त्याचं साहित्य प्रकाशित झालं नव्हतं, शक्यताही नव्हती. 'युरोपियन फिल्म फंड' आणि त्याचे निर्वासित स्नेही यांच्याकडून त्याचा मुलगा पीटर याला दरमहा १२० डॉलर मिळत त्यावर त्याला गुजराण करावी लागत होती. 'लेखकाजवळ पैसे नसणं आणि दुसऱ्याच्या आर्थिक मदतीवर जगणं, जे मी (आणि इतर) करत आहोत तसं– हे अगदी लांच्छनास्पद आहे.' त्याला वाटत होतं केवळ 'वेळ घालवण्यासाठी' तो लिहित राहिला होता. त्याला अमेरिका आवडली होती – 'इथलं मानसिक वातावरण अगदीच भिन्न आहे. ही माणसं स्नेहपूर्ण आहेत, आणि युरोपिअनांपेक्षा त्यांची वाढ निकोप आहे, व्यक्तिगत स्वातंत्र्याला ते प्रथम स्थान देतात, धंदेवाईक दृष्टी सुदृढ आहे आणि या समाजाची धार्मिकता आश्चर्य वाटावी एवढी सुलभ आणि उथळ आहे.' मेख होती ती ही की यात आविष्कारवादी जर्मन कादंबरीकाराला स्थान नव्हतं.' आम्ही युरोपिअनांनी अमेरिकनांबरोबर संपर्क कसा साधायचा आणि त्यांच्या लेखी आम्हाला तरी कितीसं महत्त्व !'

१९४३ मध्ये त्याच्या पासष्टाव्या वाढदिवशी,'लॉस एन्जेलिस परदेशस्थ कॉलनी'नं डोएब्लीनला दाखवून दिलं की त्याचं विस्मरण झालेलं नाही. त्याचे जवळजवळ दोनशे चहाते हा प्रसंग साजरा करण्यासाठी 'सान्ता मोनिका' सभागृहामध्ये जमले होते. *हिनरिक माननं* भाषण केलं. बर्थोल्ड व्हिएर्टेलनं अभिनंदनपर संदेश वाचून दाखवले. यात *थॉमस मान,* फ्रांझ वेर्फेल आणि लिआँ फ्युक्टवागनेर यांचे संदेश होते. हे तिघेही जण प्रेक्षकात बसलेले होते. पीटर लॉर्‌टे, अलेक्झांडर ग्रानाक, फ्रिट्ज कार्टनेर यांनी डोएब्लीनच्या पुस्तकातील उतारे वाचून दाखवले. हान्स एइसलेर (EISLER) आणि अर्न्स्ट टोक यांनी पियानोवादन केलं आणि ब्लान्डिन एबिन्जरनं बर्लिन कॅब्रे गीतं म्हटली. समारोपासाठी डोएब्लीन दोन शब्द बोलण्यासाठी उभा राहिला. जार्ज फ्रोएश्चेलनं आठवण दिली आहे, तो



अनुक्रमणिका

असं काही बोलला त्याचा कुणालाच अर्थबोध झाला नाही. 'फक्त आदि शेवटी आमच्या ध्यानी आलं हा एक श्रद्धेचा व्यवसाय आहे आणि डोएब्लीनं आम्हाला सांगत होता की फ्रांसमध्ये त्याची पळापळ चालू असताना त्यानं आत्मिक परिवर्तन अनुभवलेलं होतं. कुणालाही कळलं नाही त्याच्या भाषणाची संगती कशी लावायची, काहीशा संभ्रमित अवस्थेत बरेचसे बाहेर पडले.' लुडविब मार्क्युझ म्हणतो की, या स्थलांतरित काळात जेवढे विचित्रपूर्ण वाढदिवस साजरे झाले त्यातील हा सर्वात विरूप.

वस्तुत: १९४१च्या नोव्हेंबरमध्ये डोएब्लीननं औपचारिकरित्या कॅथॉलिक धर्म स्वीकारला होता. परंतु त्यानं त्याची वाच्यता कुणाजवळ केली नव्हती. ती त्याची 'खाजगी बाब' होती. 'अंधाधुंदीच्या काळात माझ्या माणसांवर कुणी पाठीमागून हल्ला करू नये' म्हणून ही खबरदारी घेतली गेली होती. पुढं Der unsterbliche Mensch देर उन्टरब्लीशे मेनश ('माणूस अमर आहे') या पुस्तकात त्यानं त्याच्या या नवीन श्रद्धेवर उघडपणे लिहिलं आहे. सॉक्रेटिसनं अवलंबिलेल्या संवादतंत्राचा वापर करून 'श्रद्धेच्या अभौतिक वैशिष्ट्या' संबंधीचे त्याचे विचार त्यानं मांडले आहेत. त्याच्या मित्रांना तो सांगतो : मी ख्रिश्चानिटीबद्दल बोलतो आहे आणि ज्यू धर्माचा हा नैसर्गिक वाढीव भाग आहे. एकच रेषा एकाकडून दुसऱ्याकडे जाते. . . . 'प्रस्तुत पुस्तक म्हणजे डोएब्लीनच्या जुन्याच विषयाची पुनरावृत्ती आहे. त्याची पुरेपूर खात्री झाली होती : 'युद्ध समाप्तीनंतर आपण सारे बांधव आहोत या संदेशाचा पुन्हा एकवार सन्मान केला जाईल.'

परंतु युद्धोत्तर युरोपचं वास्तव त्याच्या अपेक्षा पूर्ण करण्यात अपेशी ठरलं. जर्मनीमध्ये परतणाऱ्या निर्वासित लेखकांमध्ये डोएब्लीन हा पहिला : फ्रेंच नागरिक आणि माजी 'प्रोपॅगँडिस्ट' म्हणून जर्मनीच्या निदान फ्रांसव्याप्त विभागाच्या पुनर्शिक्षणाच्या योजनेंत त्यानं सक्रीय सहभागी व्हावं यासाठी त्याला विचारण्यात आलं. बहुरूपी डॉ. डोएब्लीनसाठी हे आणखीन एक नाट्यात्मक रूपांतरण. १९४५च्या सप्टेंबरमध्ये हॉलिवूडमधील 'नॉर्थ सिक्थ ॲव्हेन्यू'वरील एका सामान्य अपार्टमेंटमध्ये रहाणारा तो एक कफल्लक होता; नोव्हेंबरमध्ये त्यानं बाडेन-बाडेनमध्ये पाऊल टाकलं. फ्रेंच कर्नलच्या युनिफॉर्ममध्ये. हुद्दा Charge de mission (चार्ज द मिस्सिऑं) त्याच्यावर सोपवण्यात आलेल्या शिक्षण क्षेत्रातील कार्याला त्यानं प्रारंभ केला. शिवाय साहित्यिक सल्लागाराची भूमिकाही त्यानं स्वीकारली.

'काहीतरी उपयुक्त असं करू शकेन' हा विश्वास बाळगून तो जर्मनीत परतला होता पण बाडेन-बाडेनमधील परिस्थिती उत्साहवर्धक नव्हती, किंबहुना उमेद खच्ची करणारीच होती. तो जिथं राहात होता, काम करत होता तिथले क्वार्टर्स खच्चून भरलेले होते. त्याच्या कर्नल हुद्याला न शोभणारे. दरदिवशी प्रवाशांनी भरभरून वाहाणाऱ्या ट्राममधून तो जात येत होता. एटीएत्रबरोबर एर्ना डोएब्लीन पॅरिसला राहिली होती. तो अजून शाळकरी विद्यार्थी होता.

भूमिगतांमध्ये सामील होऊन क्लाडसनं जीव वाचवला होता व तो नाइसमध्ये स्थायिक झाला होता. त्याचा दुसरा मुलगा वोल्फगांगसंबंधी १९४०च्या जूनपासून काहीच कळलेलं नव्हतं. परंतु Vosges वासजेस मध्ये जर्मनांनी फ्रेंचाना खडे चारल्यानंतर, शत्रूकडून अटक होण्यापरीस आत्महत्या करणं त्यानं पसंत केलं हे बऱ्याच दिवसांनी डोएब्लीनला कळलं होतं. त्याच्या या शूर पुत्राला त्याच्या मर्दुमकीसाठी Croix de gurre (क्राय ड गार) देण्यात आलं होतं. 'डोएब्लीन सेंट्रल लिमिट प्रमेया'मुळे विद्यार्थीदशेत एक गणितज्ज्ञ म्हणूनही त्यानं नाव कमावलं नाही.

१९४६च्या प्रारंभी त्याच्या एका परिचित स्त्रीनं त्याला लिहिलं होतं की, ती नाझींचा मनस्वी तिरस्कार करते. तिला उत्तरादाखल पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं : 'माझ्या तिरस्कारावर मी जवळजवळ मात केली आहे.' तो परतला होता केवळ मायबोलीच्या ओढीपोटी. युवान गोल्लला त्यानं लिहिलं होतं : 'तुम्हाला लोकांमध्ये मिसळायला हवं, त्यांच्यामध्ये राहूनच भाषा ऐकायला हवी आणि तिथल्या तिथंच ती बोलायला हवी.' तथापि, त्यानं अपेक्षिलेल्यानुसार हे 'घरी' येणं नव्हतं.' 'मी जेव्हा परतलो तेव्हा मी परतलोच नव्हतो. जो निघून गेला होता तो तुम्ही नसता आणि ज्या घरात तुम्ही राहात होता ते तुम्हाला कधीच सापडू शकणार नाही.' नाझीवादाच्या बारा वर्षांनंतर त्याला आढळून आलेल्या जर्मनीची आध्यात्मिकदृष्ट्या उपासमार चाललेली होती आणि याचं भान त्या देशाला नव्हतं ही चिंतेची बाब होती. सुरूवातीला त्याला वाटलं, १९३३ मध्ये जे मोठ्ठं स्थलांतर झालं. त्यामुळे निर्माण झालेली पोकळी भरून काढता येणं शक्य आहे. त्यानं Das Goldene Tor दास गोल्डेन टोर ('सुवर्ण फाटक') हे साहित्यिक मासिक काढलं आणि नाझी-विरोधी लेखकांची साहित्य अकादमी स्थापन केली. 'आमचा हेतू आहे जुनी लष्करी प्रवृत्ती हटवायची आणि तिच्या जागी काहीतरी चांगल रूजवायचं, एकेकाळी जर्मनीमध्येही अस्तित्वात होती. ती प्राचीन युरोपिअन, ख्रिश्चन, मानवतावादी नीतिप्रणाली पुन:श्च जर्मनीमध्ये स्थापित करायची.' काही लोकांनी खुल्या मनानं त्याचं स्वागत केलं, बाकीचे 'प्रबोधन' आणि सद्हेतू याबाबत एकतर उदासीन राहिले नाही तर प्रखर विरोधक बनले. त्याच्या ध्यानी आल्यानुसार, समस्या अशी होती की प्रोपागँडाच्या प्रचाराच्या माऱ्यात ते एवढे डुबून गेले आहेत की आपल्या बाबतीत काय झालं आहे हे अद्याप त्यांना कळून आलेलं नव्हतं :

'जणू काही ते गंजून गेले आहेत. त्यांच्यापाशी विचारांचा अगदी छोटासा साठा आहे. जो त्यांच्यामध्ये गिरमिटवून घुसवलेला आहे, त्या आधारेच ते काम निभावतात; त्यातून त्यांना खेचून बाहेर काढणं कठीण आहे. नाझी राजवटीचा तो वारसा आहे आणि त्या कारणासाठीच साऱ्या आवाहनांची ते उपेक्षा करतात आणि त्यांच्या प्रबोधनसाठी काढलेल्या हस्तपुस्तिकांचा त्यांच्यावर काही परिणाम होत नाही आणि संतप्तपणे त्या वाचल्या जातात,

जणू काही हुकूमशहा अद्याप या भूमीवर राज्य करत आहे आणि म्हणूनच अपराधी भावनेच्या प्रश्नावर कुणी चर्चा करू शकत नाही. यामुळेच, ज्यांच्यापाशी दुसरे विचार आणि संकल्पना आहेत, त्यांच्यापैकी कुणाशीही राजकीय चर्चा करण्यास ते विरोध दर्शवतात.'

भग्नावस्थेतील बर्लिनमध्ये बोलण्यासाठी त्याला आमंत्रित करण्यात आलं. या शहराच्या सुवर्ण काळाचा बखरकार म्हणून बर्लिनकर त्याला ओळखत होते. जिथं एके काळी दुतर्फा झाडी असलेला देखणा रूंद रस्ता होता. तिथं भग्न अवशेष इतस्त: विखुरले होते. 'शहराची सारी संपत्ती उधळून देण्यात आली होती. भग्नावस्थेतील घरांमध्ये, काही दुकानं : ते घरगुती वस्तू, फुलं विकतात. अलेक्झांडर प्लाट्झवरील भव्य 'टिएट्झ डिपार्टमेंट स्टोअर' राजमहालाच्या थाटात एके काळी दिमाखाने उभा होता, बाँब वर्षावात त्याचे तुकड तुकडे झाले होते. 'ज्याची मान मोडण्यात आली आहे आणि ज्याची कवटी खाली त्याच्या छाताडात ढकलून देण्यात आली आहे' अशा माणसागत तो आता दिसत होता. काळ आणि खुनी यांनी त्याचं शहर असं काही बदलून टाकलं होतं की ते त्याला ओळखता येईनासं झालं होतं. 'मी मलाच विचारतो, इथं मी प्रत्यक्षात काय करत आहे? मी दूर पळून जायला नको आणि हे काहीही पाहाणं टाळायला नको? त्यांनी स्वत:ची अप्रतिष्ठा करू दिली आहे.' तथापि, त्याच्या भावना होत्या एखाद्या शोक करणाऱ्याच्या. 'जे जीवनानं परिपूर्ण होतं त्या तेज:पुंज, कोलाहलानं गजबजलेल्या, आशादायी शहरासाठी मी विलाप करत आहे. तिथल्या विश्वासू आणि कष्टाळू लोकांसाठी मी विलाप करत आहे.'

जर्मनीला पुनर्शिक्षण देण्याचा काही वर्ष झटून प्रयत्न केल्यानंतर डोएब्लीन पुढील निष्कर्षाप्रत पोहोचला : तिचं 'मुंडीछाट साहित्य' पूर्वस्थितीस येण्यास बराच काळ लोटावा लागणार. नागरतेचा प्रवाह भीषणरित्या खंडित करण्यात आला होता. 'यावर कुणाला तरी बरीच वर्षं खल करावा लागणार आहे.' १९५३ मध्ये,'फेडरल रिपब्लिक'चा पहिला अध्यक्ष Theoder Heuss थिओडर हऊस (THEODER HEUSS) याला त्यानं लिहिलं होतं की,'याचं स्वगृही परतणं त्याचं यापूर्वी वर्णन केल्यानुसार काहीशी 'लांबवलेली' आणि 'माहितीपूर्ण' भेट होती. त्याची पुस्तकं पुन्हा बाजारात येऊ न देण्याच्या घेतलेला पवित्रा, त्याबाबत पाळण्यात येत, असलेलं मौन, मूक बहिष्कार; 'जर्मन सार्वजनिक जीवनात' अत्यंत महत्त्वाच्या तद्वतच सामान्य जागा नाझींनी भरलेल्या होत्या. यामुळं तो कातावला, कडवट बनला. त्यानं जर्मनीला रामराम ठोकला. तो पॅरिसला गेला. आता तो सत्तरीच्या मध्यावर होता आणि 'पॉलीन्युरिटस'नं त्याला जवळजवळ पांगळा केला होता. तरीही 'मी लेखन थांबवत नाही, लेखन आणि लेखन. . . . म्हणजे विचार करणं आणि कल्पनेच्या भराऱ्या मारणं.' १९५३ मध्ये लुडविग मार्क्यूझनं त्याचं नाव 'नोबेल पारितोषिका'साठी सुचवलं होतं, पण काही निष्पन्न झालं नाही. त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या काळातील महत्त्वाचं, लक्षणीय



अनुक्रमणिका

पुस्तक : 'हामलेट दि लांग निम्मत आईन एन्डे ('हॅम्लेट अर्थात प्रदीर्घ रात्र संपायला येते')– भोग आणि प्रायश्चित्त यांची डोस्टोएवस्की पद्धतीची कादंबरी. पश्चिम जर्मनीतील प्रत्येक प्रकाशकानं ती नाकारली होती. त्यानंतर पूर्व जर्मनीत तिला प्रकाशक लाभला.

जर्मनीला तो अखेरचा परतून आला 'ब्लॅक फॉरेस्ट'मधील एका सॅनिटोरियममध्ये पेशंट म्हणून दाखल व्हायला. त्याचं निधन होण्याआधी थोडेच दिवस आधी मार्क्युझ त्याला भेटायला तिथं गेला होता. 'डॉक्टरांनी (चुकीचं) सांगितलं की आणखीन तीनेएक दिवस तो काढेल. नर्सकडून त्याला भरवावं लागत होतं– आणि माझ्याशी तो चांगला बोलला, पत्राशीतील जर्मनांवर हिरीरीनं हल्ला चढवत. तो कडवटही झाला होता, तरीही सर्वात महत्त्वाचं तो नष्ट होण्यातला नव्हता, त्याची मुस्कटदाबी कोणी करू शकत नव्हता.' २८ जून १९५७ रोजी डोएब्लीन फ्रिबुर्गजवळील एम्मेनडिनगेनमधील हॉस्पिटलमध्ये निधन पावला, आणि Vosges व्होसजेसमध्ये युद्धात मृत्युमुखी पडलेल्या त्याच्या मुलाशेजारी त्याचं दफन करण्यात आलं. त्याच्या मृत्यूनं त्याच्या पुनरुज्जीवनाच्या प्रारंभाची चाहूल दिली होती. १९६० साली एका स्वीस प्रकाशकानं त्याच्या साहित्याचे खंड प्रकाशित करण्याचे ठरवले, त्यानुसार छपाई सुरूवात केली. आतापावेतो असे सतरा खंड बाजारात आले.

कन्फ्यूशिअसच्या व्यक्तिमत्वाच्या विश्लेषणाची सुरूवात करताना डोएब्लीननं म्हटलं होतं : 'हा एकाकी, नैराश्यग्रस्त माणूस, आता त्याच्या घडामोडीपूर्ण आयुष्याच्या अखेरीस पोचला आहे. ज्याच्या पायाच्या दगड त्यानं घातला होता. त्यावर घर बांधण्याची परवानगी त्याला देण्यात आली नव्हती. . . . पक्व होण्यासाठी प्रत्येक गोष्टीला वेळ हवा असतो.' डोएब्लीनच्या मृत्यूनंतर एका दशकानं जर्मन लेखकांच्या नव्या पिढीचं एक महान साहित्यिक 'मॉडेल' म्हणून त्याचा उदय झाला. 'माय टिचर डोएब्लीन' या निबंधात गुंटर ग्रास (ज्याची त्याच्याशी जानपहेचान नव्हती) लिहितो : 'तो शांतपणे पडून राहिला नाही. तरीही तो "पोहोचला" नाही. बुद्धिप्रामाण्यवादी डाव्यांसाठी तो तद्दन कॅथॉलिक होता, कॅथॉलिकांसाठी तो जहाल अराजकवादी होती, नीतिवाद्यांसाठी पुरेसा आज्ञावाचक नव्हता, रेडिओच्या कविता-तासासाठी फारच ओबडधोबड होता आणि शाळेच्या अभ्यासक्रमासाठी फारच रांगडा होता.' परंतु त्याचबरोबर 'तो तुम्हाला अस्वस्थ करील, तुमच्या स्वप्नांना सतावेल; गिळून टाकणं तुम्हाला कठीण जाईल, चांगली चव लागणार नाही त्याची; तो पचणं अशक्य आणि तुम्हाला न मानवणारा. जो कुणी त्याचं वाचतो त्याला तो बदलून टाकतो.'

**(आधारित)**



अनुक्रमणिका

# लेखक आणि त्याच्या कादंबरीतील व्यक्ती

## जोसेफ कॉनरॅड –अलमायेर्स फॉली-तील सांम्बीर

- नाना जोशी

**(१) जोसेफ कॉनरॅड यांचा जीवनपट**

| | |
|---|---|
| ३ डिसेंबर इ. स. १८५७ - | दक्षिण पोलंड मधील युक्रेन भागात जन्म. |
| इ. स. १८६१ - | वार्सा शहरात आगमन. |
| इ. स. १८६२ - | रशियात व्होलगाड या ठिकाणी वास्तव्य. कॉनरॅड यांच्या वडिलांना पोलंडच्या स्वातंत्र्य लढ्यात त्यांनी भाग घेतला या कारणाने पोलंड सोडून रशियात जावे लागले. |
| इ. स. १८६५ - | कॉनरॅड यांच्या आईचा मृत्यू, युक्रेनमध्ये पुन्हा आमगन. आपल्या काकांकडे शिक्षणासाठी पांच वर्षे वास्तव्य. |
| इ. स. १८६९ - | वडीलांची प्रकृती ढासळल्यामुळे त्यांना घरी परतण्यास परवानगी देण्यात आली. |
| इ. स. १८६९ - | २३ मे रोजी वडीलांचा मृत्यू. |
| इ. स. १८७४ - | पहिले समुद्रपर्यटन. निरनिराळ्या प्रवास-माल वाहतुक बोटीवर नोकरी. फ्रान्समध्ये मर्सिलस येथे वास्तव्य. स्पेन मधील बंडखोरांना बंदुका पोचविण्याचा चोरटा व्यवसाय. कार्लीस्ट बंडात भाग. |
| इ. स. १८७८-८६ - | इंग्लंडमध्ये आगमन. इंग्लिश फारसे येत नसूनही १८८० साली तीन परीक्षा दिल्या. पहिली सेकंड मेट. दुसरी चिफ मेट. तिसरी मास्टर्स ही परीक्षा इंग्लंडमध्ये आल्यानंतर उत्तीर्ण झाले. इंग्लिश बोटीवर नाविक म्हणून नोकरी. |
| इ. स. १८८६-९४ - | निरनिराळ्या प्रवाशी-मालवाहतुक करणाऱ्या आगबोट कंपन्यात अधिकारी पदावर नोकरी. १८८६ ते १८८९ च्या दरम्यान इंडोनेशिया, मलाया इत्यादी पूर्वेकडील देशात प्रवासी माल वाहतूक. याच ठिकाणी त्यांना अलमायेर्स फॉलीत त्यांनी चित्रित केलेल्या व्यक्ती भेटल्या |



अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| | होत्या. इ. स. १८९० कांगोची सफर. याच काळात त्यांनी लेखनास सुरुवात केली. |
| इ. स. १८९४ - इ. स. १८९६ - | प्रेमात पडतात. विवाह. |
| इ. स. १८९७ - ९८ - | साहित्य जगतात मैत्री. एक लेखक म्हणून मान्यता. |
| इ. स. १८९८ - १९०२ - | प्रख्यात संपादक फोर्ड मॅडॉक्स फोर्ड यांच्याशी मैत्री. पेंट फार्म येथे वास्तव्य. |
| इ. स. १९०१ - १९०४ - | पहिली सात पुस्तके सहा वेगवेगळ्या प्रकाशकानी प्रसिद्ध केली. कॉनरॅड यांचे प्रकाशकाशी नीट जमतच नसे त्याचा हा पुरावा.इ.स. १९०७ साली ते मेथ्यूअन (METHUEN) या प्रकाशकाकडे. मधूनमधून ॲलन अनविन हा प्रकाशक. |
| इ. स. १९०४ - | जे. बी. पिंकर यांच्याशी मैत्री. पुस्तक प्रकाशनाच्या बाबतीत ते त्यांचे प्रतिनिधी म्हणून वावरतात. पिंकर यांच्या मैत्रीमुळे कॉनरॅड हे तसे मानसिकदृष्ट्या स्थिरावतात. |
| इ. स. १९१० - १९१३ - | अमेरिकेतील डबल-डे कंपनी कॉनरॅड यांची पुस्तके त्या देशात प्रसिद्ध करण्यास सुरुवात करते. मानसिक अस्वास्थ. यशस्वी लेखक म्हणून मान्यता. |
| इ. स. १९१४ - १५ - | पोलंड या मायदेशाला भेट. |
| इ. स. १९१६ - १७ - | जेन अँन्डरसन प्रकरण. हे प्रेम प्रकरण चांगले तीन वर्षे गाजले |
| इ. स. १९१९ - २२ - | साहित्य जगतात भरपूर प्रसिद्धी. अमेरिका भेट. |
| इ. स. १९२३ - | ३ ऑगस्ट रोजी हृदयविकाराने मृत्यू. |

जोसेफ कॉनरॅड एक माणूस आणि एक मान्यवर लेखक. या दोन्ही स्वरूपात एक विलक्षण व्यक्तिमत्व. त्यांचे असामान्यत्व त्यांच्या चरित्राकडे ओझरती नजर टाकली तरी लक्षात येते. आर्थर कोइस्लर या नामवंत लेखकाने आत्मचरित्रात प्रत्येक लेखकापुढे खड्या असलेल्या शृंगापत्तीचे वर्णन केलेले आहे. झटपट लोकप्रियता मिळवावयाची असेल; आजच्या भाषेत सांगायचे म्हणजे, टाळ्या घेणारा परफार्मिंग आर्स्टिस्ट व्हावयाचे असेल, तर एका विशिष्ट प्रकारचे लेखन करावे लागते. पण ह्या प्रकारचे लेखन विसरले जाण्याचा संभव अधिक. या वर्गात मोडणाऱ्या दीर्घायुषी लेखनाला लेखक या स्वरूपात आपण जिवंत असतानाच आपले मरण पहावे लागते. मराठी लेखक प्रा. ना. सी. फडके हे या संदर्भातील एक नामवंत उदाहरण. याउलट कसदार अशी साहित्यनिर्मिती करायची असेल, तर आपल्या आयुष्यातही वाचकाच्या पंसतीची पावती कदाचित मिळणार नाही याची खूणगाठ अगदी पक्केपणी बांधावी लागते. एवंम लेखक म्हणून आपली कुंडली मांडताना लेखकाला

चांगलीच मानसिक व बौद्धिक कसरत करावी लागते. शिवाय सरतेशेवटी या कसरतीत यशस्वी होऊ की नाही याची खात्री ही कसरत करताना नसते. जोसेफ कोनरॅड ही कसरत करण्यात यशस्वी झालेले एक लेखक.

जोसेफ कॉनरॅड यांची पहिली कादंबरी – अलमायेर्स फॉली – वाचल्यानंतर एडवर्ड गार्नेट यानी त्याना सुरुवातीलाच सांगून टाकले होते की 'गड्या तुझा वाचकवर्ग मर्यादीतच राहणार आहे, पण तुझे लेखन वेगळे आहे.' जोसेफ कॉनरॅड यांचे दुसरे मित्र (पुढे त्यांचे भांडण झाले हा भाग वेगळा) फोर्ड मॅडॉक्स फोर्ड हा एक अवलीया. कसदार साहित्याची चांगली जाण असलेला संपादक. टी. एस. इलीयट एझरा पाऊंड यासारख्या कवी व लेखकाना म्हणत असत, "तुम्ही माझ्यापेक्षाही चांगले लिहिता, जे काय लिहाल ते कोणी छापले नाही, तर मी ते माझ्या मासिकात प्रसिद्ध करीन. पण काही झाले तरी लिहीत रहा." फोर्ड हे लेखनावरच उपजिविका करणारे लेखक. हे उद्दिष्ट साध्य व्हावे यासाठी त्याना वर्षाला किमान दोन तरी कांदबऱ्या लिहिणे भाग होते. त्यानी ऐंशी कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत. हे सारे सांगण्याचा हेतू एकच. या अशा लेखकाने व संपादकाने म्हटले होते, 'कॉनरॅड यांनी इंग्लिश कादंबरीला नवी दिशा व दृष्टी दिली.' फोर्ड हे कॉनरॅड यांचे समकालीन व त्यांचे मित्र असल्याकारणाने त्यांनी हे मत व्यक्त केले असावे हे गृहित धरून आपण ते मत बाद करू या. पण आजच्या कादंबरी लेखकात ज्यांचे बिनीचे स्थान वादातीत आहे, त्या डोरीस लेसिंग यांनी देखील फोर्ड यांच्या माताला दुजोरा दिलेला आहे. डोरीस लेसिंग या ऐंशीच्या आसपास आहेत. अमेरिकन तरुणांच्या भाषेत त्या तशा ANCIENT च. टाईम्स लिटररी सप्लीमेंट या नामवंत व मान्यवर इंग्लिश साप्ताहिकाने डिसेंबर १९९९च्या एका अंकात जोसेफ कॉनरॅड 'इंग्रजी' कादंबरीचे पहिले लेखक असे सांगून त्यांचे छायाचित्रही आवर्जून छापले आहे.

जोसेफ कॉनरॅड यांच्या लोकप्रियतेत चढउतार होते. पण ते कायमचे नजरेआड कधीच झाले नाहीत. त्यांच्या मृत्युनंतर सुमारे आठ वर्षे त्यांचा वाचकवर्ग कायम होता. मग तो हळूहळू कमी होत गेला. त्यानंतरचा दुसऱ्या महायुद्धाच्या अगोदरची एक दोन वर्षे व त्यानंतरचा युद्धाचा काळ, ही सात-आठ वर्षे हिशोबात घ्यावयाची नाहीत. इंग्लंड अमेरिकेतील वाचक युद्ध कार्यात व्यस्त होते. पण त्यानंतर त्यांच्या वाचकवर्गात पुन्हा एकदा लक्षणिय वाढ झाली व ती आजतागायत टिकून आहे. थोडक्यात त्यांच्या मृत्यूनंतर गेली पंचाहत्तर वर्षे त्यांना वाचकांच्या ह्रदयात स्थान आहे. आर्थर ओइस्लर यांनी सुचित केलेली 'लेखक-कुंडली' मांडण्यात ते चांगलेच यशस्वी ठरले आहेत.

पोलंड या देशाला समुद्रकिनारा नाही. कॉनरॅड यांची नौकानयनाशी परिचय होण्याची सुतराम शक्यता नव्हती. त्याना खरे म्हणजे आर्किटेक्ट व्हायचे होते. पण तो व्यवसाय पत्करला तर आपणास *घरीच* रहावे लागेल हे त्यांच्या लक्षात आल्याकारणाने व्यापारी माल

वाहतुक करणाऱ्या नाविक व्यवसायात ते शिरले. पोलंडमधून पळ काढणे त्यामुळे सुलभ झाले. लहानपणी पोलंड व रशियातील ते अनेक गावी राहिले होते. सुट्टीच्या दिवसातही पोलंड, रशिया सोडून दुसऱ्या अनेक देशात ते जाऊन राहिले होते. पण त्यांच्या स्वभावच असा होता की, त्यांची कोणाशी तशी मैत्री होणे हे तसे कठीणच. यदाकदाचित् झालीच तर ती फार काळ टिकणे कठीण. एडवर्ड गार्नेट यासारखे काही सन्माननीय अपवाद आहेत. इ. स. १८७४ मध्ये त्यांचे शालेय शिक्षण पुरे झाले. शाळेत त्यांनी ग्रीक, लॅटिन व जर्मन या भाषांचा अभ्यास केला. पोलीश ही त्यांची मातृभाषाच होती. रशियात ते काही वर्षे राहात होते, शिवाय ती राज्यकर्त्यांची भाषा असल्याकारणाने त्यांना रशियन येत होती. त्या काळाचा रिवाजानुसार उमरावांच्या घरात फ्रेंच ही संभाषणाची भाषा होती. त्यांचे फ्रेंच भाषेवर चांगले प्रभुत्त्व होते. त्यांच्या एका मैत्रिणीबरोबर फ्रेंच भाषेत कादंबरी लिहिण्याचा संकल्प होता. पण अशा या बहुभाषिक तरुणाला, वयाची वीस वर्षे होईपर्यंत इंग्रजीचा गंधही नव्हता, त्यानी पहिला इंग्लिश शब्द ऐकला ते फ्रान्समध्ये मार्सेल येथे असताना. एका इंग्लिश खलाशाने काढलेले ते उद्गार होते.

कॉनरॅड घरचे तसे सुखवस्तू. प्रेमळ कुटुंबियात त्यांची पहिली वर्षे गेली. त्यांची तब्बेत तशी तोळामासाच असल्याकारणाने ते प्रथम काही वर्षे शाळेतच गेले नाहीत. गेले तरी अधूनमधून आईनेंच त्यांचे बरेचसे प्राथमिक शिक्षण केले. त्यांचे वडील हे पोलीश क्रांतीकारांचे सहकारी. पोलीश स्वातंत्र्याच्या चळवळीत ते सक्रीय भाग घेत. या गुन्ह्यामुळे त्याना पोलंडमधून रशियास हद्पार करण्यात आले होते. शेकसपिअरच्या नाटकांचा व दुसऱ्याही अनेक लेखकांच्या पुस्तकांचा त्यानी अनुवाद केला होता व त्यानी लिहिलेले एक नाटक त्यांच्या मृत्युनंतर प्रसिद्ध झाले. पण निदान एक कादंबरी लिहावी ही त्यांची मनिषा अपुरीच राहिली. त्यांच्या मुलाने ती पुरी केली व आपले नाव अनेक इंग्लिश वाङ्मयात अनेक वर्षे घेतले जाईल अशा प्रकारे.

कॉनरॅड यांच्या लेखनाची अनेक वैशिष्टे आहेत. त्यांच्या साहित्य गुणांची चर्चा बाजूस ठेवू या. त्यांच्या सर्वच लेखनाचा एक विशेष म्हणजे, भौतिक व मानसिक पार्श्वभूमी या स्वरूपात 'नदी' ही प्रमुख व महत्त्वाची गोष्ट आहे. त्यांच्या दोन कादंबऱ्या ह्या भविष्याचा वेध घेणाऱ्या आहेत. डिस्सेंट या प्रख्यात अमेरिकन द्वैमासिकाचे अनेक वर्षे संपादक असलेले मान्यवर साहित्य समीक्षक इरव्हिंग हॉव यांनी NOSTRAMO या कॉनरॅड यांच्या कादंबरीत वर्णन केलेल्या कल्पित घटना, भविष्यकाळात कशा वास्तव ठरल्या याबद्दल विस्ताराने लिहिलेले आहे. त्यांनी जे प्रत्यक्ष अनुभवले ते त्यांच्या साहित्याला पायाभूत होते. याच कारणाने त्यांच्यात साहित्यात आलेली स्थळे आणि व्यक्ती यांची शोधा शोध अनेक वर्षे अनेक संशोधक करीत आले आहेत. सांबिरचा शोध हा त्या प्रयत्नापैकी एक.

## (२) कॉनरॅड यांची पहिली कादंबरी
## अलमायेरची घोडचूक (ALMAYER'S FOLLY)

या कादंबरीतील प्रमुख पात्रे

अलमायेर – खानदानी गोरा डच. एक अयशस्वी व्यापारी.

सौ. अलमायेर – त्यांची मलाय पत्नी.

नीना – त्यांची एकुलती एक कन्या.

लाकंबा – सांबिरचा राजा. अलमायेरचा शत्रू.

लिनगार्ड हे एक सधन व्यापारी. त्यांनी सांभाळलेल्या मलाय मुलीशी अलमायेर हे विवाह करतात. लिंनगार्ड यांच्या भरभराटीस आलेल्या धंद्याचे मालक बनून, पानताई नदीच्या वरच्या बाजूस असलेल्या सोन्याच्या खाणीतून सोने काढून गडगंज पैसा मिळविण्याची स्वप्ने अलमायेर रंगवित असत. अलमायेर आणि त्यांची मलाय पत्नी यांना एकुलती एक अतिशय रूपवती कन्या. तिचे नाव नीना. तिला सिंगापूरला शिक्षणासाठी पाठविण्यात येते. एक युरोपिय म्हणून तिला शिक्षण मिळावे हा त्या मागचा हेतू होता. परंतु आपले शिक्षण पुरे होण्याअगोदरच नीना अचानक, कोणाला कसलीही कल्पना न देता सांबिर या आपल्या गावी परत येते. सिंगापूरला ती दहा वर्षे रहात होती. या काळात ती 'पक्की' युरोपीय नसल्याकारणाने, तिचा गोऱ्या युरोपियनांकडून वारंवार अपमान होत असे. त्याला कंटाळून तिने घरी परतण्याचा निर्णय घेतलेला असतो.

अलमायेर यांचा धंद्यात जम बसत नव्हता. एखाद्या सोन्याच्या खाणीचा शोध आपणास लागेल, अशी त्याना अंधुकशी आशा होती. हे एकदा झाले, म्हणजे मग आपण खोऱ्याने पैसे ओढू, आणि प्रचंड धनदौलत गाठीशी बांधू, नीनाला घेऊन ॲमस्टरडॅमला परत जाऊ. उर्वरित आयुष्य, आपल्यापाशी असलेल्या पैशाच्या मदतीने ख्याली-खुशाली, आराम, व आनंदात घालवू अशी स्वप्ने त्यानी उराशी बाळगली होती.

पानताई नदीवर इंग्रजाचे नियंत्रण येणार अशी बातमी येते. ही बातमी ऐकून अलमायेर आपल्या रहात्या घराच्या परिसरात एक नवे घर बाधंण्यास सुरुवात करतात. हे नवे घर, त्याच्या मूळ रहात्या घरापासून फारसे दूर नसते. येऊ घातलेल्या ब्रिटिशाना रहाण्यास योग्य असे चांगले व सुंदर घर बांधावे, अशी त्यांची इच्छा असते. कारण डचांच्या हातात नाममात्र सत्ता राहिली होती. परंतु ब्रिटिश आलेच नाहीत. म्हणून अलमायेर यांना आपल्या हा घर बांधणीचा संकल्प अर्ध्यावरच सोडून द्यावा लागला. काही खट्याळ व चावट डच नाविकानी या अर्धवट राहिलेल्या घराला नाव दिले— अलमायेरची घोडचूकगत वेडेपणा.

अलमायेर यांच्या घराच्या सीमेला लागून नदी होती. या नदीच्या पलीकडच्या काठावर एका स्थानिक राजाचे घर होते. या ठिकाणी सांबिरचा राजा आपल्या अनेक स्त्रिया व गुलाम

यांना घेऊन रहात होता. या राजाच्या प्रमुख मदतनिसाचे नाव होते बाबलाटची. अलमायेर यांच्या हालचालींचे निरीक्षण हा सांबिरचा राजा लाकंबा अगदी बारकाईने निरीक्षण करीत असे. विशेषत: अलमायेर आपल्याबरोबर काही माणसे घेऊन अनेक दिवसासाठी जेव्हा बाहेर पडे, तेव्हा तर या निरीक्षणात अधिक बारकावा आणला जाई. परंतु काही दिवसानी अलमायेर यांनी या सफरी करण्याचे सोडून दिले. ते आपली रिती– दिवास्वप्ने रंगवित, घराला लागून असलेल्या व सडत जात असेलल्या धक्यावर ठाण देऊन बसत. त्यांची मलाय पत्नी ज्याच्यात काहीही अर्थ नाही असा हा नवरा आहे, इतक्या तुच्छतेने त्यांच्याकडे पहात असे.

नीनासारखी तरूण, देखणी व रूपवती मुलगी सांबिरमध्ये रहायला आल्यानंतर तेथल्या तरूण मंडळीत एकच खळबळ उडाली. परंतु यामुळे अलमायेर यांच्यासमोर आणखीनच वेगळा प्रश्न खडा झाला. याचे कारण सांबिरमधील तरूण नीनाचे लक्ष आपल्याकडे वेधून घेण्यासाठी चढाओढ करू लागले होते.

एक दिवस पानताई नदीवरून, एका दोन शिडाच्या होडीतून, एका स्थानिक मलाई राजाचा देखणा राजपूत्र येऊन अलमायेर यांच्या घराजवळच्या धक्याला लागला. या राजपुत्राचे नाव होते दाईन मारुला. त्याची इच्छा अलमायेरबरोबर काही व्यापार करण्याची होती. या राजपुत्राने, लाकंबा यांच्याशी अनेक वेळा बोलणी केली आणि अलमायेर यांच्या–बरोबर अनेक वेळा वाटाघाटी केल्या, सरतेशेवटी दाईनला जे काही पाहिजे होते, ते त्याला प्राप्त झाले. त्याला हवी होती बंदूकीची दारू. लाकंबा, अलमायेर– दाईन यांच्या वाटाघाटी एकीकडे चालू होत्या. या मध्यंतरीच्या काळात तो अगदी उत्कटतेने नीनाच्या प्रेमात पडला. एक दिवस नीना आपल्या वडिलांच्या घरात स्त्रियांची म्हणून जी खोली होती. त्यात सहजच जाते. तिला आपली आई त्यावेळी पैसे मोजताना आढळते. हे पैसे राजपुत्र दाईनने नीना आपल्या पत्नी व्हावी यासाठी सौ. अलमायेर यांना दिलेले होते. याचे कारण त्याच नीना व दाईन यांची भेट घडवून आणीत. एवढेच नव्हे तर अलमायेर येतो आहे असे दिसले की, त्या नीना– दाईन या प्रेमिकाना योग्य तो इशारा देत. सौ. अलमायेर यांची इच्छा नीनाने गोऱ्या युरोपियन तरूणांशी लग्न न करता, स्थानिक तरूणाशीच करावे, अशी होती. ती आशा त्या सदैव आपल्या उराशी बाळगून होत्या. गोऱ्या (युरोपियन) कातडीची माणसे, आणि त्यांची चालचालणूक यांच्या संबंधात सौ. अलमायेर याना अगदी सखोल असा अविश्वास होता.

दाईन निघून जातो. पण जाताना तो अलमायेरला असे वचन देतो की, त्या सोन्याच्या खाणी नेमक्या कोठे आहेत, याचा शोध घेण्याच्या कामात मदत करण्यासाठी तो परत येईल. वचन दिल्याप्रमाणे दाईन परत आल्यानंतर अलमायेरला भेटतो. पण ही भेट तशी उडत उडतच असते. यानंतर लगबगीने सांबिरच्या राजाला भेटण्यासाठी तो जातो. राजाला तो असे सांगतो की, त्याची होडी ही डचांच्या हाती पडली आणि फक्त एका गुलामाला बरोबर

घेऊन, तो कसाबसा निसटला. त्याच्या बहुतेक माणसाना ठार मारण्यात आलेले असून येत्या एकदोन दिवसात या पानताई नदीतून ते डच दाईन याच्या शोधात, येथे येऊन दाखल होतील.

या संभाषणानंतर लाकंबाने बाबलाटचीला असे सांगितले की, ते डच त्याठिकाणी येण्यापूर्वी त्याने अलमायेरवर विषप्रयोग केला पाहिजे. आता दाईनला सोन्याच्या खाणी कोठे आहेत हे ठाऊक असल्याकारणाने, लाकंबाच्या दृष्टीने अलमायेरची आवश्यकता निकालात निघालेली होती. याउलट आपण त्याला जिवंत ठेवले तर आपले हे सोन्याच्या खाणीचे गुपित तो गोऱ्या– डच वा इंग्लिश– लोकाना सांगणे हा धोका नेहमीच होता. थोडक्यात त्याचा काटा काढलाच पाहिजे.

दुसऱ्या दिवशी सकाळी पानताई नदीच्या पृष्ठभागावर एक मलाय तरूणाचे प्रेत तरंगताना आढळते. या प्रेताच्या डोक्याच्या इतका चेंदामेंदा करण्यात आला होता की, ते प्रेत कोणाचे आहे हे ओळखताच आले नसते. त्या प्रेताच्या हातात दाईनची अंगठी व कडे होते. या घटनेमुळे अलमायेर हा शोक सागरात पार बुडाला. याचे कारण त्या सोन्याच्या खाणींचा शोध लावण्याच्या कामात दाईन हा अखेरचा आशेचा किरण होता. थोडक्यात यापुढे अंध:कार. हे सारे घडत असते,त्याच सुमारास दाईनच्या शोधात असलेले डच अधिकारी तेथे येऊन पोहोचतात. त्यांनी अलमायेरला दाईन हा आपल्या बोटीसकट आपल्या हातून कसा निसटला ते सांगितले. त्यानी दाईनची बोट पाहिली. पण हे डच अधिकारी त्या बोटी जवळ येतात न येतात तोच त्या बोटीवर असलेल्या बंदुकीच्या दारूचा स्फोट झाला; आणि त्यात दोन डच मृत्युमुखी पडले. अलमायेरने आपल्या पाहुण्याना असे सांगितले की, प्रथम आपण भोजन करा; ते झाले की, मग दाईन आपल्या हाती पडेल अशी व्यवस्था करतो.

या साऱ्या घटना एकीकडे घडत असताना, राजा लाकंबाला दाईनबद्दलची खरी हकीकत बाबलाटची सांगत होता. त्याचा वृत्तांत येणेप्रमाणे. बाबलाटची म्हणाला खरे म्हणजे असे होते की, ज्या रात्री दाईन राजा लाकंबाला भेटला, त्याच रात्री नीना ही त्या तरूण राजपुत्राची वाट पहात बसली होती. ती दाईनला या नदीच्या उगमाजवळ– पण तेथून दूर असलेल्या एका मोकळ्या जागेत घेऊन गेली. त्या ठिकाणीच तो लपून बसलेला आहे. नदीच्या प्रवाहाबरोबर वहात आलेले प्रेत, हे त्याच्या गुलामाचे आहे. नीना व दाईनला घेऊन जाणारी होडी उलटली, तेव्हा हा गुलाम त्या होडीतून बाहेर फेकला गेला आणि बुडून मृत्यू पावली. यानंतर सौ. अलमायेर यांनी दाईनला असे सुचविले की, त्यांनी आपली अंगठी व कडे हे त्या प्रेताच्या अंगावर चढवावे. ते प्रेत नदीच्या प्रवाहाबरोबर वहात जाईल. हे प्रेत पाहून डचांची फसगत होईल. हे झाले की, दाईन यांनी आपल्या डच शत्रूच्या हातावर तुरी देऊन कसे निसटून जावे यासाठी राजा लाकंबा, आणि बाबलाटची एक योजना तयार करतात. त्याना हे ठाऊक असते की, दाईन नीनाला आपल्याबरोबर घेतल्याविना जाणारच

नाही. सौ. अलमायेर त्यांच्या संकल्पित कटात सामील होतात. ही सारी वस्तुस्थिती लक्षात घेऊन, सौ. अलमायेर व बाबलाटची हे दोघे नीनाला अलमायेरपासून अलग करून, तिला दूर घेऊन जाण्याचा कट करतात. हे कट– कारस्थान काही रूप धारण करीत होते, त्यावेळी अलमायेर हे आपल्या डच पाहुण्याबरोबर दारू ढोसण्यासत मग्न होते. अलमायेर यांच्या पाहुण्यानी नदीवरून तरंगत येणाऱ्या त्या माणसाच्या थडग्याकडे घेऊन जाण्यासाठी अलमायेर यांची मनधरणी केली. याचा परिणाम म्हणून सरतेशेवटी अलमायेर हे आपल्या डच पाहुण्याना घेऊन, त्या थडग्याकडे गेले. डचानी ते कडे व ती अंगठी या दोन्ही वस्तू दाईन खरोखरच मृत्यू पावला आहे याचा पुरावा म्हणून दप्तरात जमा केल्या. एवढे ते करीपर्यंत रात्र होऊ लागली होती. हे पाहून, ते तिथून बाहेर पडले.

नीना दाईन बरोबर जाण्यास राजी होती. पण आपण त्या घरातून कायम निघून जाण्यापूर्वी एकदा अलमायेरला भेटावे. अशी उर्मी तिच्या मनात होती. म्हणून ती घराकडे वळली. पण तिच्या आईने तिला घरात जाण्यास मज्जाव केला. घरात अलमायेर हे बेसुमार दारू पिऊन, बेहोश होऊन झोपले होते. यानंतर नदी काठच्या ज्या मोकळ्या जागेत दाईन लपून बसला होता. त्या ठिकाणी नीना गेली. हे होत होते; त्या मध्यंतरीच्या काळात, एका गुलाम मुलीने अलमायेरना जागे केले, आणि नीना कोठे आहे ते सांगितले. हे ऐकून अलमायेर घाबरे-घुबरे झाले. थोडाच वेळाच त्यानी आपल्याला सावरले आणि नीना व दाईन कोठे लपलेले आहेत ते शोधून काढले. ते त्या ठिकाणी गेले आणि नीनाला त्यानी विनवणी केली की, तिने त्यांच्याबरोबर घरी परतावे. नीनाने या विनंतीस स्पष्ट शब्दात नकार दिला. आपण ना-गोरी डच ना-मलाय, अशी डच-मलाय व्यक्ती असल्याकारणाने आपणास गोऱ्या– डच लोकांकडून जी अपमानास्पद वागणूक दिली जाते, तिचा अनुभव पुन्हा एकदा घेण्याचा धोका पत्करण्याची तिची तयारी नव्हती. तिला हे ठाऊक होते की, दाईन या राजपुत्राशी तिने लग्न केले म्हणजे मग ती राणी झाली असती. एका खोट्या भित्र्या गोऱ्या डच व्यक्तीशी लग्न करण्याऐवजी, एका शूर योद्धाशी लग्न करणे तिला अधिक पसंत होते. हे ऐकून अलमायेर यांनी असा दम दिला की, ते आपला नोकर डचांकडे दाईन कोठे लपला आहे ते सांगण्यासाठी पाठवतील.

पिता– कन्येचा हा वाद चालू होता, त्यावेळी बाबलाटची तेथे येऊन थडकला, आणि त्याने ओरडून सांगितले की, अलमायेरच्या स्त्री-गुलामाने दाईन कोठे लपला आहे हे डचाना सांगितले आहे. हे कळल्यानंतर तरूण राजपुत्र दाईनला पकडण्यासाठी डच मार्गस्थ झालेले आहेत. दाईनने आपले काहीही होवो. पण मी नीनाला सोडणार नाही. तिच्याबरोबरच राहाणार असे ठासून सांगितले. हे ऐकून बाबलाटची आश्चर्यचकित झाला. दाईन– नीनाच्या नशिबात काय असेल ते असो; त्यांचे काय व्हायचे असेल ते होईल, असा विचार करून तो तेथून निघून गेला. हे सारे घडल्यानंतर अलमायेर यांनी असे सांगितले की नीनाला ते कधीही क्षमा



अनुक्रमणिका

करणार नाहीत. असे होते तरी नीना– दाईनला पानताई नदीच्या मुखापर्यंत नेऊन सोडण्याची त्यानी तयारी दर्शविली. अतयंत काळ्याकुट्ट अंधाऱ्या रात्री त्या शरणार्थी प्रेमिकानी आपला पाठलाग करणाऱ्या डचापासून पळ काढला.

या नदीच्या मुखाशी एक बेट होते. त्या ठिकाणी नीना– दाईन आणि अलमायेर हे एका पडावाची वाट बघत बसले. या पडावातून नीना– दाईन हे जोडपे लाकंबाने दडवून ठेवलेल्या बोटीवर जाणार होते. ती दोघे गेल्यानंतर, अलमायेर यांनी नीनाच्या पायाचे ठसे पुसून काढले आणि ते नदीच्या मुखापासून दूर असलेल्या नदीकाठच्या आपल्या घराशी आले. त्यांच्या घराच्या परिसरात कोणीही नव्हते. त्यांचे गुलाम, आणि त्यांची पत्नी हे सारे त्याना सोडून, लाकंबाचे संरक्षण घेण्यासाठी निघून गेले होते. मात्र, लाकंबाकडे जाताना सौ. अलमायेर नीनाशी दायानने लग्न करण्याकरिता दिलेली रक्कम घेऊन जाण्यास विसरल्या नव्हत्या. अलमायेर हे आपली कचेरी अनेक वर्षे वापरीत नव्हते. त्या कचेरीची गंजलेली जुनी किल्ली घरात हिंडताना त्याना सापडते. या किल्लीचा वापर करून ते कचेरीचा दरवाजा उघडतात व आत जातात. तेथल्या फर्निचरची मोडतोड करतात. हे फर्निचरचे तुकडे कचेरीच्या मध्यभागी नेऊन त्यांची रास करतात; आणि त्याला आग लावून देतात. मग बाहेर जाऊन ती आपल्या जवळची गंजलेली जुनी चावी पानताय नदीत फेकून देतात. घराला लागलेली आग पहात, घराच्या पोर्चमध्ये, आपल्या कचेरीतून आगीचे लोट .बाहेर येईपर्यंत तेथेच बसून राहतात. आपले जुने घर ते जाळून भस्मस्मात करीत होते.

आपल्या आयुष्याचे उरलेले दिवस 'अलमायेरची घोडचूक' या अर्धवट बांधलेल्या घरात त्यानी घालविले. आयुष्याच्या सरतेशेवटी आपली कन्या नीनाला विसरण्याच्या प्रयत्नात ते अफूची चिलीम ओढू लागले. त्यांना मृत्यू आला, त्यावेळी तोवर जे काही झाले होते, ते विसरून जाण्यात मी यशस्वी झालो आहे असा भाव आपल्या डोळ्याद्वारे प्रकट करण्यात ते यशस्वी झाले होते.

### (३) अलमायेर्स फॉलीची जन्मकथा

ALMAYERS FOLLY अलमायेर्स फॉली ही जोसेफ कॉनरॅड यांचा पहिली कादंबरी ही कादंबरी लेखकाने टीप घातल्यागत पानामागून पान अशा प्रकारे ती लिहलीच नव्हती. त्याला या कादंबरीतील प्रत्येक ओळीसाठी झुंज घ्यावी लागली होती. ही त्यांची सगळ्यात छोटी कादंबरी, लिहिण्यास पाच वर्षे लागली. लंडन, काँगो, ऑस्ट्रेलिया, युक्रेन, स्विझर्लंड, फ्रान्स अशा जगाच्या वेगवेगळ्या देशात या कादंबरीचे लेखन झाले. इ. स. १८९४ च्या सुमारास ते मोकळेच होते, त्याना नोकरी नव्हती. वेळ आणि पैसा, यांची भरपाई करण्याकरता त्यांनी ही कादंबरी पुरी करण्याचा नेट धुरला व ती पुरी केली. ही कादंबरी लिहिण्याचा मोबदला म्हणून त्याना वीस पौंड प्राप्ती झाली. कॉनरॅड यांना ही रक्कम

चांगलीच मोठी वाटली असणार. टॉरेन जहाजावर चिफमेट या हुद्यावर काम करताना त्यांना अडीच महिन्यात एवढी प्राप्ती झाली होती. यावरून वीस पौंड ही रक्कम त्याना किती मोठी वाटली असेल याची कल्पना येईल.

ही कादंबरी लिहिताना प्रख्यात फ्रेंच लेखक गुस्ताव फ्लाबेर यांचा आदर्श कॉनरॅड यांच्या समोर होता. पण फ्लाबेर यांचा त्यांच्यावर प्रत्यक्ष प्रभाव होता असा त्याचा अर्थ नाही. कॉनरॅडना फ्लॉबेर यांच्याबद्दल कौतुकमिश्रित आदर होता. आपल्या कलेशी जवळजवळ एखाद्या संन्याशासारखी आणि जगाची पर्वा नाही, अशा स्वरूपाची असलेली निष्ठा, प्रत्यक्ष वास्तव आणि जे प्रत्यक्ष पाहिले त्याचा आपल्या मनावर उठलेला ठसा हा वाचकापर्यंत पोहोचविण्याचे त्यांचे कौशल्य, हे फ्लॉबेर यांचे साहित्यगुण कॉनरॅड यांना नेहमीच प्रभावित करीत. त्यांचे साहित्य जगतातील दुसरे मित्र रशियन लेखक इवान तुरजनेव्ह आणि अमेरिकन लेखक हेन्री जेम्स आणि अर्थातच फ्लॉबेर या सर्वांचे कॉनरॅडना सदैव कौतुक होते.

काही लेखकांसमोर सरस्वीत हात जोडून उभी असते. कॉनरॅड यांचे तसे नव्हते. साहित्य निर्मितीच्या काळात त्यांच्या मनात कल्लोळ असे, ते कमालीचे अस्वस्थ होत असल्याकारणाने त्याना मानसिक वेदना होत असत. त्यांनी हे सारे आपली मैत्रीण मार्गारीत हीला पत्रातून वेळोवेळी कळविले होते. शिवाय कॉनरॅड आपल्या आयुष्यभर आपल्या मित्रांजवळ याबाबतची आपली व्यथा व्यक्त करीत. कॉनरॅड कागदसमोर ठेवून, 'शून्यात नजर लावून अनेक तास बसत. हळूहळू त्यांच्या मनात प्रथम अस्पष्ट असलेल्या व्यक्ती, मूर्त स्वरूप धारण करीत, आणि मग त्यांचे वर्णन कागदावर शब्दांकित होई. 'कॉनरॅड यांनी याबाबत म्हटले होते' मी लिहिण्यासाठी घेतलेला कागद विसरून घालविलेला प्रत्येक क्षण मला अप्रिय व नकोसा वाटे. मी माझ्या लेखणीपासून म्हणत नाही. कारण मी फारच थोडे लिहिले आहे. समोरच्या कागदाकडे टक लावून पहात असातना मला स्फूर्ती येते. नजरेच्या टप्प्यात न येणारा विस्तीर्ण प्रदेश आहे. धुसर व अस्पष्ट आकारानी भरलेल्या एका महान पैसातून माझे मन उंडारत असते. प्रत्येक गोष्ट अस्ताव्यस्त, चांगलीच गोंधळाची. परंतु हळूहळू या भूतांचे रूपांतर जिवंत हाडामासात होते; हवेत तरंगणारे गंध आपले वायूरूप टाकून घन बनतात,... आणि कोणास ठाऊक? या अस्पष्ट कल्पनांच्या टकरीतून काहीतरी जन्मास येईलही.'

थोडक्यात स्मरणाकरवी नवनिर्मिती हे कॉनरॅड यांचे तंत्र होते. प्रख्यात फ्रेंच लेखक प्रुस्टही ह्याच तंत्राचा वापर करीत असे. या कादंबरीकाराने पात्र निर्मितीची तुलना करताना सांगितले की कादंबरीतील पात्रे,'रंग आणि विशिष्ट घाट धारण करतात... बनतात.... कायम स्वरूपाचे आणि ओळखता येतील असे.... आणि आपला योग्य आकार धारण करतात आणि घन बनतात. अस्तित्वात येतात. . . हे अस्तित्वात येणे. कागदांच्या कपट्यासारखे, एखादा जपानी त्यांना पाण्याने भरलेल्या प्रोसलीनच्या बाऊलमध्ये बुचकळतो आणि ते

विशिष्ट आकर धारण करतात.'

मार्गारीत या मैत्रिणीला लिहिलेल्या पत्रात कॉनरॅड यांनी लिहिले होते, 'परंतु जेव्हा सर्व काही ठीक होत नसे, त्यावेळी कादंबरीतली पात्रे अस्तित्वात येत नसत.' कॉनरॅड मनोव्यथेने त्रस्त होत. त्यांना लिहिण्याच्याबाबतीत पंगूत्व प्राप्त होई. 'माझी मनोव्यथा मला छळते आहे. मी दयनीय होतो आणि कृती विचार सर्व काही थंडावते. मी स्वत:लाच विचारतो, मी अस्तित्वात तरी का आहे? मध्यंतरीच्या काळात जेव्हा मी चांगलाच तंदुरुस्त आहे अशी समजूत होती, तेव्हा ती छळणारी मनोव्यथा परत येईल की काय ही भिती माझ्या मनात असते. काहीही करण्याचे धैर्य इत:पर माझ्यात नाही. तुला लिहिण्याइतके पुरेसे साहित्य माझ्याजवळ नाही. सर्वस्वी नाउमेद होऊन, माझ्या हातातील लेखणी गळून पडण्याअगोदर एकाएकी घाईगर्दीत काम पुरे करण्याचा तो प्रयत्न आहे.'

इ. स. १८९४ सालच्या एप्रिल महिन्यात कॉनरॅड एक शनिवार-रविवार सँडरसन यांच्या घरी एल्स्ट्री (ELSTREE) येथे रहावयास गेले होते. त्याबद्दल प्रख्यात इंग्लिश लेखक गॉल्सवर्दीच्या बहीणीने पुढील आठवण नमूद केलेली आहे. 'टेड आणि त्याची आई या दोघांनीही. . . . आपल्या पोलाश मित्राचे अलमायेर हे हस्तलिखित आश्चर्य वाटावे इतक्या अगोदरच उत्तम इंग्लिशमध्ये जे लिहिलेले होते ते संपादन करण्यावावत मदत केली आणि त्यासाठी फारच कष्ट घेतले आणि त्यानी ती कादंबरी प्रसिद्ध करण्याबाबत चिकाटी धरावी या संदर्भात कॉनरॅड यांचे धैर्य कसे उंचावेल हे पाहिले.' कॉनरॅड यांनी या संबंधातील आपली कृतज्ञता या कादंबरी नंतरचे पहिले पुस्तक AN OUTCAST OF THE ISLANDS (इ. स. १८९५) हे टेड अँडरसन यांना आणि त्यानंतरचे THE MIRROR OF THE SEA हे त्यांची आई कॅथरीन हीला अर्पण करून व्यक्त केलेली आहे. एप्रिल २४ रोजी कॉनरॅड यांच्या कादंबरीतील व्यक्ती प्रत्यक्ष 'अस्तित्वात' आल्या. . . हे होत असताना त्यांची 'निर्मिती' ही हळूहळू अस्तंगत होत गेली आणि त्यानी आपला 'मूळ भूतांचा' आकार कारण केली. . . सरतेशेवटी आपण ही कादंबरी हातावेगळी केली आहे हे मार्गारीतला जाहीर केले. 'मि कास्पर अलमायेर यांचा मृत्यू आज सकाळी ३ वाजता झाला. हे तुला कळविताना दु:ख होत आहे. ती एकदाची हातावेगळी झाली ! शेवटचा शब्द लिहिणाऱ्या लेखणीची खरखर. . . . आणि जे माझ्या कानात बोलत होते, माझ्या डोळ्यासमोर हातवारे करीत होते, जे माझ्याबरोबर अनेक वर्षे वास्तव्य करून होते ही सारी मंडळी माघार घेत अस्तंगत होत जाणारी ही सारी मंडळी भुंतांची एक फलटण एकाएकी बनतात. ही फलटण दिवसेंदिवस रोडावत जाते व शेवटी विराम पावते.'

एकदाची ही कादंबरी पुरी झाल्यानंतर ती प्रसिद्ध करून घेणे हे कॉनरॅड यांना आवश्यक होते. या कादंबरीच्या गुणवत्तेबद्दल त्याना फार मोठा विश्वास नव्हता. मारगारीत समोर त्यांनी दोन चमत्कारिक प्रस्ताव इ. स. १८९४ च्या जुलै आणि ऑगस्ट महिन्यात मांडले. असे



अनुक्रमणिका



करून आपल्या भविष्यकाळात सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. त्यानी तिला प्रथम असे सुचविले की तिने 'अलमायेर्स फॉली' या कादंबरीचे फ्रेंच मध्ये भाषांतर करावे. *दोन* तिच्या कादंबऱ्या REVUE DE MONDE या प्रतिष्ठीत नियतकालिकात मालिकेच्या स्वरूपात प्रसिद्ध होत असतात, त्यात आपला या कादंबरीलेखनात दोघांचा सहभाग आहे अशा स्वरूपात तिने ती प्रसिद्ध करून घ्यावी. ती खुषावेल अशा उपरोधाने कॉनरॅड यांनी लिहिले होते 'प्रिय शिक्षिके, मी अशा प्रकारे बोलावे, यासाठी माझ्याकडे काहीच पूर्व संचित नाही का? यानंतरच्या महिन्यात त्यांनी KEMUDI कमुदी हे टोपण नाव धारण केले. (KEMUDI या मलायन शब्दाचा अर्थ सुकाणू आहे) नंतर पुढील कारवाई मारगुरीएतला सुचविली. ही कादंबरी जेव्हा प्रकाशित होईल तेव्हा मुखपृष्ठावर लेखक म्हणून मारगारीत यांचे नावे यावे, त्याजबरोबर कमुदी (हा खरा कादंबरीकार) याने या कादंबरी बाबत नुसते सहकार्य केले आहे असे स्पष्टीकरण करणारा खुलासा असावा.

४ जुलै १८९४ रोजी कॉनरॅड यांनी ही कादंबरी फिशर अनविन या प्रकाशकाडे सुपूर्द केली. त्यांच्या नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे, कादंबरी लिहून हातावेगळी केल्यानंतर ते सुट्टी घेत. त्यानुसार त्यांनी यावेळीही घेतली आणि ते स्विझर्लंडमधील जिनिव्हा जवळच्या शाम्प्ले या गावी गेले. परंतु मारगारीतने आपल्याबरोबर कादंबरी लेखनात सहकार्य करावयास नकार दिल्याकारणाने तिला भेटण्यासाठी वाटेवर फ्रान्समध्ये न थांबता ते तडक स्वित्झर्लंडला गेले.

सप्टेंबरच्या सुरुवातील लंडनला परत आल्यानंतर त्यांना असे आढळून आले की प्रकाशकाने कादंबरी स्विकारण्याबाबत काहीच कळविलेले नाही. कानरॅड यांचे इंग्लिश प्रकाशकाचे आर्जव करण्यासाठी आदबशीर व गोड शब्दांचे पत्रव्यवहार करण्याइतके चांगले नव्हते. त्यांनी प्रकाशकाला एक मूर्ख पत्र लिहिले. आपली कादंबरी ज्या प्रकाशकाने प्रसिद्ध करावी अशी आशा ते बाळगून होते. त्या प्रकाशकाचे ते पत्र वाचून मत नक्कीच वाईट होणार होते. तसे ते झालेही. कॉनरॅड यांनी दिखावू नम्रतेने अनविन यांना लिहिले होते त्यात आपण त्या हस्तलिखिताचे पार्सल कसे बांधले होते या विषयाचे ज्यात काही मुद्दा नाही असे चऱ्हाट होते. आपणास अतिशय मौल्यवान वाटणाऱ्या हस्तलिखिताची आणखी एक प्रत करावयास आपण विसरलो आहोत, आपण त्या हस्तलिखिताबद्दल किती आत्मियता बाळगतो असला मजकूर त्या पत्रात होता. त्यानी आणखी पुढे जाऊन असे म्हटले होते की "भविष्यकाळात कधीतरी हे हस्तलिखित वाचले जाण्याची अंधुकशी तरी शंक्यता आहे का? जर ते वाचलेच जाणार नसेल... त्याची जी लायकी आहे, त्यापेक्षा हे काही मोठे दुर्दैव नाही. तथापि तसे जर असेल, प्रकाशकाच्या दृष्टीने, ती कितीही टाकावू असली, तरी ती मला प्रिय आहे. याचे स्मरण मी आपणास दिले, तर आपण गैरसमज करून घेणार नाही याबद्दल मला खात्री आहे. ही भावना खुळेपणाची... निःसंशय... पण असे पूर्वी कधीच घडले नव्हते असे नाही... अशी माझी श्रद्धा आहे. हस्तलिखित अगर टंकलिखित अशी

दुसरी प्रत माझ्याकडे नसणे या अपघाताने माझी ती भावना अधिक प्रखर झाली आहे.'

ऑक्टोबरच्या सुरुवातीला फिशर अनविन यांनी ती कादंबरी स्विकारली. त्यांनी कॉनरॅड यांना दोन पर्याय सुचविले. *एक* त्यांनी कादंबरीच्या प्रकाशनासाठी पैसे घ्यावेत. जो फायदा होईत त्यात त्यांना वाटा राहील, किंवा फ्रेंच आवृत्तीचे हक्क कॉनरॅड यांच्याकडे रहातील. *दोन* त्यांनी २० पौंड घेऊन या कादंबरीचे सर्व हक्क फिशर अनविन यांना विकून टाकावेत. कॉनरॅड यांनी दुसरा पर्याय पत्करला. फिशर अनविन हे पैशाच्या बाबतीत कमालीचे कंजूष वाटावेत इतके व्यवहारी होते. त्या विषयी ते चांगलेच प्रसिद्ध होते. फिशर अनविन यांनी आपली भूमिका समजावून सांगताना लिहिले होते "आम्ही तुला फारच थोडे पैसे देत आहोत हे खरे आहे ..... पण प्रिय लेखक महाराज. लक्षात घ्या की आपण प्रसिद्ध लेखक नाही आहात, आणि तुमच्या पुस्तकाच्या वाचकांची संख्या तशी फारच मर्यादीत असेल. अशाच प्रकारचे दुसरे एखादे पुस्तक .... पण ते कमी पृष्ठ संख्येचे असू दे .... आमच्या PSEUDONYM LIBRARY (टोपण नांवाचा ग्रंथसंग्रह) या माले करीता लिहा आणि आम्हाला जर सोईचे असले तर आम्हाला याही पेक्षा जास्त रक्कमेचा धनादेश देताना खरोखरच आनंद होईल."

प्रकाशकाकडे आलेल्या कादंबऱ्या वाचण्याचे काम करण्याकरता फिशर अनविन यांच्याकडे तीन चार जण होते. त्यांपैकी डब्लू. एच. चिसॉन (CHEESON) हे ही कादंबरी वाचणारे पहिले वाचक. अलमायेर्स फॉली या कादंबरीतील गुणांबद्दल त्यांनी दुसरे एक वाचक एडवर्ड गार्नेट यांना सूचना दिली होती. गार्नेट हे नव्या लेखकाबद्दल अमाप सहानुभूती असलेले गृहस्थ. जगाचा सर्वसामान्य संकतोपासून अत्यंत भलेपणाने मुक्त असलेले बोहेमियन असे त्यांचे वर्णन प्रख्यात लेखक डी. एच. लॉरेन्स यांनी केलेले आहे. गार्नेट यांन कॉनरॅड यांची कादंबरी व त्यांच्या भावना या दोन्हीबद्दल चांगली जाण होती. कालांतराने ते कॉनरॅड यांचे मित्र व सल्लागार झाले. कॉनरॅड यांच्या लेखनात मार्गदर्शकही झाले. थोडक्यात कॉनरॅड यांच्या पालकाची जागा त्यानी घेतली होती.

एडवर्ड गार्नेट यांचा जन्म इ. स. १८६८ सालचा म्हणजे कॉनरॅड त्यांच्यापेक्षा वयाने लहान. एडवर्ड चांगले उंच आणि काहीसे चक्रम. त्यांचे वडील ब्रिटीश म्युझियममध्ये किपर ऑफ दी बुक्स या हुद्यावर काम करीत असत. कॉनरॅड यांचा मुलगा जॉन, एडवर्ड यांच्याबद्दल म्हणाला होता "एडवर्ड यांचा चेहरा रंगहीन, त्यांचे काळेशार डोळे, आणि बंडखोर केसांचा गडद राखाडी रंग, या साऱ्यामुळे ते एखाद्या रांगड्या अव्यवस्थित माणसा–सारखे दिसत." एडवर्ड गार्नेट यांचा मुलगा डेव्हिड याच्या निरीक्षणानुसार, "एडवर्ड यांची उपजत जाणीव फारच वरचा दर्जाची, पण वागणे तर्क विसंगत. अनेक बाबतीत चुकीचे शिक्षण घेतलेले... आपली मते विशेषत: सौंदर्य शास्त्राबाबतीची मते आपली उपजत बुद्धी आणि सहानुभूती यांच्या मदतीने ते बनवित असत." एडवर्ड यांची कल्पना शक्ती बेताचीच

होती. त्याहीपेक्षा त्यांची समीक्षादृष्टी वरचढ होती. कवी, नाटककार आणि कादंबरीकार या सर्व लेखन प्रकारात ते कुप्रसिद्ध ठरावेत इतके अयशस्वी लेखक होते. परंतु प्रकाशकाकडे आलेले हस्तलिखित वाचण्याचे काम करताना, त्यानी कमालीची प्रज्ञा प्रकट केली होती. गॉलसवर्दी, डी. एच. लॉरेन्स, डब्लू. एच. हडसन आणि प्रख्यात कादंबरीकार आणि लघुकथा लेखक एच. इ. बेटस या सारख्या मान्यवर लेखकांच्या अगदी सुरुवातीच्या काळात आणि नंतरही त्यांनी खूच मदत व मार्गदर्शन केले होते.

'अलमायेर्स फॉली' या कादंबरीतील पार्श्वभूमी आणि त्या कादंबरीचा लेखन ढंग हा अनोखा आहे. हे एडवर्ड गार्नेट यांना विशेष करून लक्षणीय वाटले. "या कादंबरीतील एकाक्ष मुत्सद्दी बाबलाटची या व्यक्तिरेखेने माझ्या मनाचा कब्जा घेतला होता. तसेच मिसेस अलमायेर आणि त्यांची कन्या नीना या दोघांची नदीच्या काठी जी भेट होते, व त्या रात्री जे काही घडते. त्यानी मी आकर्षित झालो होतो. विषववृत्तावरील अपरिचित वातावरण, रोमँटिक कथनातील 'वास्तवता' यानी या लेखकाबद्दलचे माझे कुतूहल चाळवले मी अशी कल्पना केली की या लेखकाच्या धमन्यातून पूर्वेकडचे रक्त खेळत असले पाहिजे." एडवर्ड गार्नेट आणि कॉनरॅड हे प्रथम नॅशनल लिबरल क्लॅबमध्ये इ. स. १८९४ च्या नोव्हेंबर महिन्यात भेटले. कॉनरॅड यांच्या स्वभावातील गुंतागुंत आणि परस्परविरोधी असे पैलू यांची नोंद एडवर्ड यांनी प्रथमदर्शनीच घेतली होती. एडवर्ड गार्नेट लिहितात "काळ्याभोर केसांचा हा माणूस, उंचीला बेताचाच. परंतु आपल्या घाबरट हावाभावानी आत्यंतिक नजाकत प्रकट करणारा. त्यांचे डोळे हुशारी दर्शविणारे. कधी किलकीले, तर कधी भेदक, कधी मृदू तर कधी प्रेमाची उब देणारे. वागण्याचा ढंग आपण सावधान आहोत हे सांगणारा. त्यांचे संभाषण दुसऱ्याला आपलेसे करणारे, पण सावध किंवा वेळप्रसंगी तुटक. पौरुषाने ओसंडलेला पण स्त्रीला शोभेल अशा कोमल संवेदना असलेल्या या माणसासारखा मनुष्य मी यापूर्वी कधीही पाहिलेला नव्हता." कॉनरॅड लेखक *म्हणून मान्यता पावल्यानंतर गार्नेट* यांनी आपल्याला प्रोत्साहन दिल्याचे त्याना स्मरण होते. अलमायेर्स फॉली ही कादंबरी लिहून हातावेगळी केली,त्यावेळी ते द्विधा मन:स्थितीत होते. आपण साहित्य-कला क्षेत्रातील जीवन पत्करावयाचे, की आपण या इथे आणि या क्षणाला, आपण कोणीतरी आहोत, अशा प्रकारचे नाविक अधिकाऱ्याचे जीवन पसंत करावयाचे या संबंधात त्यांचा काहीही निर्णय होत नव्हता. या प्रथम भेटीत एडवर्डनी 'अलमायेर्स फॉली' या कादंबरीची स्तुती केली. "लेखन हा व्यवसाय जो कोणी स्वीकारणार आहे, अशा लेखकाला योग्य अशी कॉनरॅड यांची मनोरचना आहे, आणि शिवाय माझी लेखनशैली आकर्षक आहे." असे एडवर्डनी कॉनरॅडला सांगितले. कॉनरॅड यांनी या संदर्भात पुढील आठवण नमूद केलेली आहे. कॉनरॅड सांगता आहेत की, "ते जर मला असे म्हणाले असते की, लेखन यापुढे चालू ठेवण्याचे काही कारण आहे का? ते ऐकून मला *पक्षघात* झाला आहे, असेच होणार होते. मग मी लेखन एक व्यवसाय





अनुक्रमणिका

म्हणून त्याकडे वळलोच नसतो. परंतु (एडवर्ड) मला म्हणाले की,"तू एक पुस्तक / पुस्तिका" जे काही लिहिले आहेस, ते फारच चांगले आहे. मग तू दुसरे का लिहित नाहीस? या संभाषणाने केवढा फरक पडला? हे तुला दिसते का? आणखी एक? होय. मी ते लिहिले असते. मला लिहिता आले असते. आणखी अनेक लिहिता आली असती असे नाही. पण आणखी एक लिहिले असते. मला लेखन चालू ठेवण्यास अशा प्रकारे एडवर्डने प्रोत्साहन दिले. मी लेखक बनलो त्याचे कारण ते." कॉनरॅड यांनी आपल्या मैत्रिणीला लिहिलेल्या पत्रातील हा उतारा आहे.

या पहिल्या भेटीनंतर एडवर्ड व कॉनरॅड यांची मैत्री झाली. हे दोघे मित्र कधीकधी कॉनरॅड यांच्या ब्रह्मचारी मठीत भेटत. कॉनरॅड यांच्या या जागेत एक उंच पडदा, एक आराम खुर्ची, गारठा घालविण्याकरता उबदार शेगडी होती. फ्रेंच कादंबऱ्यांची रांग, शेगडीवरच्या फळीवर कुटुंबियांची छायाचित्रे आणि काही एनग्रेव्हींगज होती. गार्नेट कॉनरॅड यांच्या व्यक्तिमत्त्वाने चांगलेच मोहीत झाले. गॉल्सवर्दीच्या मनातही तशीच भावना निर्माण झाली होती. विशेषत: कॉनरॅडनी आपल्या पूर्वा आयुष्यातल्या सहासांचा वृत्तांत सांगितला तो ऐकून या मूळ भावनेत भर पडली. कॉनरॅड यांनी सांगितलेल्या एका साहसाचा वृत्तांत त्याना चांगलाच लक्षवेधी वाटला. एडवर्ड यांनी नमूद केले आहे, कॉनरॅड यांनी सांगितले की, "एक रागावलेला नीग्रो हातात वस्तरा घेऊन धक्क्यावर उभा होता. त्याला बोटीवर पाऊल ठेवू द्यावयाचे नव्हते. धक्क्यावरून बोटीवर येण्यासाठी दहा इंच रूंदीची फळी होती. त्यावरून तो नीग्रो बोटीवर चढणार होता. कॉनरॅड यांच्या हातात एक आखूड काठी होती. त्याच्या मदतीने (मला) त्या नीग्रोला धक्क्यावर पुन्हा लकटावयाचे होते." AN OUTCAST OF THE ISLANDS ही कॉनरॅड यांची अलमायेर्स फॉली नंतरची कादंबरी. तिची पहिली काही प्रकरणे, कॉनरॅडनी गार्नेटना वाचून दाखविली. ते काही शब्द चुकीचे उच्चारत. हे शब्द त्यानी पुस्तकातून वाचलेले होते, पण बोललेले कधीही ऐकले नव्हते. परंतु यामुळे कॉनरॅड जे काही वाचीत होते, ते गार्नेट याना समजतच नव्हते. कॉनरॅड यांनी साहित्य कलात्मक उद्दिष्टांचा विचार करावा याबद्दल एडवर्डनी आग्रह केला आणि प्रोत्साहन दिले. जनतेच्या अभिरूचीकडे लक्ष देऊ नको असे बजाविले. हे ऐकून हा सदतीस वर्षाचा कादंबरीकार चांगलाच भयभीत झाला. तो काहीसा रागावला, आणि त्याने जाहीर केले. "मी पोटमाळ्यावरच कायम राहणार नाही. . . ते दिवस केव्हाच मागे पडले आहेत हे तुला समजले आहे का?" गार्नेट यांनी भाकीत केल्याप्रमाणे कॉनरॅड यांच्या साहित्याला फार मोठा वाचकवर्ग लाभला नाही. परंतु त्याना पोटमाळ्यावरही कधी राहावे लागले नाही. असे होते तरी लेखक म्हणून पहिली वीस वर्षे त्याना पैशाची आत्यंतिक चणचण नेहमीच भासे.

कनिंगहॅम हा कॉनरॅड यांचा आणखी एक जवळचा मित्र. तो कॉनरॅड यांना इ. स. १८९७ मध्ये प्रथम भेटला. गार्नेट आणि कनिंगहॅम हे दोन असे मित्र होते की, त्याना

कॉनरॅड हे सर्वस्वी प्रामाणिकपणे आणि मनापासून लिहीत. गार्नेट यांनी कॉनरॅड यांच्या पहिल्या दोन कादंबऱ्या हस्तलिखित अवस्थेत असताना वाचल्या होत्याच. पण त्यानंतरच्याही अगदी लगतच्या भविष्यकाळातील सर्व कादंबऱ्यांची हस्तलिखिते त्यानी वाचली होती. गार्नेट यांच्या परखड समीक्षेसाठी, प्रोत्साहनासाठी आस्वादकतेसाठी आणि मैत्रीबद्दल कॉनरॅड हे सदैव कृतज्ञ होते. आपल्यापेक्षा तरुण असलेल्या एडवर्ड यांच्या मताचे महत्त्व त्याना होते; व त्यांचा ते आदरही करीत. नैतिकतेचा मापदंड या स्वरुपात त्यांच्याकडे ते पहात. गार्नेट यांच्या अपेक्षा कॉनरॅड यांच्याकडून जेव्हा पुऱ्या होत नसत, तेव्हा कॉनरॅड क्षमायाचनाही करीत. "ज्या मुलाने चूक केली आहे. अशा मुलाच्या मनात जी भावना असते, तशीच माझी तुमच्याबद्दल आहे. लज्जा व बेबंदपणा यामुळे मी गप्प आहे. परंतु दूरवरच्या भविष्यकाळात कधीतरी मला क्षमा केली जाईल आणि मला जवळ ओढाल; त्या दिवसाकडे मी अगदी संथपणे नजर खिळवून ठेवली आहे" असे कॉनरॅड यांनी नमूद केलेले आहे. कॉनरॅड यांच्या INHERITORS या कादंबरीत LEA नावाची व्यक्ती त्यानी शब्दांकित केली आहे. ही व्यक्ती गार्नेट नजरेसमोर ठेवून साकारलेली आहे. कॉनरॅड यांनी गार्नेटना दिलेली ही पहिली मानवंदना. गार्नेट यांचे औदार्य आणि त्यांची अंतर्भेदीदृष्टी याबद्दल त्यांची स्तुती केलेली आहे. आपल्या मित्राने आपल्याला दाखविलेले औदार्य आणि स्नेह यांची भरपाई करता येत नाही यासंबंधी वाटत असलेली अस्वस्थता व्यक्त केलेली आहे.

*"जुन्या दिवसात लेआ यांनी मला खूपच मदत केली... खरे म्हणजे ते सर्वानाच मदत करीत. माझ्या दशकातील प्रत्येक कादंबरीकाराच्या सुरुवातीच्या लिखाणात लेआ यांचा जो प्रभाव होता. त्यांच्या खूणा तुम्हाला बहुधा आढळतील. ज्या कोणी काही चांगले काम केलेले आहे आणि जे कोणी चांगली सुरुवात करून मग त्या पलीकडे कधी गेले नाहीत त्यांच्या-वरही लेआ यांचा प्रभाव दिसून येतो. 'प्रकाशकांच्या वाचकाला' इतराना जी काही पैशाची वा इतर ऐहिक स्वरुपाची मदत देणे शक्य असते, ती मदत त्यानी मला केली होती. ही मदत दिल्यामुळे त्यांची व्यावसायिक प्रतिष्ठाही धोक्यात आली पण त्यांनी मदत देण्याचे थांबविले नाही. फारच थोड्याना जी मदत देणे शक्य झाले असते अशी कितीतरी अधिक मदत त्यानी मला केली होती. मला या एकतर्फी मैत्रीची लाज वाटते."*

वास्तविक प्रकाशकाचा वाचक म्हणून गार्नेट यांची जाण अगदी तरल होती. त्याना अलमायेर्स फॉली ही इतकी कमालीची वास्तव व खरी वाटली की, कॉनरॅड यांच्या धमन्यातून पूर्वेकडचे रक्त वाहत आहे अशी त्यांची श्रद्धा तयार झाली. परंतु इतर जाणकारानी मात्र या कादंबरीतील वास्तवतेविषयी व त्यांच्या खरेपणा संबंधात प्रश्न उपस्थित केले होते. ६ सप्टेंबर इ. स. १८९८च्या सिंगापूर फ्री प्रेस या दैनिकात HUGH CLIFFORD यांनी कादंबरीतील नदी व जंगल हा परिसर व त्यातील वातावरण हे कमालीच्या ताकदीचे आहे असे सांगून त्याची स्तुती केली आहे. परंतु त्याजबरोबर अज्ञानाचे

गालबोट या कादंबरीला लागल्याचेही त्यानी नमूद केलेले आहे. त्यांच्या मते एखादी वास्तव जगतातील नीना ही आपल्या नेटीव्ह जीवनाकडे परत फिरकणारच नाही. दरबारी वातावरणात वाढलेला बाबलाटची हा राजेसाहेबांच्या देखत, जांभया देणे व स्वत:चे अंग खाजविणे अशा अशोभनिय गोष्टी करण्याचे धैर्य कधीही दाखविणार नाही. हे टिकाकार क्लीफोर्ड हे कालांतराने कॉनरॅड यांचे मित्रही झाले होते. पण त्यानी आपण केलेली ही टिका कधीही मागे घेतली नाही. याउलट त्यांनी कोलोंबो येथे एक व्याख्यान दिले त्यात या टिकेचा पुत्ररुचार केला होता. या व्याख्यानात ते म्हणाले "मलायातील लोकांची चालचलणूक रितीभाती त्यांची भाषा व स्वभाव या सर्व गोष्टींशी लेखकाची परिचय नाही आणि यदाकदाचित असलाच तर तो अगदी वरवरचा आहे. या पुस्तकात एकदी पहिल्या पानापासून तो कादंवरीच्या समाप्तीपर्यंत तुम्हाला एकही मलायन नाव अगर मलायन शब्द हा चुकीच्या पद्धतीने लिहिलेला नाही असे आढळणार नाही."

बोर्नियातील भूमीवर कॉनरॅड यांनी फक्त बारा दिवस वास्तव्य केले होते. या अगदी थोड्या कालावधीत व त्यांचा नाविक क्षेत्रातील व्यवसाय लक्षात घेता, त्यांचे निरीक्षण कितीही प्रज्ञावान असले तरी या एवढ्या थोड्या वेळात, त्याना स्थानिक जनतेसंबंधात फारसे ज्ञान करून घेता आले असते असे नाही. असे असले तरी लेखक कॉनरॅड यांच्या बाजूने बोलता येण्यासारखे बरचे आहे. एकतर मलाक्का आणि सिंगापूर या दोन ठिकाणी त्याना अनेक मलायींचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्याची संधी मिळाली होती. शिवाय अनेक मलायी लोकाबरोबर विडार (VIDAR) या बोटीवर काम केले होते. THE END OF THE TETHER मधील आंधळ्या कप्टन व्हाले (WHALLEY) यांच्यासाठी त्यांचा विश्वासू सारंग ती बोट हाकारीत असतो. मलायी लोकांच्या संबंधीच्या विस्तृत ज्ञानासंबंधीची आपली कमतरता, त्यानी आणखी एका मार्गाने भरून काढली होती. मलायी नावाच्या संबंधी (यात त्यामानाने अपरिचित व असंभाव्य अशा बाबलाटची या नावाचा समावेश आहे) काही शहाण्या- कंटाळवाण्या अशा संदर्भ ग्रंथांचा त्यानी वापर केला होता. कॉनरॅड हे आपल्या कादंबऱ्यात यथातथ्य व अचूक चित्रण व्हावे यासाठी कमालीचे कष्ट घेत असत म्हणूनच आपल्या कादंबऱ्यातील या गोष्टींसंबंधी होणाऱ्या टिकेचा आदर त्यांनी लिहिलेल्या खाजगी पत्रातून आणि लेखातून व्यक्त केलेला आहे. अगदी आश्चर्य वाटावे असा आदर व्यक्त करीत. संपादक आणि समीक्षक या दोघांचा या विषयाबाबतचा जो काही अधिकार असेल त्यालाच ते आव्हान देत. क्लीफोर्ड यांनी केलेल्या आपल्या परिक्षणासंबंधी कॉनरॅड यांची प्रतिक्रिया अशी होती. 'हे परीक्षण पराकोटीची स्तुती करणारे असले, तरी 'मलाया' संबंधी मला काहीच माहिती नाही असे ते वस्तुत: सांगत आहे'. हे त्यानी विल्यम ब्लाकवूड यांना सांगितले. त्यानी कॉनरॅड यांचा KARAIN कारेन आणि इतर मलायन गोष्टी या नावाचा कथासंग्रह प्रसिद्ध केला होता. 'ते यापुढे जाऊन त्याना असे म्हणाले की' मायलेशिया या देशाबाबत मी कोणी

अधिकारी व्यक्ती असे सांगून, ते स्थान मला मिळावे असे कधीही सांगितलेले नाही' त्यानी A PERSONAL RECORD या आत्मचरित्रात्मक पुस्तकात 'लेखकाचे टिपण' या शिर्षकाखाली पुन्हा एकदा त्या परिक्षणाचा दखल घेऊन, येथे नमूद केलेल्या विधानांचा पुनरुच्चार केलेला आहे. समीक्षक क्लीफोर्ड यांना लिहिलेल्या पत्रात त्यांच्या अधिकाराचा आदर करून त्यानी असे सांगितले की 'मी कॉनरॅड याला असा संशय येतो की माझ्या साहित्य निर्मितीत मी मलायन वातावरण व त्याचे रंग हे जे मी गृहीत धरले होते ते सारे या क्षेत्रातील जे ज्ञानी आहेत त्याना कमालीच्या मानसिक त्रास देणारे आहेत असे वाटले असणारच.' तथापि मलायन देशात मोठ्या अधिकारच्या स्थानावर असलेल्या मग ती नोकरशाहीतली असोत वा व्यापारातील असतो. जुन्या आणि बुजुर्ग सदगृहस्थासारख्या अगदी वेचक अशा वाचकासाठी कॉनरॅड लिहित नव्हते. परंतु इंग्लंडमधील आणि इतर देशातील इंग्रजी वाचकाना कादंबरीकार कॉनरॅड यांनी चित्रित केलेली वस्तुस्थिती आणि त्यांचे टिकाकार क्लीफोर्ड यांची अचुकता यात फरक करणे शक्य नव्हते. महत्त्वाचा मुद्दा हा होता की, या कादंबरीमध्ये केलेले मलायी लोकांचे शब्दांकन किती वास्तवतेने आणि परिणामकारकतेने केलेले आहे? हा क्लीफोर्ड यांनी शब्दांकित केलेल्या व्यक्ती या कदाचित् एखाद्या तज्ज्ञाने वर्णन कराव्यात अशा असतील. मलायी नावाचे उच्चार अचूक करता यावेत यासाठी एखाद्या पढीक पंडिताप्रमाणे प्रत्येक अक्षराखाली योग्य मार्गदर्शक खूणही केलेली असेल. परंतु या व्यक्ती कमालीच्या निरस ठरण्याल्या असत्या. याउलट कॉनरॅड यांनी शब्दांकित केलेल्या व्यक्ती, या अगदी नैतिकतेचा दिमाख दर्शविणाऱ्या असल्यातरी त्या वाचकाच्या मनाला पटतील व जिवंत अशा होत्या.

अलमायेर्स फॉली या कादंबरीत फक्त नेटीव्ह मलायी लोकांचे चित्रण नाही. DYAKS डिआक, अरब व त्यांचे गुलाम, यांचे चित्रणही आहे. स्थानिक राजा, त्या बेटाच्या पार दुसऱ्या टोकाला असलेला स्थानिक लोकांशी संबंध नसलेला दुरस्थ सुलतान आणि फार दूरवरच्या अंतरावरच्या BATAVIA बटाव्हिया येथले राज्यकर्ते यांच्यातील राजकीय उतरंड त्यात सुचित करण्यात आलेली आहे. या डच राज्यकर्त्यांच्या तोफ असलेल्या बोटी वेळप्रसंगी डच निशाण घेऊन, या भागात येत असत. त्याचेही वर्णन कादंबरीत आहे. चार्लस ओलमेयर या एका खऱ्याखुऱ्या व्यक्तीपासून सुरुवात करून, त्याच्या जीवनातील तपशीलात कॉनरॅड यांनी लक्षणिय बदल घडवून आणला. त्यानी त्याला अकरा मुलांची पिल्लावळ बहाल करण्याऐवजी, शोककारक नशीब आणि त्याच्याशी निष्ठा नं ठेवणारी एकुलती एक मुलगी, लेखकाने चार्लसला दिलेली आहे. टॉम लिनगार्ड यांचा आश्रय, एका युरेशियन बाईबरोबर झालेला त्याना श्रीमंती व वैभव प्राप्त करून देणारा विवाह, नीना या कन्येचे महान भवितव्य, कल्पनाही करता येणार नाही अशी अमाप संपत्ती, बोर्नियेतून सुटका, त्यांनी तोवर कधीही न पाहिलेल्या ॲमस्टरडमध्ये सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त होणे,

त्याचबरोबर पडझड झालेला त्यांचा प्रचंड वाडा, या सर्वाबद्दलची दिवास्वप्ने व आभास, इत्यादी गोष्टींचा संदर्भ या कादंबरीच्या नावात आहे.

या कादंबरीचे संविधानक साधे व सरळसोट आहे. संशय, फसवणूक आणि कारस्थाने यांने पुरेपुर भरलेली ही कादंबरी. सोन्याच्या खाणीचा शोध आपणाला लागेल ही व्यर्थ आशा, बंदुकीची दारू विकण्याचा, तिची ने-आण करण्याचा चोरटा व अवैध व्यापार आणि आपल्या सुंदर आशियाई-युरोपिय कन्येमार्फत प्रतिष्ठा प्राप्त करून घेण्याचे ओलमेइयर यांचे प्रयत्न या सर्व घटनांच्या अवती-भोवती ही कादंबरी फिरत असते. नीनाचे वडील गौरवर्णिय डच आहेत, तिचे शिक्षण सिंगापूर येथे कॉनव्हेंटमध्ये होते, असे होते तरी नीना आपल्या आईची 'काळा आदमी' ही अवस्था म्हणजे मलाय होणे पसंत करते. आपल्या पित्याशी एकनिष्ठ रहाण्यापेक्षा ती आपला प्रियकर एक स्थानिक राजपूत्र डेन मारूला (DAIN MAROOLA) यांच्याशी एकनिष्ठ राहणे पसंत करते. डेन मारूला हा रोमँटीक राजपूत्र या कादंबरीचा नायक आहे. हा मुद्दा लक्षणिय आहे. त्याजबरोबर कादंबरीत अवतरणारे इतर सर्व गौरवर्णिय डच, मूर्ख आणि पैशाचे लोभी आहेत, असे सांगण्यात आलेले आहे. ही कादंबरी लिहिताना कॉनरॅड यांनी एका गोष्टीची कल्पना केली होती. उदा. समजा आपल्या बेजबाबदार प्रेरणाना बळी पडून ते 'विदार' या बोटीवरच राहून एखाद्या स्थानिक सुंदर तरुणीच्या प्रेमरूपी मोहपाशात गुरफटले असते तर? पूर्व, पूर्वेकडचे लोक, ती संस्कृती आणि आपल्या स्वत:च्या लांचलुचपती व भ्रष्ट आकांक्षा यांनी एखाद्या माणसाचा कसा नाश होतो, हे या कादंबरीच्या संविधानकातील सूत्र आहे.

कॉनरॅड यांच्या या पहिल्या कादंबरीतले दोन प्रसंग हे विशेषत: संस्मरणिय आणि अगदी खोदल्यागत लक्षात रहावेत असे कॉनरॅडीय आहेत. एकतर त्या दोन्हीवर दु:खाचे सावट आहे. त्याजबरोबर काहीसा कडवट व सिनिकल विनोदही त्यात आहे. नीना अलमायेर यांना सोडून आपल्या प्रियकर राज्यपुत्राबरोबर जावयाचे ठरविते. 'दोन माणसाना एकमेकांना समजावून घेताच येत नाही.' हे उद्गार वाढते; व त्यातून सुचित होणाऱ्या दु:ख-दायक अंतर्दृष्टीचा स्विकार तिने केलेला असतो. रॉबिनसन क्रुसो आणि फ्रायडे यांची पहिली भेट, हा प्रसंग रॉबिनसन क्रुसो या कादंबरीतील एक संस्मरणीय प्रसंग. कॉनरॅड यांनी तो उलटा करून मांडला आहे. आपली कन्या आपण गमावून बसलो, याचे दु:ख अलमायेर यांना जरूर झाले होते. आपण जे काही गमाविले त्याचे शोकजनक आणि रोगट असे स्मारक आपल्या कृतीने ते निर्माण करतात. अलमायेर हे हात व गुढघे जमिनीवर टेकून रांगत रांगत पुढे पुढे सरकतात. नीनाच्या पावलांच्या उमटलेल्या ठशावर वाळू पसरतात. असे करून नदीच्या काठापर्यंत छोट्या पावलांची ओळच ते आपल्या मागे ठेवून परतताना पाहून अलमायेर यांची नोकराणी हे सारे पहाते व दु:खी होते.

दुसऱ्या प्रसंगात मलाय राजाचे दुष्ट कारस्थान व व्हेर्डी या प्रख्यात संगीतकाराने

लिहिलेल्या IL TROVATORE या महशूर संगीतकेतल्या एका प्रसंगाची सांगड घातलेली आहे. लाकंम्बा या राजाने, देवीचे वण तोंडावर असलेल्या आपल्या विश्वासू बाबलटाची या नोकराला अलमायेर याला विष घालून ठार मारण्याचा हुकूम दिला. एकदा अलमायेर मेला म्हणजे मग सोन्याच्या खाणी कोठे आहेत. हे डचाना समजणार नाही याची लाकंम्बाला खात्री होती. हा हुकूम दिल्यानंतर लाकंम्बा बाबलाटचीला आर्गनवर व्हेर्डी या संगितकेतील ओळी वाजविण्यास फर्मावितो. या संगीतकेतील नायक मानरीको हा लढाईत पराभूत झाल्यानंतर त्यास गिरफदार करण्यात येते; व त्याच्या वधाची तयार होताना त्याने आपली प्रेयसी लेओनारा आणि आपले स्वत:चे आयुष्य या दोघांचा निरोप घेताना ज्या ओळी मानरीको म्हणतो, त्या ओळी बाबलाटची धन्याच्या इच्छेनुसार आर्गनवर वाजवितो; व त्या ओळींचे सूर आजुबाजूच्या जंगलात विरून जातात. कॉनरॅड यांनी या प्रसंगाबाबत लिहिले आहे.

*Through the open shutter the notes of Verdi's music floated out on the great slience over the river and forest. Lakhamba listened with closed eyes and a delighted smile; Babalatchi turned, at times dozing off and swaying over, then catching himself up in a great fright with a few quick turns of the handle. Nature slept in an exhaustec repose after the fierce turmoil, while under the unsteady hand of the statesman of Sambir the Trovatore fitfully wept, wailed, and bade good-bye to his Leonore again and again in a mournful round of tearful and endless iteration.*

इ. स. १८९४ हे वर्ष कॉनरॅड यांच्या आयुष्याला कलाटणी देणारे वर्ष होते. जानेवारी महिन्यात त्यानी यापुढे बोटीवर नोकरी करावयाची नाही असे ठरविले. त्याना पित्यासमान असलेल्या TADEUSZ तादउस्झ हे मृत्यू पावल्याकारणाने त्यांचा मायदेश पोलंडबरोबर त्यांची कायमची फारकत झाली. एप्रिल महिन्यात त्यानी आपली पहिली साहित्यकृती व कादंबरी – अलमायेरर्स फॉली ही लिहून हातावेगळी केली. ऑक्टोबर महिन्यात ती प्रकाशकाने स्विकारली आणि ते व्यवसायाने लेखक झाले. नोव्हेंबर महिन्यात ज्यांच्याशी त्यांची आयुष्यभर मैत्री कायम राहिली, त्या एडवर्ड गार्नेट आणि जेस्सी जॉर्ज ही त्यांची भावी पत्नी या दोघांचीही पहिली भेट झाली.

## (४) सांबिरचा शोध

अनेकांना भटकंती करावयास आवडते. हा शोक ज्या स्त्री-पुरुषांना आहे, त्यानी वाङ्मयीन क्षेत्रात संशोधन करण्याचे काम जरूर पत्करावे. यापेक्षा अधिक हवाहवासा व्यवसाय या अशा शोकीनांच्या दृष्टीने असणार नाही. आपल्या तब्बेतीला मानवणाऱ्या प्रकारचे संशोधन, त्यासाठी आवश्यक वेळ, व पैसे असले, की मग भटकंतीची आपली

हौस पुरी करण्यासाठी वेगळे कारण शोधावयास नको. पाश्चिमात्य वाङ्मयाच्या आधुनिक संशोधन क्षेत्रातल्या इतिहासात या प्रकारची अनेक उल्लेखनीय उदाहरणे आढळतील. बॅरट आणि ब्राअनिंग कुटुंबाच्या इतिहासात अगदी बारीक- सारीक तपशीलात जाऊन केलेल्या संशोधन कार्यात जीअनेट मार्क (JEANNETTE MARK) मग्न असताना, त्या या कामासाठी वेस्ट इंडिज बेटावर अनेक महिने मुक्काम ठोकून होत्या. इ. स. १९३०च्या उन्हाळ्यात हॉवर्ड. एफ. लोरी आणि चोन्से ब्रेवस्टर टिंकर (HOWARD F LOWRY - CHAUNCEY BREWSTER TINKER) या दोन अमेरिकन संशोधनकानी आपले सुट्टीचे दिवस अशाच प्रकारच्या संशोधनासाठी खर्च केले. अनेक वर्षापूर्वी ज्या तरूणीच्या व्यक्तित्वाने तरूण मॅथ्यू अर्नाल्ड याना भुरळ पडली होती, त्या तरूणीच्या संदर्भात एखादा बारकासा दुवा सापडतो का हे पहाण्यासाठी, त्यांनी स्वित्झर्लंडमध्ये अनेक दिवस भटकंती केली. मॅथ्यू अर्नाल्ड यांच्या स्वित्झर्लंड भेटीनंतर त्यांच्या उत्तम समजल्या जाणाऱ्या काव्यातून मार्गरीट (MARGUERITE) हे नाव घेऊन ती तरूणी अवतरली आहे. ही तरूणी कोण याचा शोध घेण्यासाठी ते दोघे आल्पस या पवर्ततीला थून THUN या प्रख्यात RESORT मध्ये दाखल झाले. मॅथ्यू अर्नाल्ड याना ती तरूणी या ठिकाणी भेटली होती असा समज आहे. आपणास त्या ठिकाणी काही माहिती हाती येईल अशी उमेद बाळगून हे दोन संशोधक होते. त्यानी त्या ठिकाणीच्या हॉटलचे दप्तर तपासावयाचे ठरविले होते. उत्तम पोषाख केलेला एक इंग्लिश तरूण आणि ती स्थानिक तरूणी यांच्यातील त्या उन्हाळी प्रेमप्रकरणातून निर्माण झालेल्या स्थानिक वदंता, परंपरेने आल्या आहेत का याचा मागोवा ते घेणार होते. त्यांच्या दुर्दैवाने त्या हॉटलने आपली फार जुनी दप्तरे नष्ट केली होती. आपल्या माता- पित्याना, आजोबाना अशा एखाद्या प्रेमप्रकरणाबद्दल बोलताना त्या शहरातल्या लोकानी ऐकलेले नव्हते. एवंच हे दोन संशोधक हात हलवित अमेरिकेला परतले. परंतु त्या आनंददायी सफरीची मधुर स्मरणे बरोबर घेऊन.

या अशा प्रकारच्या संशोधन कार्यात कोणी किती हजार किलोमीटर प्रवास केला याची आकडेवारी व त्यानंतर त्याच्या हाती काय आले हा ताळेबंद कोणी तयारही केलेला असेल. परंतु घटनांच्या एका छोट्या संचाचा मागोवा घेण्यासाठी केलेली भटकंती या संबंधातील विक्रम एका माणसाने प्रस्थापित केलेला आहे. हे संशोधक अलमायेर्स फॉलीतील सांबिरचा शोध घेत होते. त्याची कथा इंग्लिश वाचकालाही फारशी माहीत नाही. ती मराठी वाचकाला चांगल्या प्रकारे व्हावी हाच या लेखाचा हेतू आहे.

बोर्निओ या ठिकाणी कोठेतरी इ. स. १८८७-८८च्या दरम्यान एक पोलीश नावाडी आणि एक अगदी खिन्न असा डच व्यापारी यांची भेट झाली. ही भेट त्या पोलीश व्यक्तीच्या दृष्टीने सुदैवी व त्याच्या नशिबाला कलाटणी देणारी ठरली. हा पोलीश नावाडी, अरबाच्या मालकीच्या व्हिदार (VIDAR) नावाच्या आगबोटीवर अधिकारी होता. हा अधिकारी-नावाडी

पुढे जोसेफ कॉनरॅड या नावाने प्रसिद्ध पावला. कॉनरॅड याना जी प्रसिद्धी मिळाली तिची सुरुवात होण्यास त्या खिन्न डच व्यापाराने हातभार लावला होता. तो कॉनरॅड यांच्या पहिल्या 'अलमायेरर्स फॉली' या कादंबरीचा स्फूर्तीदाता होता. कॉनरॅड याना स्वत:सही नेहमीच असे वाटत होते की, त्यांची व 'कास्पर अलमायेर' यांची जी भेट झाली, ती कॉनरॅड यांच्या जीवनात अत्यंत निर्णायक महत्त्वाची ठरली होती. कॉनरॅड यांनी ए पसर्नल रेकॉर्ड (एक वैयक्तिक नोंद) या नावाचे एक आत्मचरित्र वजा पुस्तक लिहिले आहे. त्या ते लिहितात हा माणूस न भेटता तर 'माझ्या हातून, छापून येईल अशा स्वरूपाची एकही ओळ कधीही लिहिली गेली नसती, हे अगदी जवळजवळ निश्चित आहे.' कॉनरॅड याना एकदा ही व्यक्ती भेटल्यानंतर त्याना तिचा विसर पडेना. या काळात म्हणजे ते नाविक- अधिकारी होते त्या काळातही त्याना वाङ्मयात रस होता; तो एक हौशी वाचक या स्वरूपाचा. ते अजून मान्यवर लेखक नव्हते- नव्हे त्यानी लेखनास सुरुवातही केलेली नव्हती. त्यांचा व्यवसाय तोवर व पुढेही काही वर्षे नौकानयन हाच होता. त्यानी नुकतीच मास्टर्स (MASTERS) ही परीक्षा देऊन त्या विषयातले स्नातकत्व प्राप्त करून घेतले होते. परंतु त्याना त्या खिन्न डच व्यापाराचा विसर पडत नसल्याकारणाने, त्यानी त्या व्यक्तीत्वावर आधारलेली छोटी कादंबरी लिहावयास सुरुवात केली. इ. स. १८८९ ते १८९४ ही पाच वर्षे या कादंबरी लेखनाच्या खेळात त्यानी स्वत:ला गुंतवून घेतले. तयार होणाऱ्या कादंबरीच्या हस्तलिखिताकडे पाहून ते आपला जीव रमवीत असत. आफ्रिकेतील काँगो नदीवर वाहतूक करणाऱ्या एका बोटीवर सेकंड मेट (SECOND MATE) या हुद्यावर ते करीत होते. आपल्या फुरसतीचा वेळ ते या कादंबरी लेखनात घालवीत असत. यानंतर काही महिने त्याना नोकरी नव्हती. मध्यंतरी ते आजारी पडल्याकारणाने ते अशक्तही झाले होते. अशा अवस्थेत ते इंग्लंडमधील लंडन आणि स्कॉटलंडमधील ग्लासगो या शहरात रहात असताना त्यांनी या कादंबरीचा काही भाग लिहिता. सरतेशेवटी इंग्लंड- ऑस्ट्रेलिया अशा फेऱ्या करणाऱ्या बोटीवर फर्स्ट मेट (FIRST MATE) यावरच्या हुद्यावर काम करीत असताना, 'अलमायरेला फॉली' या कादंबरीवर त्यानी अखेरचा हात फिरवला. परंतु हा सारा उपद्वाप करीत असताना, आपण 'लेखक' हा व्यवसाय पत्करणार आहोत हा विचारही त्यांच्या मनाला शिवला नाही. त्यांची सर्व आकांक्षा त्यावेळी आपण एखाद्या बोटीचे सर्वोच्च अधिकारी होणे या उद्दिष्टावर केंद्रित झालेली होती. या आपल्या मनाला प्रिय असणाऱ्या उद्दिष्टाचा पाठलाग करीत असताना, 'अलमायेर्स फॉली' ही कादंबरी प्रकाशित झाली. या कादंबरी पाठोपाठ THE NIGGER OF THE NARCISSUS, THE OUT CASTS OF THE ISLANDS (दि निगर ऑफ दि नारसिएस्सस, दि आऊट कास्टस ऑफ दि आयलँडस) या कादंबऱ्याही प्रकाशित झाल्या. या मध्यंतरीच्या काळात, कॉनरॅड यांना सतत दोन आघाड्यावर एकाच वेळी लढाई करण्याचा प्रसंग आला. एकीकडे त्यांची तब्येत त्याना सतत त्रास देत होती. याच्या जोडीला,

त्यांचा विवाह होऊन, त्याना पुत्ररत्नाची प्राप्तीही झालेली होती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, त्याना स्वत:ला आपल्या पत्नीला, व आपल्या पुत्राला सांभाळणे, त्यांचा योगक्षेम योग्य प्रकारे चालला आहे की नाही हे पहाणे याची जबाबदारी येऊन पडली होती. त्यांना भविष्यकाळात आपण काय करणार, याचा निर्णय घेणे त्यामुळेच क्रमप्राप्त होऊन बसले होते. एखाद्या बोटीचा सर्वोच्च अधिकारी, या स्वरूपात बोटीच्या डेकवर उभे राहणे, हे आपले परमप्रिय असे स्वप्न व उद्दिष्ट त्याना मोठ्या नाखुषीने सोडून द्यावे लागले होते. हा आपल्याला प्रिय असलेल्या व्यवसाय करण्याऐवजी, मेजाजवळ बसून लिखाण करून आपली गुजराण करण्याचे आपल्या नशिबी आले आहे, याबद्दल कॉनरॅड यांची खात्री झाली होती. एवंच अलमायेर ही व्यक्ती प्रत्यक्षात कोणीही असो, तिने जोसेफ कॉनरॅड या महान इंग्रजी लेखकाला, आपली पहिली कादंबरी लिहिण्याची स्फूर्ती दिलेली होती.

कॉनरॅड या कादंबरीकाराचे जे चहाते होते, त्यांच्या साहित्याचे जे अभ्यासक होते, त्यांना मुळातील 'अलमायेर' ही व्यक्ती कोण, ती कोठे रहात होती, ह्याबद्दल अधिक माहिती करून घेण्याची दोन करणानी इच्छा होती. त्यातले पहिले कारण अलमायेरने कॉनरॅड यांना आपली पहिली कादंबरी लिहिण्यास स्फूर्ती दिली. दुसरे कारण वेगळेच आहे. मेलव्हिल हा एक प्रख्यात अमेरिकन लेखक. हा लेखक देखील व्यवसायाने नावाडी होता. मेलव्हिल यांनी या 'नाविक' आयुष्यात, जे अनुभव घेतले, निरीक्षण करून ज्या गोष्टी टिपल्या, इतर जो माल मसाला आणि कच्चा माल जमविला, हे सारे साहित्य पायाभूत मानून, त्यानी आपल्या पहिल्या महत्त्वाच्या कादंबऱ्या लिहिल्या. कॉनरॅड यांनीही तसेच केले होते या समजुतीस चांगला भक्कम आधार आहे. कॉनरॅड यांच्या कादंबऱ्यात अवतरणाऱ्या अनेक व्यक्ती, या त्याना ज्ञात असलेल्या अनेक व्यक्ती नजरेसमोर ठेवून शब्दांकित झाल्या होत्या. ही व्यक्तीचित्रे त्याना आफ्रिका आणि इंडोनेशिया (हा देश त्यावेळी डच लोकांच्या अधिपत्या– खाली होता) या विभागात त्याना आढळलेल्या काही व्यक्तीनुसार बेतलेली होती. त्यांच्या कादंबऱ्यातील अनेक मुलभूत घटिते व परिस्थिती ही देखील त्यांच्या प्रत्यक्ष व वास्तव आयुष्यात त्यानी अनुभवलेली होती. एवंच कॉनरॅड या लेखकाचा वाङ्मयीन क्षेत्रातील कलात्मकतेचा विकास कसा झाला हे अगदी नेमकेपणाने समजावून घेण्यासाठी, त्यानी साहित्यक्षेत्रात पाऊल टाकण्याअगोदर कोणत्या प्रकारचा अनुभवजन्य 'माल-मसाला' संग्रहीत केला होता हे जाणून घेणे आवशयक असते. हा झाला एक भाग. पण त्यानी या 'माल-मसाल्या'तील कोणत्या गोष्टीची निवड केली. आपल्या कादंबऱ्या लिहिताना त्या कादंबरीत समाविष्ट झालेल्या व्यक्तीवर कोणते संस्कार केले होते, हे जाणून घेणेही महत्त्वाचे आहे. कॉनरॅड यांच्या साहित्याच्या अभ्यासकांना या सर्व गोष्टीत रस होता. अलमायेरस फॉली या कादंबरीतील अलमायेर ही व्यक्ती, कॉनरॅड यांना जो अलमायेर माहीत होता, त्याचे हुबेहूब चित्रण या कादंबरीत शब्दांकित झाले आहे का? या कादंबरीचे कथानक प्रत्यक्षात

घडलेल्या घटनावर आधारित आहे का? त्याना माहीत असलेल्या अलमायेर आणि इतर व्यक्ती यांच्यातील काही ठळक व लक्षवेधी असेच गुण वा स्वभाव वैशिष्टे त्यांनी या कादंबरीतील व्यक्तीरेखात सिद्ध केली आहेत का? या कादंबरीतल व्यक्ती ही एका कल्पित साहित्य रचनेतील कल्पनेने निर्माण केलेली पात्रे होती का? अशा अनेक प्रश्नांची उत्तरे शोधण्या– पाठीमागे साहित्य संशोधक असतो.

कॉनरॅड यांनी आत्मचरित्रातही त्यांच्या स्फूर्तीदायी माणसाचे नाव 'अलमायेर' असेच दिले आहे. अलमायेर व आपली भेट बोर्निओ येथे कशी झाली याबद्दल त्यानी काहीसे विस्ताराने लिहिले आहे. बोर्निओचा त्यानी फक्त उल्लेख केला आहे. पण बोर्निओमध्ये नेमक्या कोणत्या ठिकाणी ही भेट झाली याबद्दल त्यानी काहीही लिहिलेले नाही. अथवा ते ठिकाण नक्की करता यावे असा कसलाही दुवा त्यांच्या आत्मचरित्रात आढळत नाही. इ. स. १९२४ साली कॉनरॅड चरित्र लेखक JEAN AUBRY जीन ओब्रे यांनी 'विदार' जहाजाबद्दल 'मास्टर' या हुद्यावर काम करणाऱ्या कॅप्टन क्रेग याना शोधून काढले आणि त्यांची भेट घेतली. 'विदार'या बोटीवरूनच कॉनरॅड यांनी सिंगापूर– बोर्निओ या जलमार्गावर मालवाहतूक केली होती. चरित्रकार व क्रेग यांची भेट झाली, त्यावेळी क्रेग यांची सत्तरी उलटून गेली होती. इतिहास प्रसिद्ध (अर्थात इंग्लिश साहित्य जगतात) अलमायेर हे नक्की कोठे रहात होते, याबद्दल पहिल्या प्रथम माहिती कोणी पुरवली असेल तर ती क्रेग यांनी. क्रेग यांनी असे सांगितले की, कॉनरॅड यांच्या कादंबरीत असलेले खेडे 'सांबिर' हे प्रत्यक्षात बोर्निओतील बुलुनगन (BULUNGAN) नावाचे खेडे आहे. बुलुनगन नदी समुद्राला मिळते. तेथपासून ते सुमारे साठ किलोमीटर त्या नदीच्या उगमाच्या बाजुला आहे. कॉनरॅड यांनी बुलुनगन नदीने नाव पानताई करून टाकले आहे. अलमायेर आणि राजा लाकंबा यांच्यातील संघर्ष 'सांबिर' या खेड्यात होतो. अलमायेर यांचे सासरे कॅप्टन टॉम लीनगार्ड यांनाच फक्त पानताई नदीवर जहाज कसे हाकारावे हे माहीत होते. ही माहिती त्यानी कोणालाच कधीही करून दिली नाही. परंतु कालांतराने या गुप्त मार्गाचा शोध अरब नावाड्याना लागला. अशा प्रकारे या नदीवर मालाची ने– आण करण्याची कॅप्टन टॉम लिनगार्ड यांची मक्तेदारी संपुष्टात आली होती.

न्यूयॉर्क पब्लिक लायब्ररीमध्ये 'बर्ग कलेक्शन' या नावाचा एक ग्रंथसंग्रह आहे. त्याचे क्युरेटर म्हणून डॉ. जॉन डी गॉर्डन नावाचे गृहस्थ काम करीत असत. अलमायेर या व्यक्तीला ठावठिकाणा लागण्यासंबंधात त्याना ओब्रे यांच्या चरित्राकरवी मिळालेला हा दुवा हे ईश्वरी वरदान वाटले होते. जाँ ओब्रे यांचा JOSEPH CONRAD LIFE AND LETFERS हा ग्रंथ प्रसिद्ध होऊन तेव्हा बारा वर्षे होऊन गेली होती. कॉनरॅड कादंबरीकार झाल्यानंतरच्या त्यांच्या सुरुवातीच्या काही वर्षांचा अगदी तपशीलात जाऊन डॉ. गॉर्डन अभ्यास करीत होते. त्यांना ओब्रे यांच्या चरित्राने दिलेल्या दुव्याचा पाठपुरावा करायचे नक्की केले. कॉनरॅड हे

बोर्निओत कोठे कोठे गेले असतील याचा तपास घेण्याची योजना आखली. अर्थात अलमायेर आणि त्या कादंबरीतील इतर प्रमुख व्यक्तींचाही ते शोध घेणार होते व खुद्द 'सांबिर' या खेडेगावासही भेट देण्याची त्यांची योजना होती.

या योजनेनुसार अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावर इ. स. १९३९च्या उन्हाळ्यात ते कॅलिफोर्निया येथे येऊन दाखल झाले. त्यांच्याबरोबर त्यांची पत्नी व बहीण होती. तेथून ते बोटीने ऑस्ट्रेलियाला गेले. मग विमानाने प्रवास करून सोएराबाजा SOERABAJA या शहरात आले. तेथे गेल्यानंतर बाटा आफशे पेट्रोलियम माआटशाप्पजी (BATA AFSCHE PETROLEUM MAATSCHAPPJI) या एका प्रमुख डच कंपनीने आपणास आपल्या संशोधन कार्यात सहाय्य द्यावे अशी विनंती त्यानी केली. बुलुनगन या गावाजवळ त्या कंपनीच्या मालकीच्या तेलाच्या विहिरी होत्या. या कंपनीचे अधिकारी शालीन होते. त्यांनी मदतही करण्याची तयारी दर्शविली. पण असल्या प्रकारचे संशोधन कोणी एखादा करतो आहे यावर त्यांचा विश्वासच बसत नव्हता. आम्ही कशाचा तपास करतो आहोत याची त्याना कल्पनाच करता येईना. त्या दिवसात तेलासाठी आंतरराष्ट्रीय स्पर्धा होत होती. म्हणून, 'मी, माझ्याबरोबरची माझी पत्नी व बहीण हे आम्ही सारे जण निश्चितपणे संशयास्पद व्यक्ती आहोत असे त्याना वाटले असणार' असे डॉ. गॉर्डन यांनी आपल्या आठणीत नमूद केले आहे. असे होते तरीही बुलुनगन गावाला कसे जायचे, याबद्दल त्यांनी डॉ. गॉर्डन याना मार्गदर्शन केले. ते अधिकारी त्याना असेही म्हणाले की, बोर्निओच्या जंगलातील या अशा एखाद्या ठिकाणास भेट देण्याचा डॉ. गॉर्डन यांचा आग्रहच असेल तर ते मदत करण्यास अर्थातच तयार आहेत.

या अधिकाऱ्यानी केलेल्या मार्गदर्शनानुसार डॉ. गॉर्डन यांनी एका शनिवारी सकाळी विमानाने 'जावा– समुद्र' ओलांडला. *विदार* या जहाजावरील एक अधिकारी म्हणून सिंगापूर–बोर्निओ अशा फेऱ्या कॉनरॅडनी घातल्या होत्या. त्याना जी बंदरे माहीत होती, त्यातील बंदरात नांगर टाकून त्यानी प्रवासी आपल्या बोटीवर घेतले होते. डॉ. गॉर्डन हे बोर्निओवरून विमानातून चांगलेच उंचावरून जात होते. बेरो नदीच्या (BEROW RIVER) प्रचंड डेल्टावरून ते मार्गक्रमण करीत होते. आपणास या प्रदेशाशी काही देणे घेणे नाही अशा प्रवासी तटस्थेने व कुतूहलाने ते या प्रदेशाकडे पहात मार्गस्थ झाले. त्याना असे स्वप्नातही आले नसते की, आपण ज्याच्या शोधात आहोत, त्याच्याशी तो प्रदेश फारच घनिष्टपणे संबंधित होता. थोड्या वेळाने बुलुनगन नदीच्या डेल्ट्यापाशी विमान येऊन पोहोचले. डोंगराच्या वरच्या बाजुला दाट जंगलात बुलुनगन हे खेडेगाव लपल्यासारखे वसलेले होते. ते या विमानाने पार केल्यानंतर ताराकान बेटाच्या किनाऱ्यालगत उभ्या असलेल्या तेलाच्या भल्या मोठ्या टाकीजवळच्या भागात त्यांचे विमान अलगद येऊन विसावले.

या तेलकंपनीच्या अधिकाऱ्यानी डॉ. गॉर्डन आणि त्यांच्या कुटुंबियांचे हसतमुखाने

स्वागत केले. कंपनीच्या मालकीच्या डाक बंगल्यात त्यांची उतरण्याची सोय करण्यात आली. पण या अधिकाऱ्याना ही सारी मंडळी ज्या उद्दिष्टाने, त्या आडवळणाच्या जागी आली होती. त्याबद्दल आश्चर्य वाटत होते. ते अर्थातच त्याना लपविता आले नाही. डॉ. गॉर्डन यांनी त्यांच्या या कुतूहलाचे समाधान करण्याच्या उद्देशाने, त्याना खरी परिस्थिती समजावून सांगितली. 'एका पोलीश नाविकाने ज्या मार्गावरून मालवाहतूक व उतारू यांची ने– आण केली त्या मार्गाच्या शोधात आम्ही आहोत. या पोलीश नावाड्याने, या अनुभवाच्या आधारे इंग्लिश भाषेत कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्या कादंबऱ्यातील अनेक पात्रे बोर्निओ– मलाय आहेत. या भागात या स्थानिक लोकात विपन्नाव्यस्थेत राहाणाऱ्या काही गोऱ्या डच लोकांवरून त्यातली काही बेतलेली आहेत. हे ऐकून त्या अधिकाऱ्यांच्या मनातील संशय दूर झाला. त्यांच्या कुतूहलाचे समाधान झाले. थोडक्यात आम्ही फारच निरूपद्रवी लोक आहोत. पण तसे चांगलेच वेडे आहेत हे त्याना उघडपणे दिसून आले.' 'वेड्या माणसाला चुचकारून घ्यायचे असते' या न्यायानुसार त्यानी आम्हाला एक मोटार लाँच दिली आणि दोन स्थानिक नावाडी बरोबर दिले. 'अशा रितीने डॉ. गॉर्डन यांनी खाडी पार करून, बुलुनगन नदीच्या उगमाकडे जाणारा पंचाहत्तर किलोमीटर प्रवास करण्यास रवानगी करण्यात आली. डॉ. गॉर्डन यांनी आपण सरतेशेवटी सर्व अडचणीवर मात करून विजयी झालो आहोत. या भावनेने मार्गस्थ होताना उद्‌गार काढले 'सांबिर'

नदीच्या पात्रात ठिकठिकाणी मासे पकडण्यासाठी जे कुंपणासारखे दिसणारे बंधारे होते. ते त्यानी ओलांडले. नदीच्या डेल्टामध्ये अनेक पाटांचे जाळे होते. ते त्या लाँचने पार केले. या नदीच्या काठी अनेक पाम-वृक्ष दाटी– वाटीने उभे राहून मानवंदना देत होते. चुकूनच एखादे गाव दिसे. सूर्य अस्तास जाऊ लागला, तेव्हा काही पुरुष व मुले नदीत डुंबताना दिसू लागली. त्याजबरोबर लाकडे जळल्याचा, आणि जे अन्न शिजत होते, त्याचा वास नदीवरून येऊ लागला. अमेरिकेतील हार्वड या विश्वविख्यात विद्यापिठातील, साहित्य क्षेत्रातील या तरूण पंडितीला हे सारेच दृष्य चक्रावून टाकणारे होते. त्याजबरोबर त्यांची परिस्थिती तशी चांगलीच चिंताजनक होती. एकतर त्यांच्याबरोबर असलेल्या मलायन नावाड्याना इंग्रजी बोलता येत नव्हते. खुद्द डॉ. गॉर्डन याना मलाय भाषा आणि डच भाषा यापैकी एकही भाषा येत नव्हती. बोर्निओ या प्रदेशातील गुंतागुंतीच्या जंगलात ते येऊन पडले होते. त्यांच्यापाशी असलेल्या नकाशात, ते ज्या खेड्याकडे निघाले होते. त्याचा मार्गही दाखविण्यात आला नव्हता. या सर्व अडचणींवर भर घालण्यासाठी म्हणून की काय, उष्ण कटिबंधातील घनदाट रात्र त्यांच्यावर चाल करून, अगदी आपल्याजवळ येऊन ठेपली आहे असे दिसल्याबरोबर ते फारच अस्वस्थ झाले. परंतु आकाशात थोड्याच वेळात त्याना परिचित असलेले तारकापुंज दिसू लागले. त्यांच्या दर्शनाने ते सुखावले. ते आपल्या मनाशीच म्हणाले 'किमानपक्षी' 'सांबिर' मी राहतो त्या जगातच आहे.'



अनुक्रमणिका

डॉ. गॉर्डन यांना घेऊन निघालेली लाँच त्या घनदाट जंगलातून वहाणाऱ्या नदीच्या काठाकाठाने आणखी काही थोडे किलोमीटर पुढे गेली. नावाड्यानी आणखी पुढे जाण्यासाठी इशारा दिला आणि ते आपल्या मातृभाषेतून गलगलाट करू लागले. त्याच वेळी डॉ. गॉर्डन याना काहीतरी चमकताना दिसले. खरे म्हणजे ते डच लोकानी बुलुनगन येथे वसविलेल्या वसाहतीतील दिव्याच्या प्रकाशांचे ते प्रतिबिंब होते. डॉ. गॉर्डन याना जे काही पाहिले, त्याचे त्याना आश्चर्यच वाटत होते. या अत्यंत दूरवरच्या व आडवळणाच्या ठिकाणी आर्क (ARK) दिव्यानी उजळलेले आकाश हे दृश्य त्याना तसे निराशाजनक होते. याचे कारण डॉ. गॉर्डन हे हजारो किलोमीटर पार करून आले होते ते कशा करता? तर केवळ, कादंबरीकार कॉनरॅड याना जे पर्यावरण परिचित होते त्यात आपणास गाडून घेणे या एकाच उद्देशाने. परंतु त्यांच्या दुर्दैवाने त्याना असे आढळून आले की, आपण पुन्हा एकदा पाश्चिमात्य सभ्यतेच्या विसाव्या शतकात येऊन दाखल झालो आहेत. असाच हा सारा बनाव होता का?

परंतु त्यांची लाँच त्या संपन्न सभ्यता असलेला बाजूकडे न जाता, त्याच्या समोरच्या किनाऱ्याला लागली. हा विभाग बुलुनगन गावातल्या मलाय लोकांच्या वस्तीचा भाग. या ठिकाणी अगदी सामान्य तेलाचे मिणमिणते दिवे होते. नदीच्या काठी हे दिवे सुद्धा कसेतरी कोठेतरी मिचमिचत होते. डॉ. गॉर्डन आणि त्यांचे सहकारी धक्क्यावर उतरवल्यानंतर त्यांचे स्वागत मिसेस फिस्क यांनी केले. या एक अमेरिकन मिशनरी होत्या. डच तेल कंपन्याच्या अधिकाऱ्यानी मिससे फिस्क याना डॉ. गॉर्डनची ओळख पटावी म्हणून त्यांचा परिचय करून देणारे पत्र डॉ. गॉर्डनजवळ दिलेले होते. नेमक्या त्याचवेळी मिसेस फिस्क यांचे यजमान गावाला गेले होते. हॉस्पिटलसाठी लागणाऱ्या यंत्रसामुग्रीची जमवाजमव करण्यात ते व्यस्त होते. ही समुग्री मिळाल्यानंतर ते डायआकस (DYAKS) या आतल्या भागात आपल्या मिशनच्या कार्याचा विस्तार करणार होते. येथे धक्क्यावर उतरण्यापूर्वी, सुरुवातीलाच आपण पुन्हा एकदा पाश्चिमात्य संस्कृतीत येऊन पडलो आहेत. असा जो विचार डॉ. गॉर्डन यांच्या मनात आला होता, तो मिसेस फिस्क यांनी दूर केला. त्यानी डॉ. गॉर्डन याना असे सांगितले की, पलीकडच्या किनाऱ्यावर दिसणारे आर्क– लाईटस, इतकीच प्रगती बुलुनगन खेड्याने केलेली आहे. एरवी तो भाग जोसेफ कॉनरॅड यांच्यावेळेला होता, तसाच तो आजही आहे. पलीकडच्या काठावरच्या दिव्यांच्या उभारणीमागे जो थोडा इतिहास होता तोही मिससे फिस्क यांनी डॉ. गॉर्डनना समजावून सांगितला. या विभागातील सुलतानाने, मागे एकदा हॉलंडला भेट दिली होती. तेथे ज्या दिव्यानी केलेली रोषणाई होती ती पाहून त्या रोषणाईच्या प्रेमात प्रथम दर्शनीच तो सुलतान पडला होता. या सुलतानामुळे ते दिवे त्या ठिकाणी आलेले होते. आधुनिकतेचा स्पर्श झालेला असा त्या आसमंतात तेवढाच एक भाग होता. दुसऱ्या दिवशी डॉ. गॉर्डन यांना जाग आली. तेव्हा त्याना स्वत:लाच मिसेस फिस्क यांचे विधान वास्तव आहे हे लक्षात आले. 'सुलतानाच्या बाजुच्या नदीकाठी अगदी छोटी अशी स्थानिक लोकांची

घरे दाटीवाटीने वसलेली होती. या घरांच्या मधूनच एखाद्या मशिदीचा मनोरा व घुमट दृष्टीस पडे. सुलतानाच्या दोन मजली राजवाडा अर्थातच त्या ठिकाणी होता. हा राजवाडा, समुद्र– किनाऱ्यालगतच बांधलेला. जुन्या पद्धतीच्या बंगल्यासारखा. सर्व बाजूनी अगदी आरामशीर बसता येईल असे व्हरांडे होते. 'आमच्या बाजुलाही एक दुमजली इमारत होती. त्यात एक चिनी माणसाने चालविलेले वसतिगृह होते आणि धान्य, किराणा आणि तशाच प्रकारच्या वस्तू मिळतील असे एक दुकान होते. लाँच ज्या ठिकाणी धक्याला लागली, त्या ठिकाणी महाप्रचंड असे वडाचे झाड होते. या झाडाच्या पारंब्या सखोलपणे जमिनीत रूजून त्यांनी त्या प्रचंड वृक्षाला भक्कम आधार दिला होता. या वटवृक्षाच्या छायेखाली एक काळपट, असे पिंगट गुदाम सुखाने निद्रिस्त झाले होते. या नदीच्या काठी ठिकठिकाणी सिंहाच्या अगदी ओबड– धोबड प्रतिकृती ठेवून, हा काठ सुशोभित करण्यात आला होता. राणी विलहेल्मिना (WILHELMINA) यांच्या बहुमानार्थ डच, चिनी आणि मलाय प्रजाजनानी त्यांची उभारणी केलेली होती.'

असे होते हे डॉ. गॉर्डन यांना आढळलेले हे बुलुनगन. संस्कृतीच्या अगदी प्राथमिक अवस्थेत असलेली ही वसाहत. अनेक वंशाचे, भाषांचे, वर्णाचे लोक तेथे रहात होतो. परंतु त्याजबरोबर ही वसाहत बोर्निओन जंगलाने पार गिळून टाकल्यागत होती. अशी एखादी वसाहत अस्तित्वात आहे असे बाहेरच्या जगाला समजलेही नसते. थोडक्यात ही वसाहत कॉनरॅड यांच्या कादंबऱ्यातल्या वर्णनानुसार डॉ. गॉर्डन याना प्रत्यक्ष पहावयास मिळाली होती. आता अलमायेर आणि त्यांच्या नातेवाईकाचे काय झाले हा प्रमुख प्रश्न होता. यासंबंधी त्यानी मिसेस फ्रिस्क याना अनेक प्रश्न विचारले, त्यांची उत्तरेही त्यानी दिली. मिससे फ्रिस्क यांनी असे सांगितले की त्या अनेक वर्षे त्या खेड्यात राहात आहेत. पण त्यानी अलमायेर अगर त्यांचे सासरे टॉम लिनगार्ड यांच्याबद्दल काही ऐकले असल्याचे स्मरत नाही. तथापि या ठिकाणी असलेली जी डच फलटण आहे तिचे अधिकारी लेफ्टनंट बोएल हुवेर (BOEL HOUWER) हे कदाचित याबाबत मदत करतील. हे समजल्यानंतर डॉ. गॉर्डन हे त्या लेफ्टनंटच्या कचेरीत हजर झाले. परंतु बोएल हुवेर यांनाही अलमायेर हे नाव ओळखीचे वाटले नाही. खरे म्हणजे याच ठिकाणी अलमायेर ही व्यक्ती कोण आहे. याबाबतच्या संशोधनाची इतिश्री झाली होती. हे संशाधन पुन्हा काही उभारी घेणार नव्हते. आपल्या या सर्व खटाटोपातून काहीच निष्पन्न झाले नाही याच निर्णयास येणे डॉ. गॉर्डन यांना भाग पडले असते. परंतु डॉ. गॉर्डन यांच्या सुदैवाने त्या डच फलटणीच्या कचेरीत काम करणारा पानगेमानान (PANGEMANAN) नावाचा कारकून त्यांच्या मदतीला आला. त्याने असे सांगितले की, टॉम लिनगार्ड यांच्या पुतण्याला ते स्वत: ओळखत होते. या पुतण्याला सर्वजण तुआन (TUAN) लॉर्ड जिम या नावाने ओळखत असत. काका व पुतण्या हे नेहमीच भागीत काम करीत. पण एक दिवस त्यांचे भांडण झाले व ही भागीदारी संपुष्टात

आली. या भांडणानंतर कॅप्टन टॉम लिनगार्ड हे इंग्लंडला मायदेशी परतले. पण तुआन जिम हा बोर्निओतच राहिला. एका प्रमुख चिनी व्यापाऱ्याला त्यांनी जे पैसे दिले होते. त्यातून त्याना जे पैसे व्याजापोटी मिळत त्यात त्यांचा योगक्षेम चांगल्या प्रकारे होत असे. तुआन जिम इ. स. १९२९ साली मरण पावला, त्याला मलाय जमातीतील एका स्थानिक स्त्रीपासून झालेली अनेक मुले त्याच्यामागे राहिली होती. (जोसेफ कॉनरॅड यांच्या अलमायेर्स फॉली या कादंबरीतील असेच घडते. कादंबरीत टॉम लिनगार्ड हे आपली मक्तेदारी संपुष्टात आल्यानंतर युरोपला परत जातात) पानगेमानान यांना तुआन जिम संबंधात अनेक आठवणी होत्या. डॉ. गॉर्डन यांना त्या आठवणीच्या आधारे कॉनरॅड यांच्या दुसऱ्या एका LORD JIM या कादंबरीतल्या हिरोची अनेक स्वभाव वैशिष्टांचा पडताळा आला.

याहीपेक्षा अधिक आश्चर्यचकित करील अशी माहिती डॉ. गॉर्डन याना त्या ठिकाणी प्राप्त झाली. पानगेमानान याना कॉनरॅड यांच्या कादंबरीतील नायक अलमायेर ही कोण व्यक्ती होती हे माहीत होते. कॉनरॅड ज्या माणसाला भेटले होते. त्याचे नाव होते ओलमइयेर (OLEMEIJER). कॉनरॅड यांनी या डच नावाला इंग्लिश रूप दिले होते. पानमेमानान यांना अलमायेर ही व्यक्ती अशा प्रकारे शब्दांकित झालेली होती याची काहीच कल्पना नव्हती. पण ओलमइयेर या कुटुंबाशी पानमेमानान यांचा चांगला परिचय होता. त्यानी डॉ. गॉर्डन याना असे सांगितले की, ओलमइयेर याना अनेक मुले होती. कॅप्टन क्रेग यांनी जाँ. ओब्रे याना अलमायेर याना एकच मुलगी होती. ही दिलेली माहिती अर्थातच चुकीची होती. ओलामइयेर यांच्या एका मुलीने सामारींडा (SAMARINDA) या ठिकाणच्या अँड्यू ग्रे यांच्याशी विवाह केला होता. हे ठिकाण पूर्व बोर्निओच्या किनाऱ्याला पार खालच्या बाजुला आहे. ती कन्या त्या ठिकाणी वास्तव्य करून आहे असेही त्यांनी सांगितले.

सांबिर या गावाचा जो शोध घेण्यात येत होता त्यातून काहीतरी फलप्राप्ती होईल अशी चिन्हे दिसू लागली; तेवढ्यात तोवर त्यानी केलेल्या या लांबच्या प्रवासात सर्वात धक्कादायक ठरेल व आश्चर्यचकित करील अशी माहिती डॉ. गॉर्डन यांना मिळाली. बुलुनगन हे मुळी सांबिर नव्हेतच ! पानगेमानन यांचा लिनगार्ड आणि ओलमइयेर यांच्याशी जेव्हा परिचय झाला. तेव्हा ते दोघे बुलुनगन या गावी रहात नव्हते. या बुलुनगन नदीच्या काठी वसाहती सारखेच बरूव (BEROUW) नदीच्या काठी वसलेल्या ते दुसऱ्या एका वसाहतीत रहात होते; त्याचवेळी त्यांचा व पानगेमानन यांचा परिचय झालेला होता. खरे म्हणजे आदल्याच दिवशी या प्रदेशावरून डॉ. गॉर्डन यांनी विमानातून प्रवास केला होता. पण त्यावेळी त्याना त्या प्रदेशाकडे स्वाभाविकपणे दुर्लक्ष केले होते. जाँ ओब्रे यांना जी कॅप्टन क्रेग यांनी मुलाखत दिली, त्यावेळी कॅप्टन क्रेगना त्यांच्या स्मरणशक्तीने चांगलेच चकविले होते. त्या मुलाखतीतील माहिती आधारभूत धरून डॉ. गॉर्डन हे भलत्याच ठिकाणी सांबिरचा धांडोळा घेत होते. परंतु संशोधन कार्यात आजवर अनेक वेळा जे घडले आहे, तसेच या

वेळेसही घडले. संशोधक आपल्या हातातील संशोधनात अजिबात प्रगती होत नाही म्हणून हतबल झालेला असतो; त्यावेळच्या त्याच्या मन:स्थितीची कल्पनाच न केलेली बरी. अशा वेळी त्याने जी चूक काही कारणाने केलेली असते तीच अनेक वेळा फलदाई ठरते. संशोधनाच्या कार्याला या चुकीमुळेच काही वेळा जोराची चालना मिळते. उदा. पानगेमानान यांनी बुलुनगन हे स्थळ सांबिर नाही असे सांगून, त्यांनी डॉ. गॉर्डन त्यांना त्यांच्या संशोधन कार्यासाठी अनेक दुवे प्राप्त करून दिले होते. ही प्राप्ती त्यांना एरवी कधीही प्राप्त झाली नसती.

बरूव हे आता खरे सांबिर ठरले होते. ही वसाहत बोर्निओच्या घनदाट जंगलात होती. डॉ. गॉर्डन याना त्या ठिकाणी जाता येईल अशी परिस्थिती नव्हती. परंतु ओलमइयेर यांची कन्या सामरिन्डा येथे राहत आहे हे कळल्यानंतर त्यांच्या मनातील आशा पुन्हा एकदा पल्लवीत झाल्या. ताराकान येथून मोटरलाँचने, त्यांनी सोएरबाजाला मालवाहतूक करणाऱ्या एका आगबोटीच्या व्यवस्थापकाशी बोलून परतण्यासाठी व्यवस्था केली. डॉ. गॉर्डन यांच्या सुदैवाने ही आगबोट सामरिन्डा या ठिकाणी थांबणार आहे हे अगोदरच जाहीर झाले होते. ते वेगाने वहाणाऱ्या बुलुनगन नदीवरून ताबडतोड आपल्या मुक्कामाच्या ठिकाणी आले. ताराकान येथील तेलखाणीत काम करणाऱ्या अधिकाऱ्यांसाठी बांधलेल्या वसतिगृहातील पाहुण्यासाठी राखून ठेवलेल्या आलिशान व स्वागतशील ठिकाणी येऊन ते विसावले.

या मालवाहतूक करणाऱ्या आगबोटीचे नाव होते फॉन स्वोल्ल (VAN SWOLL) या अशाच प्रकारच्या मालवाहतूक करणाऱ्या बोटीवर जोसेफ कॉनरॅड एक अधिकारी होतो. शिवाय ते याच जलमार्गावरून मालवाहतूक करीत. ही आगबोट आपल्या संथ चालीने बोर्निओच्या पूर्व किनाऱ्यावरून मार्गस्थ झाली. एका पौर्णिमेच्या दिवशी या आगबोटीने कोटई (KOTEI) नदीत प्रवेश केला आणि मजलदरमजल करीत ती सामरीन्दा या बंदरात येऊन दाखल झाली. या आगबोटीचा कप्तान, डॉ. गॉर्डन यांना मि. आणि मिसेस ग्रे यांच्या भेटीसाठी घेऊल गेला. मि. ग्रे. हे ओलमइयेर यांचे जावई, डॉ. गॉर्डन याना त्या क्षणी असे वाटले की कॉनरॅड हे ज्या माणसाला ओळखीत होते त्याच्याशी घनिष्ट परिचय असलेल्या व्यक्तीला आपण भेटत आहोत. पण हाय रे दैवा, त्यांना नैराश्याचा आणखीन एक धक्का मिळाला, ग्रे कुटुंबांची लाकडे घालण्याची गिरणी होती. लेमोनेड आणि बर्फ तयार करण्याचा कारखाना होता. डॉ. गॉर्डन यांना असे सांगण्यात आले की, ग्रे पती– पत्नी आता येथे राहत नाहीत. त्यांनी जावातील मलांग येथे स्थलांतर केले आहे. त्यांचे चिरंजीव या सर्व कारखान्यांची देखभाल करतात. ते आपल्या माता– पित्यास भेटण्यासाठी गेले आहेत. त्यांच्या परतीच्या प्रवासात, ते ज्या बोटीने प्रवास करीत आहेत, ती आगबोट पाहूड (PAHUD) ही बालिकपापान (BALIKPAPAN) या बंदरात उद्या मुक्काम करणार आहे. सुदैवाने डॉ. गॉर्डन ज्या आगबोटीने प्रवास करीत होते, ती त्याच बंदरात नांगर टाकणार होती.

दुसऱ्या दिवशी फॉन स्वोल्ल या आगबोटीतून डॉ. गॉर्डन हे बालिकपापान या ठिकाणी पोहोचले. पाहूड ही आगबोट बंदरात नांगर टाकून उभी होती. तिला आल्यासही तीन– चार तास होऊन गेले होते. मि. ग्रे हे तरूण गृहस्थ आपल्या मित्रांना भेटण्यास गावात गेलेले होते. पाहूड आगबोटीवरच्या अधिकाऱ्याना या मित्राचे नाव वा पत्ता यापैकी काहीही ठाऊक नव्हते. डॉ. गॉर्डन हे ऐकून नाऊमेद झाले नाहीत. ते त्या गावातल्या क्लबमध्ये गेले. गावातल्या डाक बंगल्यात जाऊन त्यानी कानोसा घेतला. पण त्यांना तरूण मि. ग्रेना भेटण्यात यश आले नाही. एक अगदी अखेरचा प्रयत्न म्हणून गावातल्या रस्त्यावर तरी हा तरूण आढळतो का हे पहाण्याकरता ते गावातल्या रस्त्यावरून पायपिट करू लागले. गंमत अशी होती की, तरूण मि. ग्रे त्यांच्यासमोरून आले असते, तरी त्यांना डॉ. गॉर्डन यांना ओळखता आले नसते. इकडे फॉन स्वोल्ल निघण्याच्या तयारीत होती. शेवटचा प्रयत्न डॉ. गॉर्डन यांनी केला. ते धावत धावत पाहूड आगबोटीवर गेले आणि तरूण मि. ग्रे तेथे होते. या भेटीची नोंद डॉ. गॉर्डन यांनी पुढील शब्दात केलेली आहे.

*'ओलमइयेर यांचा नातू, ठेंगणा, जाडजूड, कातडी सूर्यप्रकाशात वारंवार राहिल्याने चांगलीच तांबूस झालेली आणि मुखावर अगदी प्रसन्न व खुषविणारे हास्य असलेला. तो म्हणाला होय, माझ्या आजोबाबद्दल गोष्ट लिहिलेल्या कॉनरॅडबद्दल मी ऐकलेले आहे. तुम्ही ते पुस्तक लिहिले आहात का? (नाही ना) असे असेल तर फारच चांगले. याचे कारण ती कथा चांगली नाही आहे. त्या कथेत सत्यकथन करण्यात आलेले नाही. त्यानी ते पुस्तक मिळविण्याचा प्रयत्न करून पाहिला होता.... त्या पुस्तकाचे नाव कॉनरॅडस फॉली असे होते का? ते पुस्तक मिळविण्यासाठी त्यांनी सिंगापूरलाही प्रयत्न केला. आपल्या आईच्या कुटुंबियांच्याबद्दल मला खरोखरीच थोडी माहिती आहे, हे त्यांनी कबूल केले. परंतु माझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे मालांग येथे मी त्याच्या माता– पित्याना भेटलो तर निश्चितपणे मिळतील. कॉनरॅड या लेखकाने ज्या खोट्या गोष्टी पसरवल्या आहेत; त्यांच्याबद्दल स्पष्टीकरण देण्याची त्या दोघांचीही इच्छा आहे. मी त्यांना भेटावयास येत आहे, अशी तार ते पाठवतील असे मि. ग्रे यांनी सांगितले. आम्ही हात मिळवले– मी ओलमेईयरच्या नातवा– बरोबर हस्तमिलाफ केला.... मी ताबडतोब फॉन स्वोल्लकडे धाव घेतली, याचे कारण ती अगदी अधीर होऊन वारंवार भोंगे देत होती.'*

सोएरबाजा ते ताराकान असा प्रवास करणे व तेथून परत मुक्कामास येणे, हा प्रवास सुमारे तीन हजार किलोमीटरचा आहे. या एवढ्या परकीय माणसाला तशा बिकट असलेल्या प्रवासाची फलश्रुती काय? एक) कॉनरॅड यांनी कादंबरीत वर्णन केलेलल्या स्थानिक वातावरणाचे रंगरूप, याच्याशी डॉ. गॉर्डन यांचा प्रत्यक्ष परिचय झाला, दोन) ओलमइयेर यांची कन्या, मालांग येथे रहात असून हे गाव सोएरबाजापासून पंचाहत्तर किलोमीटर आहे हे त्याना समजले. थोडक्यात डॉ. गॉर्डन यांच्यापाशी या सफरीस सुरुवात करण्याअगोदर



अनुक्रमणिका

त्यांच्यापाशी जो दुवा होता, तो अधिक निश्चित स्वरूपाचा असता, तर त्यांची ही येथवरची यातायात वाचली असती. डच– बोर्निओ विभागातून प्रवास करण्याचे त्याना मग कारणच नव्हते. डॉ. गॉर्डन यांना हे सारे कष्ट वाचविता आले असते. परंतु आतातरी– सरतेशेवटी– डॉ. गॉर्डन हे ज्यात काही विकल्प निर्माण होणार नाही अशा अचूक मार्गावरच मार्गस्थ होणार होते. आगगाडीतून एक तास प्रवास केल्यानंतर डॉ. गॉर्डन हे मालांग येथे पोहोचले. जावातील ते एक देखणे व प्रसन्न असे छोटेखानी शहर. मिसेस ग्रे आणि मि. ग्रे हे डॉ. गॉर्डन येणार आहेत हे ठाऊक असल्याकारणाने त्यांच्या येण्याची वाट पहात होते. मि. ग्रे ऐंशी वर्षांचा दिलखुलास आसामी. प्रथम त्यानी आपली जीवन– कहाणी डॉ. गॉर्डन यांना पेश केली. मि. ग्रे हे जावात इ. स. १८७९ साली आले. त्यानी अनेक प्रकारच्या वस्तूंचा व्यापार केला. या व्यापारात त्यानी भरपूर द्रव्य मिळविले. त्यांनी ओलमेइएर यांच्या कन्येशी विवाह केला. त्यांची व कॅप्टन यांची ओळख होती. असे होते तरीही ते कॉनरॅड यांना आमने– सामने कधीही भेटले नव्हते.

यानंतर अर्थातच मिसेस ग्रे यांनी आपली कहाणी सांगितली. त्यांचे माहेरचे नाव जोहान्ना एलिझाबेथ. त्यांच्या आईची एकंदर अकरा मुले. त्यात त्या तिसऱ्या क्रमांकाच्या त्यांच्या वडिलांचे नाव होते विल्यम चार्लस. (कादंबरीत हे नाव 'कास्पर' झाले आहे) 'आमच्या कुटुंबात एक 'कास्पर' नक्कीच होऊन गेला होता. कदाचित् कॉनरॅड यांनी त्याचा वापर केला असावा.' कॉनरॅड यांच्या कादंबरीतल्या त्या व्यक्तीचित्रणानुसार त्यांनी आपले जन्मगाव बरोव (कादंबरीतले नाव सांबिर) हे जोडले असावे. ते गुट्टा (GUTTA), राहान (RATTAN) आणि रबर या वस्तूंचा व्यापार करीत. समाजात त्याना सर्वत्रच मान होता. त्यानी सांगितलेल्या काही गोष्टी अशा होत्या की, त्यावरून कॉनरॅड यांच्या कादंबऱ्यातील अनेक ठिकाणच्या वर्णनांचे सूचन त्याकरवी होत होते. उदा. *एक* डच इंडोनेशियातील स्थानिक डियाकस (DYAKS) या लोकांशी त्यांचे असलेले मैत्रीचे संबंध. *दोन* टॉम लिनगार्ड यांची मदत घेऊन ते आपला माल बाहेरच्या जगात निर्यात करीत होते. या कारणामुळे डच राज्यकर्त्यांच्या मनात रोष व संशय निर्माण होण्यास मदत झाली असावी. कॉनरॅड यांच्या कादंबरीत असे अनेक परिच्छेद होते की, ते ओलमईयेर यांचे आयुष्य नजरेसमोर ठेवून सरळसरळ शब्दांकित झालेले होते. परंतु मि. आणि मिसेस ग्रे यांनी आपल्या कुटुंबाची जसजशी अधिक माहिती सांगितली. तेव्हा कॉनरॅड यांनी ओलमईयेर ही व्यक्ती आपल्या कादंबरीत एक आदर्श प्रतिकृती या स्वरूपात मुळी वापरलीच नव्हती ही गोष्ट डॉ. गॉर्डन यांना स्पष्ट झाली. त्या व्यक्तीची जी काही निश्चित अशी ठळक स्वरूपाची वैशिष्टे होती, त्यांचाच वापर कॉनरॅड यांनी केला होता. उदा. ओलमईयेर यांची खिन्नतेकडे झुकणारी प्रवृत्ती, दाखवेगिरीची आवड, आपण नेहमीच नैराश्यांच्या खाईत, असह्यपणे असणार ही त्यांच्या मनात सातत्याने असलेली भावना, इत्यादी. त्या व्यक्तीची जी दुसरी काही वैशिष्टे होती, ती

कॉनरॅड जी काही गोष्ट सांगणार होते, त्यानुसार त्यांनी बदलली होती. कॉनरॅड जेव्हा आपण बोर्निओतील एका व्यापाऱ्याची प्रतिकृती कादंबरी लिहिताना नजरेसमोर ठेवली होती असे सांगतात ते या अर्थाने. ओलमईयेर यांचे वास्तव जीवन आपल्या कादंबरीत रेखाटण्याचा कॉनरॅड प्रयत्नच करीत नव्हते. डॉ. गॉर्डन यांनी या संदर्भात भाष्य करताना म्हटले आहे. "विल्यम चार्लस ओलमेईयेर यांची 'जीवन गाथा' 'अलमायरेस फॉली' या कादंबरीत निश्चितच नाही. परंतु त्या माणसाच्या व्यक्तीत्वाने कादंबरीकाराच्या मनावर जी छाप उमटविली होती, त्याचा विस्तार या कादंवरीत करण्यात आलेला आहे."

डॉ. गॉर्डन सोएरबाला परतले. ओलमईयेर यांच्या थडग्यास भेट देणे ही एकच गोष्ट करावयाची शिल्लक होती. कादंबरीत असे सांगितलेले आहे की, अफूचे सेवन या व्यसनामुळे अलमायेर यांना मृत्यू आला. कॅप्टन क्रेग यांनी असे सांगितले होते की, अजगराच्या शिकारीत ते जखमी झाली व त्यातून जो आजार उद्भवला त्यात ते मरण पावले. मिसेस ग्रे यांनी सांगितलेली माहिती आणखीनच वेगळी होती. ओलमइयेर यांच्यावर कॅन्सरसाठी शस्त्रक्रिया झाली, व त्यानंतर ते मृत्यू पावले. सोएरबाजा शहराजवळ पेनलेह (PENLEH) या नावाची दफनभूमी आहे. गवताची काडीही न उगवणारी, एकही झाड नसलेली, कोणाचीही ज्या ठिकाणी वसती नाही अशी ती बखळ होती. फक्त चुना फासलेल्या कमानी असलेले बोगदे, आणि थडगी· एवढ्याच गोष्टी तेथे होत्या. डॉ. गॉर्डन यांनी बी ८२१ क्रमांकाचे थडगे शोधून काढले. ते लिहितात 'एक अगदी कमी उंचीचा कमान असलेला बोगदा, चुना फासलेले विटांचे एक चांगले भक्कम टेबल आहे असे आत प्रवेश केल्यानंतर भासणाऱ्या बोगद्याच्या मध्यभागी कमानीसारखे छप्पर होते. त्याच्या अगदी वरच्या बाजुला संगमरवरी दगडाची पाटी होती. ती पानवृक्षाच्या रूपेरी पानानी जवळजवळ आच्छादलेली होती.' या पाटीवर या ठिकाणी कॅरेल ओलमईयेर यांचे दफन करण्यात आलेले आहे. यांचा जन्म सोएराबाजाच्या वायव्य दिशेला असलेल्या ग्रिस्से (GRISSE) याठिकाणी इ. स. १७९९ साली झाला. मृत्यू इ. स. १८७७. 'यांच्या मृत्युने त्यांची सर्व मुले फारच व्यथित झाली.' एवढेच शब्द खोदलेले होते. त्या दफनभूमीच्या कचेरीत जे दप्तर होते. त्यानुसार विल्यम चार्लस आणि त्यांची पाची मुले या सर्वांचे दफन त्याच ठिकाणी झाले होते. तरूण ओलमईयेरने जोसेफ कॉनरॅड या महान इंग्रजी कादंबरीकारावर जो प्रभाव पाडला होता त्याविषयी एकही शब्द कोठेही नोंदविलेला नव्हता. ओलमईयेर कुटुंबिय सोडून त्या क्षणीतरी डॉ. गॉर्डन ही जगातील अशी एकमेव व्यक्ती होती की, पेनलेह दफनभूमीतले ते थडगे अशा माणसाचे होते की ज्याने कॉनरॅड यांना कादंबरीकार होण्यासाठी स्फूर्ती दिली: ही गोष्ट निश्चितपणे माहीत होती. ते काहीही असो. अनंत अडचणी, आशा– निराशा, अपेक्षा भंग व अपेक्षा पूर्ती अशा घटनानी खच्चून भरलेली या जगाला अर्धी प्रदक्षिणा घालणारी ही गॉर्डन यांची सफर सरतेशेवटी त्या सर्व कष्टांचे, व मानसिक त्रासाचे ज्यायोगे चीज होईल अशी फलदाई ठरली होती.

---

# हेमिंग्वेचे अखेरचे शब्द

## जे त्यानं लिहिले होते, आणि जे त्यानं लिहिले नव्हते

– अ. ना. महाशब्दे

In the late summer of that year we lived in a house in a village that looked across the river and the plain to the mountains. In the bed of the river there were pebbles and boulders, dry and white in the sun, and the water was clear and swiftly moving and blue in the channels. Troops went by the house and down the road and the dust they raised powdered the leaves of the trees. The trunks of the trees too were dusty and the leaves fell early that year and we saw the troops marching along the road and the dust rising and leaves, stirred by the breeze, falling and the soldiers marching and afterward the road bare and white except for the leaves.

अर्नेस्ट हेमिंग्वेच्या 'अ फेअरवेल टु आर्म्स' (१९२९) या कादंबरीचा हा पहिलाच परिच्छेद. यात चार वाक्य आहेत. साधी पण चकवा देणारी. शब्दसंख्या आहे एकशेसव्वीस. फक्त एका शब्दाला तीन Syllables आहेत. बावीस शब्दांना दोन आणि उरलेल्या एकशेतीन शब्दांना केवळ एक. या वाक्यात 'द' चौवीस आहेत आणि 'अँड' पंधरा. दुसऱ्या आणि चौथ्या वाक्यांमध्ये मिळून चार स्वल्पविराम आहेत. पहिल्या आणि तिसऱ्यामध्ये ते नाहीत. ज्या ठिकाणी स्वल्पविराम टाकण्यात आले आहेत त्यामुळं व 'द' आणि 'अँड' यांच्या पुनरावृत्तीमुळं परिच्छेदाला थोड्याफार प्रमाणात litergical cadence प्राप्त झाला आहे, लोभस लयबद्धता लाभली आहे. परिणामी, चौथ्या वाक्यामधील 'लिव्ह्ज' शब्दाआधीच 'द'चं लोपन (and we saw the troops marching along the road and the dust rising and leaves, stirred by the breeze, falling) अपेक्षित असं सावट नेमकेपणानं पसरवतं. गारठून टाकणारं. अशुभाची पूर्वसूचना देणारं. पुढील घटनांची दुश्चिन्ह सूचित करणारं. लेखकानं एव्हाना सरत्या उन्हाळ्याकडून त्याहून अधिक काळोख्या असलेल्या ऋतुकडे आपली नजर वळवल्याची जाणीव होते. परिच्छेद एक आभास निर्माण करतो, ठोस तपशील टाळतो. या जाणीवपूर्वक लोपनामुळे, अध्याहृत ठेवलेल्या तपशीलामुळे निर्माण झालेल्या

ताणामध्ये परिच्छेदाचं कलात्मक सामर्थ्य आहे *कोणत्या वर्षीच्या* सरत्या उन्हाळ्यात? *कोणती* नदी, *कोणते* पर्वत, *कुठल्या* फौजा?

हेमिंग्वे हा असा लेखक होता ज्यानं त्याच्या काळात इंग्रजी भाषेला एक नवं रूप दिलं होतं, त्या भाषेची लय पालटून टाकली होती. त्याच्या लेखनशैलीचा प्रभाव तत्कालीन पिढीवर पडलाच पण पुढील पिढीवरही तो पडला. त्याची वाक्यरचनाच अशी होती की ती जगाकडे पाहाण्याची एक विवक्षित दिशा दर्शविते; पाहाण्याची दिशा, सहभागी होण्याची नव्हे; तुम्ही साक्षी असता, पण तटस्थ. त्या काळाला अनुरूप अशी रोमँटिक वैयक्तितता. वर उद्धृत केलेली वाक्यं वाचत असताना रस्त्यावरून शिस्तीनं कवाईत करत जाणारी लष्करी तुकडी आपल्या नजरेसमोर येते पण त्यांच्या बरोबर आपण पावलं उचलत जाऊ हे संभवत नाही. आपण वृत्तांत सांगू पण त्यात गुंतून न जाता. 'अ फेअरवेल टु आर्म्स' मधील फ्रेड्रिक हेन्रीच्या सुरात सूर मिसळून आपणही म्हणू. In the fall the war was always there, but we did not go to it any more.

हेमिंग्वेच्या या पदबंधाचा परिणाम एवढा व्यापक होता की, त्याच्या चहात्यांवरच नव्हे तर जगाकडे पाहाण्याचा ज्यांचा दृष्टिकोन त्याच्याहून भिन्न होता, रोमँटिक वैयक्तितता हा ज्यांचा पिंड नव्हता अशा लेखकांवरही तिचा असर पडला होता. उदाहरण द्यायचं झालं तर जॉर्ज ऑरवेलचं 'होमेजे टु कॅटॅलोनिआ' (१९३८) मधील हे वाक्य : The hills opposite us were grey and wrinkled like the skins of elephants आणि हेमिंग्वेचं 'हिल्स लाइक व्हाइट एलिफंट्स' (१९२७) – मधील हे वाक्य : The hills across the valley of the Ebro were long and white' १९४६ मध्ये ऑरवेलनं 'पॉलिटिक्स अँड द इंग्लिश लँग्वेज'मध्ये लिहिलं होतं : A mass of Latin words fall upon the facts like soft snow, blurring the outlines and covering up all the details. १९२९ मध्ये हेमिंग्वेनं' अफेअरवेल टु आर्म्स' मध्ये लिहिलं होतं : I was always embarrassed by the words sacred, glorious, and sacrifice and expression in vain. There were many words that you could not stand to hear and finally only the names of places had dignity.

हेमिंग्वे हा असा माणूस होता ज्याच्या लेखी शब्दांना मोल होतं. त्यावर तो मेहनत घेत होता, त्यांना जाणत होता, त्यांच्या अंतरंगात त्यानं प्रवेश केला होता. तो चौवीस वर्षांचा होता. 'ट्रान्स्लांटिक रिव्ह्यू'साठी फोर्ड मॅडोक्स फोर्ड लिहित असलेले वृत्तांत वाचत होता. त्या काळात केवळ सरावासाठी म्हणून काही वेळेला त्या वृत्तांताचं स्वत:च्या शब्दात तो पुनर्लेखन करत असे. यातून प्रकाशन योग्य शब्दांमधूनच केवळ आपण मागे उरावं ही त्याची मनिषा असल्याचं स्पष्ट जाणवतं. १९५० मध्ये त्यानं आर्थर मिझनेरला लिहिलं होतं: 'मला आठवतं, फोर्ड मला सांगायचा, भावी पिढीकडून तुमचं पत्र कसं वाचलं जाईल याचं भान

ठेवूनच तुम्ही नेहमी पत्र लिहायला हवं. याचं माझ्यावर एवढं वाईट 'इम्प्रेशन' पडलं की फ्लॅटमधील एकूण एक पत्रं मी जाळून टाकली. यात फोर्डचीही होती.' २० मे १९५८ रोजी त्यानं त्याच्या 'एक्झेक्यूटरां'ना एक पत्र लिहिलं होतं. La Finca Vigia येथील त्याच्या लायब्ररीत ते ठेवून देण्यात आलं होतं. त्यानं लिहिलं होतं : 'माझी अशी इच्छा आहे की माझ्या आयुष्यभरात मी लिहिलेल्या पत्रांपैकी एकही प्रसिद्ध केलं जाऊ नये. यास्तव, या पत्राद्वारे, मी तुम्हाला विनंती करतो आणि सूचना देतो की यापैकी एकही पत्र प्रसिद्ध करू नये, इतरांना ती प्रकाशित करण्यास अनुमती देऊ नये.'

हेमिंग्वेच्या या हरकतीनं त्याची विधवा पत्नी व एक्झेक्युटर मेरी वेल्श हेमिंग्वे हिची पुरती पंचाईत करून टाकली होती. त्याचा 'मला सतत त्रास व्हायचा आणि इतरांचा अपेक्षाभंग' सरतेशेवटी तिनं निर्णय घेतला : हेमिंग्वेनं लादलेलं हे बंधन तोडायचं. १९७६ मध्ये तिनं 'हाऊ इट वॉज' या आपल्या स्मरण गाथेत त्याच्या काही पत्रांतील काही उतारे उद्धृत केले. शिवाय कार्लोस बेकरला सुमारे सहाशे पत्रं प्रकाशित करण्याची संमती दिली. हा पत्रसंग्रह 'अर्नेस्ट हेमिंग्वे : सिलेक्टेड लेटर्स (१९१७-१९६१)' या नावानं वाचकांसमोर आला. बेकर लिहितो की मेरीनं घेतलेला हा निर्णय सूज्ञपणाचा होता, रास्त होता, कारण ती पत्रं' सर्वसामान्य वाचकांना बोधप्रद व रंजक ठरतील. एवढंच नव्हे तर त्यायोगे विसाव्या शतकातील अमेरिकन 'फिक्शन'मधील एका श्रेष्ठीनं जीवन व कर्तृत्व यांचा सातत्यानं मागोवा घेण्यास आवश्यक असा उपयुक्त दस्तऐवज अभ्यासू विद्यार्थ्यांना उपलब्ध होईल.'

लेखक असण्यातील वैशिष्ट्य म्हणजे छापले गेलेले स्वत:चे इतरांकडून पाहिले गेल्यानं नशिबी येणारा जीवघेणा ओशाळेपणा छापील शब्दांमधून लेखकाचं व्यक्तिमत्व आविष्कृत होतं हा समज अपसमज आहे याबद्दल हेमिंग्वे नि:शंक होता. शब्द हे साहित्याच्या अभ्यासू विद्यार्थ्यांसमोर 'सततच्या शोधासाठी' असावेत हेच मुळी त्याला नामंजूर होतं. थेलमधील चार्ल्स ए. फेन्टन यास १९५२ मध्ये त्यानं दिलेला इशारा या संदर्भात बोलका आहे. 'द अॅप्रेंटिसशिप ऑफ अर्नेस्ट हेमिंग्वे : द अर्ली इअर्स' या ग्रंथावर चार्ल्स काम करत होता. हाती येत असलेल्या पत्रांच्या पुराव्याच्या आधारे त्यात वारंवार फेरफार करत होता. असे बदल केलेले खर्डे हेमिंग्वेकडे पाठवत होता. त्याच्या उपद्व्यापानं हेमिंग्वेला त्रस्त केलं होतं. शेवटी त्यानं त्राग्यानं लिहिलं : 'असं एकसारखं एखाद्यानं मागं मागं लागणं, तपास करणं, शंकाकुशंका विचारणं आवडत नाही कुणालाही, तो नवश्यागवश्या डिटेक्टिव भले कितीही विद्वान असो वा सत्यान्वेषी. तुझ्या हे लक्षात यायला हवं होतं फेन्टन.' एका महिन्यानंतर त्यानं पुन्हा कळवलं :' संपूर्ण संकल्प तू बाजूला सारावास असं मला वाटतं. 'पुढं पुस्ती जोडली :' संबंधित व्यक्तीच्या सहकार्याविना कुठल्याही सत्याप्रत पोचणं अशक्यप्राय असतं. अशा प्रकारचं सहकार्य म्हणजे जवळजवळ एखाद्यानं आत्मचरित्र लिहिण्याचा प्रयत्न करण्याजोगंच.'

पुढं काही महिन्यांनी त्यानं लिहिलं : 'तुझ्या हस्तलिखिताच्या पहिल्या पानामध्ये वा पानांमध्ये घटितांच्या एवढ्या चुका मला आढळल्या की तुला असलीयत सांगण्यासाठी व पुनर्लेखन करण्यासाठी हा उर्वरित हिवाळा मला खर्ची घालावा लागेल आणि मला स्वत:ला जे लिहायचं आहे त्यातील काहीही माझ्या हातून लिहिलं जाणार नाही..... दुसरी गोष्ट : 'पे व्हाउचर्स' – द्वारे मी लिहिलेले तुकडे तू शोधून काढले आहेस. परंतु तुला ठाऊक नाही आहे की लिहिते समयी कुठल्या तुकड्यामध्ये फेरफार केले आहेत वा कुठल्याचं पुनर्लेखन झालं आहे. एखाद्याचं प्रारंभीचं लिखाण ज़्यात फेरफार करण्यात आले आहेत, वा ज्याचं पुनर्लेखन करण्यात आलं आहे ते त्याच्या नावावर त्याच्या परवानगीशिवाय प्रसिद्ध करणं याहून वाईट गोष्ट मला तरी ठाऊक नाही.

'खरं तर, याहून काही वाईट गोष्टी मला ठाऊक आहेत : अन्य एखादा लेखक त्याच्या सहलेखकाचं वृत्तपत्रीय लिखाण जमवतो आणि ते प्रकाशित करतो, जे लिखाण धिक्कार वाटल्यामुळं ते जतन करण्याचीही त्या लेखकाची इच्छा नसते.'

'मिस्टर फेन्टन, याबाबत माझ्या प्रतिक्रिया तीव्र आहेत. तसं मी यापूर्वी तुला लिहिलेलं आहे आणि पुन्हा आता तुला लिहित आहे. जे लिखाण प्रसिद्ध व्हावं असं मला वाटत नाही ते प्रकाशित करण्याचा तुला अधिकार नाही. एखाद्याला पत्त्याच्या खेळात बनवणं, किंवा एखाद्याचं डेस्क वा त्याची कचरापेटी बारकाईनं चाचपणं किंवा एखाद्याची खाजगी पत्रं वाचणं यासारखी एकही गोष्ट मी करणार नाही' २ जुलै १९६१ रोजी हेमिंग्वेनं आत्महत्या केली तेव्हा त्याच्या काही साहित्यकृती अपूर्णावस्थेत होत्या. तरीही त्याचं पुढं काय होईल हा प्रश्न त्यावेळी उपस्थित झालेला दिसत नाही. यातील काही प्रकाशित झाली. त्यात हेमिंग्वेनं नामकरण केलेलं 'द पॅरिस स्टफ' होतं. याचं हस्तलिखित १९५९ मध्ये त्यानं प्रकाशक स्क्रिबनरला दिलं होतं. परंतु त्यावर पुनर्लेखन करण्यासाठी त्यानं ते पुढं मागवलं होतं. तेच पुस्तक लेखकाच्या परिष्करणाविना 'ए मुव्हेबल फीस्ट' या नावानं प्रकाशित झालं. याशिवाय 'आयलण्ड्स इन द स्ट्रीम', 'द गार्डन ऑफ एडन' यासारख्या कादंबऱ्यानिक ॲडम्सच्या बऱ्याच कथा, 'द डेंजरस समर' हे ललित लेखन बाजारात आलं तेही लेखकाच्या संस्करणाविना. हेमिंग्वेच्या नावाला एवढं मोल होतं की त्याचा लाभ पद्धतशीररित्या व्यापारी वृत्तीनं उठवण्यात साहित्याशी संबंध नसलेल्या धंदेवाईकांनीही पुढाकार घेतला. त्यांचा हा धंदा बराच लाभदायक ठरला. त्याच्या घरातील फर्निचरादी ९६ वस्तू 'अर्नेस्ट हेमिंग्वे कलेक्शन' या नावानं 'थॉमसव्हिले फर्निचर इंडस्ट्रिज'नं प्रदर्शनात मांडल्या. 'फॅशन लायसन्सिंग ऑफ अमेरिका'ची अध्यक्षा मार्ला ए. मेट्झनेरनं 'टाइम्स'ला सांगितलं की आजच्या जमान्यात आपल्यामध्ये फारसे 'हिरो' नाहीत. यास्तव 'हिरॉइक ब्रॅण्ड्स' म्हणून चालू शतकाची स्पृहणीय मानचिन्हं गोळा करण्याकडे आपण वळलो. आणि जॅक, ग्रेगरी व पॅट्रिक या हेमिंग्वेच्या मुलांच्या सहकार्यानं तिनं 'अर्नेस्ट हेमिंग्वे ब्रॅंड' निर्माण केला. मेरी



अनुक्रमणिका

वेल्श हेमिंग्वेच्या ध्यानीमनी नसलेलं हेमिंग्वेचं व्यापारीकरण तिच्या नजरेसमोर केलं जात होतं. ही व्यापारी वृत्ती तिला पसंत नव्हती. म्हणूनच ए. इ. हॉचनेरचं 'पापा हेमिंग्वे'चं प्रकाशन स्थगित करण्याचा प्रयत्न तिनं केला होता. अर्थात् तिचा हा प्रयत्न अयशस्वी ठरला होता. हेमिंग्वेचं अश्या प्रकारे व्यापारीकरण करणं मेरीच्या प्रकृतीला मानवण्याजोगं नव्हतं. कारण हेमिंग्वेलाही हे रुचणारं नव्हतं. पण ज्यावर परिष्करण करावयाचे आहे अशा साहित्यकृती आहे त्या स्वरूपात प्रकाशित करणंही हेमिंग्वेला आवडलं नसतं. असं असूनही मेरीनं अपूर्णावस्थेतील त्याचं लिखाण प्रकाशित केलं. 'समग्र नसलं तरी काही साहित्य' आपण प्रकाशित करण्यास हरकत नाही अशी हेमिंग्वेची 'स्पष्ट' इच्छा होती हे मेरीचं स्पष्टीकरण असे साहित्य प्रकाशकाच्या हाती सुपूर्द करण्याआधी तिनं स्वत:पुढे मार्गदर्शक तत्त्वे ठेवली होती ती अशी : हेमिंग्वेनं योजलेली विरामचिन्हे व 'अँड' आणि 'बट' यात केलेला फेरफार वगळता मजकूर त्यानं लिहिल्यावरहुकूम छापणं, त्यात असलेल्या मोकळ्या जागा, त्रुटी तशाच राहू देणं.

इथंच तर मेख आहे. तुम्ही विरामचिन्हांना महत्त्व देता वा देत नाही, पण हेमिंग्वे देत होता. 'अँड' आणि 'बट' यांना महत्त्व द्यावसं तुम्हाला वाटतं वा वाटत नाही, पण हेमिंग्वेला वाटतं द्यावसं. तुम्हाला वाटतं, प्रकाशित करण्यालायक सुव्यवस्थित रचलेली संहिता आहे किंवा तुम्हाला तसं वाटत नाही, पण अशी संहिता प्रकाशित केली जाऊ नये असं हेमिंग्वेला वाटत असे.

आता हेमिंग्वेच्या जन्मशताब्दीचं निमित्त साधून १९९९ च्या जुलैमध्ये त्याची अप्रकाशित कादंबरी बाजारात येत आहे या कादंबरीच्या प्रकाशनाची घोषणा करतेसमयी चार्ल्स स्क्रिबनर (तिसरा) याने 'न्यूयार्क टाइम्स'ला सांगितलं की ही शेवटची, आणखीन पुस्तक नाहीत. 'ट्रु अॅट फर्स्ट लाइट' हे कादंबरीचं नाव संहितेमधूनच निवडण्यात आलं आहे. (In Africa a thing is true at first light and a lie by noon and you have no more respect for it than for the lovely, parfectly weed- fringed lake you see across the sun-baked salt plain) १९५४ : ज्या वर्षी हेमिंग्वे आणि मेरी केनयामधील सफारीहून परतली तेव्हापासून हेमिंगे या कादंबरीवर अधुनमधून सतत काम करत होता ते १९६१ मध्ये आत्महत्या करेपर्यंत. कादंबरीची पार्श्वभूमी आफ्रिकन आहे.

कुठल्याही कादंबरीच्या प्रारंभी लिखाणाचा ओघ तसा निर्विघ्नपणे पुढं सरकत नाही. ही 'आफ्रिकन कादंबरी' ही त्याला अपवाद नव्हती. एअरकंडिशनसारख्या गोष्टीही त्याच्या लेखनात व्यत्यय आणत असल्याची तक्रार हेमिंग्वेनं क्युबाहून बर्नार्ड बेरेन्सनला पाठवलेल्या पत्रात केली आहे (सप्टेंबर १९५४) याच पत्रात त्यानं पुढं म्हटलं आहे. : 'तुम्ही लिहित राहाता पण ते तकलुपी असतं जणू काही it were done in the reverse of a greenhouse. बहुधा मी ते सारं फेकून देईन, परंतु शक्यता आहे पुन्हा पहाट जागी होईल

तेव्हा मी जे लिहिलं आहे त्या सांगाड्याचा वापर करेन तो भरून टाकीन गंधांनी आणि पक्ष्यांच्या प्रभातीच्या किलबिलाटांनी आणि या प्रदेशाच्या मनोहारी गोष्टींनी. आफ्रिकेत असतं अगदी तस्संच इथं थंडीच्या मोसमात असतं.' १९५५ च्या सप्टेंबरमध्ये त्यानं बेरेन्सनला पुन्हा लिहिलं. या वेळी नव्या टाईपरायटरवर. कारण स्पष्ट केलं की जुना टाईपरायटर तो वापरू शकत नाही. 'कारण त्यावर (आफ्रिकन) पुस्तकाचं ५९४ वं पृष्ट आहे, डस्टकव्हरनं ते झाकलेलं आहे आणि पानं बाहेर काढणं अशुभ आहे.' १९५५ च्या नोव्हेंबरमध्ये 'न्यूयॉर्क टाइम्स'च्या हार्वे (Breit) ब्रेटला त्यानं कळवलं : '६८९ व्या पानावर आहे आणि बेटा मला शुभ चिंतावस.' १९५६ च्या जानेवारीत त्याचा ॲटर्नी आल्फ्रेड राइस याला त्यानं लिहिलं की तो ८१० व्या पानावर पोचला आहे.

त्यानंतर 'सिलेक्टेड लेटर्स' मध्ये या आफ्रिकन कादंबरीविषयी अवाक्षरही आढळत नाही; मुग्धता आहे. 'लेखन करतेसमयी असा एक क्षण येतो जेव्हा लेखकाला कळून चुकतं की पुस्तक अडकून पडलं आहे, आणि त्याला हेही कळून चुकतं की ते नीट मार्गी लावण्याइतपत आवश्यक ती इच्छाशक्ती, उमेद, स्मृती आणि एकाग्रता यांचा आता पूर्णपणे प्रभाव आहे. जेव्हा परिस्थिती बिकट असते, तुम्हाला ती अगदी असहाय्य करते तेव्हा तुम्हाला पुढं पुढं गेलंच पाहिजे. कादंबरीबाबत एकच गोष्ट करायला हवी आणि ती म्हणजे ती लिहित राहून तिचा शेवट गाठणं, इतीपर्यंत पोचणं – 'हे हेमिंग्वेनं एफ्. स्कॉट फिट्झराल्डला लिहिलं होतं. १९२९ मध्ये जेव्हा फिट्झराल्ड 'टेंडर इज द नाइट' ही कादंबरी लिहिता लिहिता अटकून पडला होता, काही केल्या कथानकाचा गाडा पुढं सरकत नव्हता.

१९२९ मध्ये हेमिंग्वे तिशीचा होता. परिस्थिती बिकट असली आत्यंतिक निरुत्साही असली तरी लिहित राहाण्याची इर्षा होती, तेवढी एकाग्रता होती. खरं तर त्याचा हा काळ खडतर होता. १९२८ च्या डिसेंबरमध्ये त्याच्या वडिलांनी आत्महत्या केली होती. त्याची आई, सोळा वर्षाची बहीण आणि तेरा वर्षाचा भाऊ यांच्या भवितव्याची चिंता होती. तरीही तो 'अ फेअरवेल टु आर्म्स' लिहित होता. त्याच्या वडिलांचा दफनविधी आटोपला आणि त्यानंतर काही दिवसांनी त्यानं मॅक्स्वेल पर्किन्सला लिहिलं होतं : 'अर्थात जाणून आहे की मी करायची गोष्ट एकच, चिंता न करता काम करत राहाणं– माझं पुस्तक नेटकेपणानं पूर्ण करणं जेणेकरून त्यातून मिळालेल्या उत्पन्नामधून मी त्यांना मदत करू शकेन.' आणि त्यानंतर सहा आठवड्यात पूर्ण हस्तलिखित प्रकाशकाचा हवाली केलं होतं. एका विवाहाचा विचका झाला होता पण अजून तीन व्हायचे होते. १९५४ च्या दोन विमान अपघातांचे आघात अजून व्हायचे होते. ते आघात झाले आणि त्या अपघातांनी त्याचं यकृत, त्याची प्लीहा आणि त्याचं एक मूत्रपिंड निकामी करून टाकलं, त्याच्या आतड्याला मार बसला, मणक्याचं हाड भेगाळलं, मस्तक आणि चेहरा जळण्यानं डागाळले, बधीर झाले, दृष्टी

मंदावली, कर्णबधीर झाला. आता पूर्वीची रग उरलेली नाही एकाग्रता ढासळली स्मृती दगा देऊ लागली. तो म्हणत होता, 'त्याच्यापाशी हिऱ्यांची खाण आहे. लोकांनी त्याला एकटं राहायला द्यायला हवं, निळ्याशार मातीतून हिरे खोदून काढून त्यावर पैलू पाडण्याइतपत उसंत द्यायला हवी. मला जबरदस्त मार बसला आहे आणि तरीही मी नामोहरम झालेलो नाही. यातून उभं राहाण्यासाठी मला हळूहळू मेहनत घ्यायला हवी आणि शिवाय लिहायला हवं आणि अन्य कसलीही चिंता करण्याचा विचारही झटकून टाकायला हवा.' पण तसं घडत नव्हतं. १९५६ च्या ऑगस्टमध्ये त्यानं जुनि. चार्ल्स स्क्रिबनरला लिहिलं : 'अन्य प्रकारचं काही पद्धतशीर लेखन केल्याविना 'आफ्रिकन बुक'वर काम सुरू करणं जड वाटत आहे' आणि म्हणून तो कथालेखनाकडे वळला होता.

१९५८ च्या नोव्हेंबरमध्ये आपल्या एका मुलाच्या पत्रात त्यानं उल्लेख केला होता की केचममधल्या आपल्या हिवाळी वास्तव्यात त्याला पुस्तक पूर्ण करायचं आहे. पण हा उल्लेख 'द पॅरिस स्टफ' च्या संदर्भात त्यानं केला होता. १९६० च्या एप्रिलमध्ये त्यानं स्क्रिबनरला कळवलं होतं की हे 'पॅरिस बुक' त्याच्या हिवाळ्यात प्रसिद्ध व्हायच्या यादीतून काढून टाकावं. हे पुस्तक आहे त्याहून अधिक चांगलं तो करू शकला नाही तर स्क्रिबनरनं पाहिलेल्या मेरीनं टाइप केलेल्या खर्ड्यावरहुकूम, महिन्यांनी आणि त्याच्या मृत्यूआधी पाच महिने स्क्रिबनेरकडे त्याच्या लेखनावर संस्करण करणाऱ्या संपादकाला आपण काय करत आहोत हे समजावून दिलं होतं. अगदी स्पष्टपणे रोचेस्टरमधील 'मेयो क्लिनिक'मध्ये त्याला देण्यात आलेल्या दोन 'शॉक ट्रिटमेंट'च्या दरम्यानच्या काळात त्यानं हे कळवलं होतं हे विशेष : 'सर्व मजकूर प्रकरणश: लावून झाला– ती १८ झालीत– आणि शेवटच्यावर नं. १९ वर– काम करत आहे– आणि 'टायटल'वर विचार करत आहे. त्यानं टंकलिखित पानांचा तपशील काटेकोरपणे दिला होता. त्याच्या हिशेबानुसार, एकूण पृष्ठे : १७७ + ५$\frac{१}{२}$ + १ $\frac{१}{४}$ .

आपली साहित्यकृती प्रकाशनाला देण्याआधी तीवर संस्करण करणं हा हेमिंग्वेचा साहित्यिक पिंड. हिरा घासूनपुसून त्याला पैलू पाडावेत तेवढ्याच नजाकतीनं, परीश्रमानं प्रकाशनयोग्य साहित्यकृती घडवणं यावर त्याचा कटाक्ष परिष्करण न केलं गेलेलं आपलं साहित्य प्रकाशनाला देण्यात येऊ नये असा त्याचा दंडक. या संदर्भात १९५१ मध्ये त्यान चार्ल्स स्क्रिबनरला पाठवलेलं एक पत्र फार बोलकं आहे. या काळात मृत्यूची अशुभ चाहूल बहुधा त्याला लागली असावी. एका प्रदीर्घ चार खंडात्मक कादंबरीवर तो काम करत होता. बरीच वर्षं लेखनप्रक्रिया चालू होती. त्यातील काही ठराविक भाग पुरेसा पूर्ण झाला होता, त्याच्या निधनानंतर प्रकाशित करता येण्याजोगा. या वेळी त्यानं त्याच्या अटीही नोंदवल्या होत्या. त्यात आपल्या कृतीत कुठल्याही प्रकारे संपादकीय ढवळाढवळ करण्यास मनाई करण्यात आली होती व अपूर्णावस्थेतील पहिला भाग प्रकाशित न करण्याची सूचना दिली होती. 'शेवटच्या दोन भागात काटछाट करण्याची अजिबात आवश्यकता नाही. तिसऱ्यात

बरीच काटछाट करायला हवी हे खरं पण काळजीपूर्वक शस्त्रक्रिया केल्यागत तिच्यावर काम करण्यात आलं आहे आणि मी मेलो तर त्यात काटछाट करण्याची गरज नाही...... शेवटचे तीन भाग तू वेगवेगळे प्रकाशित कर असं मी तुला लिहिलं होतं याचं कारण मला जर का अपघाती मरण आलं वा अन्य कुठल्यातरी प्रकारे मृत्यू आला तर पहिला भाग प्रकाशनयोग्य करण्याचं काम माझ्या हातून राहून जाईल.'

पुढल्याच वर्षी हेमिंग्वेनं स्वत:च या हस्तलिखिताचा चौथा भाग 'द ओल्ड मॅन अँड द सी' या नावानं स्वतंत्ररित्या प्रकाशित केला. हस्तलिखिताचा 'पहिला भाग' प्रकाशनयोग्य नाही असं त्यानं सांगितलं असूनही तो 'आयलण्ड्स इन द स्ट्रीम' चा भाग म्हणून प्रसिद्ध करण्यात आला. 'आफ्रिकन कादंबरी' वा 'टु अॅट फर्स्ट लाइट' या त्याच्या अपूर्णावस्थेतील कादंबरीची गतच न्यारी. सुमारे साडे आठशे पानाचं हस्तलिखित संपादकीय संस्करणानंतर निम्म्यानं उरलं. संपादनाचं काम हेमिंग्वेचा मुलगा पॅट्रिक यानं पार पाडलं. तो म्हणतो 'संक्षेप करण्यापुरतंच त्यानं संपादन मर्यादित ठेवलं आहे, क्वचित ठिकाणी काही स्थळांची नाव बदलण्यात आलीत.' हा संक्षेप लेखकानं केला नव्हता, अन्य कुणी केला होता. साहजिकच लेखकाचा मूळ उद्देश संक्षेप करणाऱ्याकडून डावलला गेला. अपूर्णावस्थेतील कृती प्रकाशित केली जाऊ नये या हेमिंग्वेच्या इच्छेला मूठमाती देण्यात आली. ललितकृतीचा हेतूच इथं अमान्य करण्यात आला. 'टु अॅट फर्स्ट लाइट' मधील जे काही उतारे आजवर प्रसिद्ध करण्यात आले आहेत त्यावरून ध्यानी येतं की त्याचं स्वरूप नोंदीवजा आहे, प्रसंगांची निर्मिती प्रक्रिया अद्याप पूर्ण व्हायची आहे. थोडक्यात, शब्द उतरून काढण्यात आले आहेत, लिहिलेले नाहीत. इथंतिथं काही वेधक भाग आढळतो, काही तुकड्यांमधून लेखकाला जाणवलेला स्वत:चा विनाश जाणवतो वाचकाला सहानुभूती वाटून तो विचार करू लागतो की जर का लेखक जगता (म्हणजेच त्याला इच्छा आणि उमेद असेल, त्याची स्मृती आणि एकाग्रता शाबूत असेल) तर त्यानं या कथासामग्रीला सुरेख घाट दिला असता, एक अभिजात कलाकृती आपल्यासमोर आली असती. त्याच्या मनश्चक्षुसमोर एक माणूस उभा राहातो. ज्या स्थळावर त्याचं प्रेम होतं तिथं तो परतून आला आहे. पहाटेचा तीनचा समय. त्याला आढळून येतं की ज्या भूमीवर प्रेम केलं होतं अशा तेव्हाचा तो माणूस आता उरलेला नाही आणि जो कुणी व्हावं अशी त्याची इच्छा होती तसा तो पुन्हा कदापी होऊ शकणार नाही. परंतु अशी शक्यता प्रस्तुत लेखकाच्या बाबतीत मावळली होती, कारण यापूर्वीच १९३६ मध्ये त्यानं 'द स्नोज ऑफ किलिमांजारो' नामक कथा लिहिलेली होती. आफ्रिकेमध्ये गँग्रीननं शेवटच्या घटका मोजत असताना नायक स्वत:शी म्हणतो : Now he would never write the things that he had saved to write until he knew enough to write them well. आणि त्यानंतर, ही पश्चात्बुद्धी, आत्यंतिक दु:खदायक गोष्ट : Well, he would not have to fail at trying to write them either.

**(आधारीत)**

---





# साहित्य-कल्पित-वास्तव

## क्लिओपात्रा (प्रकरण ४ थे)

**–डॉ. मीना वैशंपायन**

क्लिओपात्राने स्वत:बद्दल ज्या कल्पना हेतूत: लोकांमध्ये प्रसृत केल्या त्या कल्पना कालांतराने दंतकथा बनून गेल्या. त्यात अर्थातच ॲन्थनीला व तिच्या त्याच्याबरोबरीच्या नात्याला देखील स्थान होतं. ज्यूलियस सीझर हा मृत ओसिरीस असे मानल्यावर आणि क्लिओपात्राने त्याच्यासाठी भरपूर शोक केल्यावर पुनर्जन्म मिळालेल्या ओसिरीसच्या स्वरूपात ॲन्थनीने येणे हे स्वाभाविक होते. याच ॲन्थनीला तिने वाजतगाजत इजिप्तला आणले. दिओ कॅसियस म्हणतो की, "ॲन्थनी आणि क्लिओपात्रा यांनी इसिस आणि ओसिरीस यांच्या भूमिका अगदी व्यवस्थित रंगवल्या. त्यावेळी तो ॲन्थनी जणू काही भारला गेला होता. तिने त्याच्यावर काहीतरी जादूच केली असावी." उलट वस्तुस्थिती अशी होती की, क्लिओपात्राचा जनसंपर्क कार्यक्रम किती सुनियोजित आणि प्रभावी होता याची नोंद ॲन्थनीने अगदी उघड्या डोळ्यांनी घेतली. आपली ओसिरीसबरोबर तुलना केली जातेय यात ॲन्थनीला वैषमय वाटण्याचं कारणच नव्हतं. कारण हा देव विजयासाठी उत्सुक असा, मनाला हितकारक गोष्टींच्या दिशेने वळविणारा होता. शिवाय अगदी थेट भारतापर्यंत त्याने प्रवास केला होता. जिथे वस्ती नव्हती तिथे त्याने शेतीचा आरंभ केला, नगरे वसवली, त्यामुळे कितीतरी देशांनी त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केलेली होती.

तार्ससमध्ये क्लिओपात्राने जलमार्गे प्रवेश केला. तिच्या दैवी प्रतिमेला ते साजेसंच होतं. इसीस देवता ही खलाशांची रक्षणकर्त्री होती तसंच तिनेच समुद्रप्रवासाचा शोध लावला होता. अपुलियस या लेखकाने ल्यूशियस हे पात्र 'नेव्हिगियम आयसिडिस' नावाच्या उत्सवाचे वर्णन करताना दाखवले आहे. उन्हाळ्याच्या समुद्रसफरींच्या आरंभी हा उत्सव साजरा होई विविध पोषाखांबद्दल विदूषक, फुलांचे अलंकार ल्यालेल्या स्त्रिया, वाद्यं वाजवणारी मुलं व इतर वादक, धर्मगुरू, इजिप्शियन देवतांच्या मूर्ती अशा सर्वांची एक मिरवणूक निघे व ती समुद्रकिनारी जाई. तिथे प्रार्थनापूर्वक एखादा शुद्ध, चारित्र्यवान पाद्री मंत्र म्हणून देवतेला जहाजाची भेट देत असे. ते जहाज उत्तम बांधणीचे असे आणि त्याच्या मुख्य भागावर सर्वत्र इजिप्शियन चित्रे कोरलेली, रंगवलेली असत. इसीसदेवीच्या हंसीप्रमाणे निमुळत्या मानेचीच प्रतिकृती भासावी असा त्या जहाजाच्या पुढच्या टोकाचा निमुळता भाग सोन्याच्या मुलाम्याने मढवलेला असे त्या जहाजाची मुख्य चौकट सायट्रसच्या मजबूत लाकडापासून बनवलेली

असे. त्या जहाजावर सुगंधी द्रव्ये आणि इतर वस्तू, नजराणा म्हणून भरलेल्या असत. त्याचे दोर कापून ठेवलेले असत आणि कुणाचीही मदत न घेता इसीस देवतेप्रमाणे क्लिओपात्रा आपण जलप्रवासाला निघाल्याचा आविर्भाव करी.

वेगवेगळ्या धर्मपंथांचा प्रसार होतो तेव्हा त्या पंथाच्या देवतांच्या प्रवासाविषयी अनेक दंतकथा प्रसृत होतात. 'नेव्हिगियम आयसिडिस' हा उत्सव म्हणजे इसीसदेतेच्या शक्तीचा प्रभाव इजिप्त बाहेरदेखील किती आहे हे दाखवण्यासाठीचा पुरावाच होता जणू ! 'इसीस पेलागिया' (समुद्रातली इसीस) ही बायब्लोसपासून इफेसिसपर्यंत पूर्वेकडे सर्वांना माहीत होती. तेथेच सेंट पॉलची व तिची भेट झाली.

तार्ससमध्ये क्लिओपात्रा ॲन्थनीला भेटण्यासाठी आपल्या सुंदर, सजवलेल्या खास नौकेतून जेव्हा आली तेव्हा इसीसची खास करून पूजा केली गेली. इ. स. च्या तिसऱ्या शतकात इफेसियन झेनोफॉन याने 'इफेशियका' नावाची कादंबरी लिहिली होती. त्यामधली नायिका इसीसची पूजा करण्यासाठी खास करून तार्ससला येते. ख्रिश्चन युगापूर्वी इसीसदेवीचा हा संप्रदाय तिथे चांगलाच प्रस्थापित झाला होता असे पुरातत्त्व विभागाला सापडलेल्य पुराव्यांवरूनही दिसते. ज्यावेळी ही इसीस देवता मानवी रूप धारण करून, इजिप्तची रात्री क्लिओपात्राच्या रूपात मोठ्या वैभवनिशी आपली नौका घेऊन सिडनसनदीतून प्रवास करीत आली तेव्हा तार्ससच्या नागरिकांनी तिचे मन:पूर्वक स्वागत केले. अशाप्रकारे वाऱ्यावर फरफरणाऱ्या शिडांच्या नौकेवरील डेकवर उभी असणारी इसीसदेवीची मुद्रा त्यांच्या नाण्यांवर कोरलेली असल्याने त्या लोकांच्या चांगल्याच परिचयाची होती. त्यामुळे क्लिओपात्राचे दैवीरूप त्यांनी लगेच मान्य केले. साहजिकच ॲन्थनीला भर बाजारात एकटा सोडून ते लोक तिला बघायला धावले. ती काही कुणी साधीसुधी राणी नव्हती तर त्यांची परमदेवताच मानवी रूपात तिथे अवतरली होती.

प्लुटार्कने निराळीच कथा ऐकली. ॲन्थनीच्या युरोपियन सोबत्यांना परिचित अशा रूपात ती क्लिओपात्रा त्यांना दिसली. प्लुटार्क म्हणतो, "ती अफ्रोडाइटच्या दैवी रूपात आली."

इ. स. पूर्वी १ल्या शतकापासून पुढे दोनशे वर्षापर्यंत इसीस आणि अफ्रोडाइट या सामान्यपणे एकच आहेत अशी समजूत होती. पाहिली बेरेनिस– क्लिओपात्राची पूर्वज– ही ॲफ्रोडाइटचं मानवी रूप आहे असे मानले जाई. (ती इजिप्शियन असल्याने तिला इसीसदेखील मानत) ही इ. स. पू. तिसऱ्या शतकात होऊन गेली आणि गंमत म्हणजे त्याचवेळी तिची सून आर्सिनो ही देखील इसीस आणि ॲफ्रोडाइट म्हणून गौरवली जात होती. सिझरेथनच्या जन्माच्या वेळी क्लिओपात्राने जी सायप्रसची नाणी काढली त्यावर इसीस आणि ॲफ्रोडाइट या दोघींची प्रतिके होती. या दोन देवतांचं एकत्रीकरण ही काही नवीन गोष्ट नव्हती. भूमध्यसमुद्राच्या पूर्वेकडे या दोन्ही देवतांची चित्रे असणारे स्तंभ सापडले आहेत.

'इसीस पेलागिया' ही ॲफ्रोडाइटप्रमाणे समुद्रावरील चकाकत्या लाटांमधून जन्माला आली आणि तिच्याचप्रमाणे इसीस वैषयिक प्रेमाचीही देवता मानली गेली. स्त्रीपुरुषांना एकत्र आणणारी, वैवाहिक सुखाचा आशीर्वाद देणारी अशी ही देवता होती. हे सारं जरी असलं तरी रोममध्ये या देवतेच्या देवळात जाण्यावरून खूप वेगवेगळ्या अफवा पसरलेल्या होत्या. 'व्हीनस' देवतेच्या भक्तांबाबत मात्र अशा वावड्या उठलेल्या नव्हत्या. त्यावरून असं अनुमान काढता येतं की, रोमन स्त्रिया व इतर परकीय स्त्रिया यामधील वांशिक फरकावरून त्या अफवा उठवलेल्या असाव्यात. स्वत: क्लिओपात्राला- देखील ती परकीय वंशाची म्हणून त्रास सहन करावाच लागला होता. नाहीतर प्रेमदेवतेबद्दल काही कुणाच्या मनात नाराजी नव्हती. पूर्वीच्या एका ख्रिश्चन लेखकानं म्हणून ठेवलं आहे की, 'इसीस' ही टायर (Tyre) प्रदेशात दहा वर्षे वेश्याव्यवसाय करीत होती. टायबेरियसच्या काळातील एका अफवेची जोसेफस नोंद घेतो. तो म्हणतो, "असे म्हणतात की, इसीसच्या देवळात श्वानमुखा अन्युबीसचा मुखवटा घातलेल्या एकाने एका घरंदाज स्त्रीवर अत्याचार केला." जुवेनाईल हा लेखक 'इसीस'ला अश्लील मानत असे. 'अर्स अमाटोरिया' या आपल्या पुस्कात ओविड हा लेखक एका मुलीच्या पालकांना धोक्याची सूचना देतो की, 'सुंदर कपड्यात सजलेल्या इसीसच्या देवळात काय होऊ शकेल ते काही विचारू नका.' त्याच्या म्हणण्याचा अर्थ की चोरट्या संबंधांसाठी हे देऊळ प्रसिद्ध आहे. पॉमोईमध्ये इसीसचं देऊळ म्हणजे कुंटणखाना असे मानले जाई. या सगळ्या अफवा इसीसच्या स्वभावातल्या वाईट गोष्टींच्या निदर्शक आहेत. ज्यांना परकीय वंशाची शंका होती त्यांनीच या अफवा पसरवल्या आणि तिची प्रतिमा डागाळण्याचा प्रयत्न केला. कारण तिची प्रतिमा व्हीनस आणि ॲफ्रोडाइट या देवतांशी मिळतीजुळती होती.

त्यामुळे जेव्हा क्लिाओपात्रा ॲफ्रोडाइटसारखा वेष करून सिडनस नदीमधून प्रवास करीत आली तेव्हा ती 'इसीस' आणि 'ग्रीकोरोमन' देवतेसारखीच भासली.

त्या नौकेवरील तिच्या सुंदर, सुंदर सेविका, त्यांचे उत्तमोत्तम पेहराव, सुगंधी द्रव्यांचे फवारे, सोने, चांदी यांच्या पत्र्याने मढवलेल्या साऱ्या वस्तू, हिरे-मणकांचे दागिने या साऱ्यांचा परिणाम सामान्यांवर होणं स्वाभाविकच होतं. काहीजणांना तिला पाहून इसीस पेलागियाची आठवण झाली. पण अनेकांना ती व्हीनससारखीच वाटली. प्राचिन चित्रकार ॲपेलसनं समुद्राच्या लाटांमधून वर येणारी व्हीनस रंगवली होती. ती त्यांच्या डोळ्यांसमोर होती. क्लिओपात्राभोवती दरवळणारी सुगंधांची वलयं ही समजूत दृढ करीत होती. कारण एका अज्ञात एलिझाबेथियन लेखकाने लिहिलं आहे. "ग्रीक कवींच्या म्हणण्याप्रमाणे व्हीनस एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाताना आपला अपूर्व सुगंध मागे ठेवून जाते. तो रेंगाळणारा सुगंध म्हणजे तिच्या अस्तित्वाची, तेथील हजेरीची साक्ष असे." क्लिओपात्राच्या पुढील हालचाली या तेथल्या जनतेला व्हीनसच्या जलसफरींप्रमाणे वाटल्या असाव्यात



अनुक्रमणिका

क्लिओपात्राची ही सर्व योजना अर्थातच यशस्वी झाली. प्लुटार्क सांगतो की, या साऱ्या प्रदर्शनातून तिला जे काही साधायचं होतं ते साधलं गेलं. ज्यांना ते समजणं आवश्यक होतं त्यांना ते समजलं. इ. स. पूर्व ५ व्या शतकापासून तार्सस हे संकेतस्थल होते. प्रेमदेवता आणि पूर्वेवर राज्य करणारा राजा यांच्या भेटीचं ते ठिकाण आहे असं मानलं जाई. ती देवता आता पुन: आपल्या दैवी साथीदाराशी मिलन व्हावं म्हणून आली आहे असं सारेजण मानत होते. आशियाखंडाच्या सुखासाठी ॲफ्रोडाइट आणि डायोनिसस एकत्र आले आहेत, अशी कुजबूज सर्वत्र सुरू झाली.

क्लिओपात्राप्रमाणेच ॲन्थनीदेखील अशा प्रकारच्या देखाव्यांबाबत जागरूक असे. पर्थियामध्ये एका सणसणीत पराभवानंतर आपल्या सैन्यासमोर जाताना कोणता वेष करावा यावर त्याने वाद केला होता. आपण काळे कपडे घालून गेलो की सैन्याच्या भावनांना हात घातला जाईल असे त्याला वाटले. पण त्याच्या मित्रांनी ही कल्पना उडवून लावली. मग त्याने सेनाप्रमुखाचा शेंदरी अंगरखा घातला आणि सैन्यापुढे भाषण दिले. हा ॲन्थनी वक्ता होता आणि 'शोमन' होता. ज्युलियस सीझरच्या अत्यंविधीला आलेल्या जनसमुदायासमोर बोलताना त्याने रोमच्या राजकारणाची दिशाच बदलून टाकली. या भाषणाच्या वेळच्या मंच आयोजनाचे जे तपशील दिले आहेत त्यावरून लक्षात येतं की ते भाषण, तो मंच हे काही उत्स्फूर्त नव्हतं. ते आयत्यावेळचं आहे असं फक्त भासवलं गेलं होतं.

"दफनविधीच्या वेळी म्हटल्याजाणाऱ्या शोकगीतानं त्या असहाय समुदायाचा स्वत:वरील ताबा सुटला. नंतर कोणीतरी सीझरच्या आवाजात काही वाक्यं म्हटली. ('परमेश्वरा त्यांना माफ कर' अशासारखी) त्यानंतर सीझरची एक मेणाची आकृती अदृश्य हातांनी वर उचलली गेली आणि लोकांच्या डोक्यांवरून फिरवली गेली. त्या आकृतीचा छिन्नविच्छिन्न चेहरा, त्याच्या शरीरावरील तेवीस जखमा या बघितल्यावर समुदायावर हवा तसा परिणाम झालाच."

या सर्व कार्यक्रमाचं दिग्दर्शन आणि नेतृत्व ॲन्थनीनं केलं. त्याच्या नंतरच्या सगळ्या कामगिरीत त्याने आपले राजकीय ज्ञान, गुण नाटकी ढंगाने दाखवले.

ॲन्थनी स्वत:ला अलेक्झांडर, हर्क्युलिस किंवा डायोनिसस यांच्याप्रमाणे समजत असे. आता आपण पूर्वेचे राजे होणार म्हणजे आपण अलेक्झांडरचे वारसच आहोत असे त्याला वाटे. आपल्या नाटकी आविर्भावांनी तो ही तुलना दृश्य करी असे प्लुटार्क सांगतो. "आपला अतिशय किंमती असा शेंदरी अंगरखा काढून त्याने ब्रूटसच्या शवावर फेकला आणि सेवकांना सांगितले की ब्रूटसच्या दफनाची सर्व जबाबदारी त्याची स्वत:ची राहील. अगदी ह्याच प्रकारे अलेक्झांडरने डेरियसच्या शवाबद्दल आदर व्यक्त केला होता. अगदी याच रितीने अलेक्झांडरने त्या पार्शियन राजाचे शव झाकले होते. आपणच त्याचे योग्य वारस आहोत हेच जणू ॲन्थनी यातून सुचवत होता. अलेक्झांडरच्या भोवती असणाऱ्या वलयाची थोडी-

तरी प्रथा निदान अशा संगतीने आपल्यावर पडावी असंच त्याला वाटत होतं.

आपलं कर्तृत्व अलेक्झांडरसारखं आहे या समजुतीत ॲन्थनीला समाधान होतं आणि दुसरा आनंद होता तो असं समजण्यात की आपल्या अंगात हर्क्युलिसचं रक्त आहे. हर्क्युलिसच्या घराण्यातले आपण आहोत असा तो दावा करीत असे. प्लुटार्क म्हणतो, "पूर्वापार अशी समजूत आहे की ॲन्थनीच्या घराण्यात हेराक्लाईटच्या रक्ताचा अंश आहे. ॲन्थनीला स्वत:लादेखील आपली शरीरयष्टी त्या समजुतीला पुष्टी देणारी आहे असेच वाटत असे." हेराक्लाईटच्या रक्ताचा अंश असणारी कितीतरी प्राचीन घराणी होती. पहिली राणी एलिझाबेथ हिने अगणित लोकांशी शय्यासोबत केली अशी वदंता आहे तशीच हेराक्लाइडच्या बाबतीत आहे. ॲरिस्टाइड्स रेटॉर याने नोंदीत म्हटले आहे की, "अनेक राजे आणि इतर लोक आपल्या घराण्याची मुळं हर्क्युलिसपर्यंत नेऊन भिडवतात." अर्थातच असा संबंध सांगताना त्यांना त्यामध्ये गौरव वाटत असे हे नक्की !

प्लुटार्क म्हणतो की, "ॲन्थनीचं व्यक्तीत्व पुरुषी, उमदं होतं. हर्क्युलिसच्या पुतळ्यांमध्ये जो एक दणकट, रांगडा भाव जाणवतो तसा तो ॲन्थनीत जाणवे." दोन हजार वर्षांनंतर रोममध्ये जाणारे आताचे प्रवासी या पुतळ्यांचं, तैलचित्रांचं वैविध्य पाहून चकित होतात. जुन्या दगडी शवपेट्या किंवा फुलदाण्या, इतर शिल्पाकृती यावर हर्क्युलिसच्या प्रतिमा कोरलेल्या दिसतात. त्याच्या अंगावरील सिंहाचं कातडं आणि गदा ही त्याच्या मर्दपणाची आणि निष्ठुर क्रौर्याची चिन्हं मानली जात. हर्क्युलिसबद्दल खरं म्हणजे मनात कौतुकच असतं, कारण त्याने आपल्या शक्तीचा उपयोग मानवतेच्या सेवेसाठी केला. त्यामुळे हर्क्युलिसशी नातं सांगण्यात, त्याचा वारसा सांगण्यात ॲन्थनीला गौरव वाटला किंवा त्याने तशी धडपड केली तर ते स्वाभाविकच म्हटलं पाहिजे. प्लुटार्क म्हणतो, "ज्यावेळी मोठ्या जनसमूहासमोर त्याला जायचं असे तेव्हा तो मुद्दाम अशा प्रकारचा वेष परिधान करी. त्याचा पोलिसी गणवेशासारखा घट्ट अंगरखा मांड्यांपर्यंत आलेला असे आणि त्यावर पट्टा बांधलेला असे. त्यावर पायघोळ अंगरखा आणि बाजूला लटकणारी तलवार." हा नायकाचा वेष होता. नंतर त्याचे शत्रू त्याला 'हर्क्युलिसचा गावठी अवतार' म्हणून टोमणे मारीत त्यांमागे ॲन्थनीने स्वत:च निर्माण केलेली ही अशी प्रतिमा होती.

हर्क्युलिसच्या धाडशी कृत्यांनी तो भूमध्यसमुद्रापासून जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीपर्यंत (इथे हर्क्युलिसचे स्तंभ उभारलेले आहेत) टँजियर– (इथे त्याने राक्षसाला मारले) पर्यंत, व तेथून पुढे कॉकेशसपर्यंत तो गेला. इथे त्याने प्रॉमेथ्यूयसला मुक्त केले. इजिप्तमध्ये त्याने बुसीरीस राजाशी मुष्टियुद्ध केले. आशिया आणि दक्षिण आफ्रिका या प्रदेशांमध्ये तो माहीत होता, त्याचा आदर केला जाई. ॲन्थनीला याच प्रदेशांवर वर्चस्व मिळवायचे होते. अलेक्झांडरही आपण हर्क्युलिसचा वंशज असल्याचा दावा करी.

डायोनिसस याच्यापेक्षा चांगला होता. त्याच्या वंशाची ओळख भूमध्यसमुद्रवासीयांना

जराशी उशीराच झाली. ग्रीकांना माहीत असलेल्या दंतकथेनुसार आशियावासीयांना तो देवाप्रमाणे वाटे. ते त्याच्या आज्ञांचे पालन मोठ्या प्रेमाने करीत. तो जलमार्गाने, समुद्रप्रवास करून दूरवरून येई. 'ओरिएंटल' प्रदेशांवरच्या विजयाचं वलय त्याच्याभोवती असे. विलक्षण चैतन्य आणि आनंदी प्रवृत्ती काहीसा उन्माद आणि मद्य या साऱ्या गोष्टी त्याच्याबरोबर येत.

इ. स. पूर्व ४१ मध्ये, क्लिओपात्राला सिडनस येथे भेटण्यापूर्वी, पूर्व रोमन साम्राज्याचा सम्राट म्हणून ॲन्थनीने इफेसस मध्ये प्रवेश केला, त्यावेळी निघालेल्या मिरवणुकीत स्त्रियांनी रोमन देवतेप्रमाणे, पुरुषांनी पेन, सॅटर (अर्धामाणूस, अर्धा बोकड अशा रुपाची देवता) यांच्याप्रमाणे कपडे केलेले होते. सगळ्या नगरीत जल्लोष होता. विविध वाद्ये गाजत होती, आणि डायोनिससच्या रूपातील ॲन्थनीच्या नावाने लोक जयजयकार करीत होते. ॲन्थनी त्यांना आपला हितकर्ता, कल्याणकारी राजा वाटत होता.

अर्थात अशा प्रकारे मिरवण्याची त्याची काही ही पहिलीच वेळ नव्हती. प्लुटार्क सांगतो की, "कितीतरी वर्षापूर्वी ज्यूलियस सीझरच्या घोडदळाचा प्रमुख म्हणून ॲन्थनीने हे सारे कौतुक अनुभवले होते, करून घेतले होते. ॲन्थनीच्या प्रदर्शनीय हौसेमुळे जास्तीत जास्त झगमगाटात, लोकांच्या नजरेत भरेल अशाच प्रकारे, दाखवेगिरी करीत साऱ्या गोष्टी तो करीत असे. स्वत:ची देव म्हणून किंवा हर्क्युलिस, डायोनिससचा वंशज म्हणून प्रतिमा निर्माण व्हावी यासाठी तो प्रयत्नशील असे.

ॲन्थनीचा आणि क्लिओपात्राचा अशा प्रकारचा प्रचार हा एकमेकांशी साम्यच दाखवतो कारण क्लिओपात्रा ही डायोनिससची वंशज होती. टॉलेमी घराण्याचा तो वैचारिक दृष्टया पूर्वज होता आणि विशेषत: इजिप्शियन राजघराण्याचा हितचिंतक होता. इ. स. पूर्व तिसऱ्या शतकात दुसरा टॉलेमी फिलाडेल्फस यांने एक चतुर्वर्षीय सोहळा सुरू केला. त्याचं नाव होतं– 'टॉलेमया' डायोनिससची एवढी मोठी प्रतिमा या मिरवणुकीत होती की ती उचलायला ऐंशी माणसांची गरज होती. या पाठोपाठ परदेशांतील प्राणी होते. त्यानंतर 'टॅब्लोज' सादर केले जात होते त्या नाट्यपूर्ण प्रवेशांमध्ये जगज्जेता ईश्वर सर्व प्राणीमात्रांचा स्वामी असून त्याच्या लीला दाखवलेल्या असत. चौथ्या टॉलेमीने तर डायोनिससची मुद्रा आयव्ही (Ivy– चमकदार पानांचा वेल) या वेलाचे पान असणारी– आपल्या शरीरावर गोंदावून घेतली होती.

क्लिओपात्राच्या वडिलांनी– ऑलेटिस टॉलेमीने आपणासाठी 'नव डायोनिसस' असे नावच धारण केले होते. ग्रीक राज्यकर्तांनी स्वत: अशाप्रकारे देवावर हक्क सांगितला होता.

इजिप्शियनांना हा हक्क सांगणं पटणारंही होतं; कारण डायोनिसिस आणि ओसिरीस यांच्यात खूपच साम्य होतं. या दोन्ही देवतांनी खूप प्रवास केला होता, नागरी संस्कृतीचे फायदे जनतेला मिळवून दिले होते आणि शेतीत सुधारणा केल्या होत्या. दोन्ही दैवतांचं लैंगिक जीवन संशयास्पद होतं. ओसिरीसला उद्देशून रचलेल्या एका इजिप्शियन स्तोत्रात म्हटलं होतं की– "हे देवा, तू मानवींचा पिता व माताही आहेस." काही ठिकाणी अशा

खुणा सापडतात की ज्यात डायोनिसिसला नियोग पद्धतीने संतती झाली असे म्हटले आहे. वंशवृद्धिसाठी त्याला प्रत्यक्ष स्त्रीची गरज नव्हती असे त्यांचे म्हणणे होते. ओसिरीस आणि डायोनिसिस दोघांचेही शत्रूने अगदी तुकडेतुकडे केले होते डायोनिसिस जेव्हा लहान मुलगा होता. तेव्हा टायटन्सने त्याचे सात तुकडे केले होते. ओसिरीसला त्याच्या भावाने-सेठने मारले होते. दोघांनाही पुन: भूदेवतांनी जिवंत केले. डिमेटर हिने डायोनिसिसचे शरीर जोडले आणि त्याला जिवंत केले आणि इसीसने ओसिरीसला तसेच जिवंत केले. दोघांनाही मेल्यावर मोक्ष मिळाला. डायोडोरस सिकलस हा तर स्पष्टपणे म्हणतो की, "ओसिरीसचं भाषांतर म्हणजे डायोनिसिस !" प्लुटार्कनेही अनेक ग्रीक लेखकांचा हवाला देऊन ही गोष्ट मान्य केली आहे. इ. स. च्या दुसऱ्या शतकापर्यंत या दोन देवतांच्या एकत्रीकरण पूर्ण झालं होतं. त्या काळातल्या लेखकांनी ओसिरीसचे पुजारी आयव्हीच्या पानांच्या माळा घालत असे वर्णन केले आहे.

नवडायोनिसिसच्या भूमिकेत अशा प्रकारे अॅन्थनीने स्वत:ची प्रतिमा तयार करण्याचा प्रयत्न केला कारण टॉलेमी घराण्याचाही तो देव होता. क्लिओपात्रानेही त्याला हरकत घेतली नाही. उलट अॅन्थनीच्या या सार्वजनिक प्रतिमेला तिने पुष्टीच दिली. राजकीय धार्मिक हेतू मनात ठेवून ती जो प्रचार करीत होती, ज्या कथा प्रसृत करीत होती त्या साऱ्यासाठी हे सर्व पोषकच होतं. सिडनस इथे तिने जे सारं वैभवदर्शन घडवलं होतं. त्याला अॅन्थनीचं वागणं अनुकूल ठरत होते. अॅन्थनी हा जर आशिया खंडाचा जेता असा डायोनिसिस / ओसिरीस असेल तर मग ती देखील इसीस / अॅफ्रोडाइट नव्हती का? तीही त्याची समान दर्जाची सहकारी, त्याची बहीण, त्याची बायको होती.

आपल्या नौकेतील सिंहासनावर बसलेली तेजस्वी क्लिओपात्रा लोकांच्या मनात रुतून बसली ती दोन हजार वर्षे ! पण त्यामागचा अर्थ मात्र विसरला गेला. वास्तवात सिडनसच्या भेटीमागे विषयवासनेचं वा आर्थिक प्रदर्शन करण्याचं प्रयोजनच नव्हतं. अतिशय नियोजनबद्ध असा हा देखावा होता. त्याला प्रतिकात्मक, धार्मिक महत्त्व नावापुरते होते. स्वत:च्या फायद्याच्या गोष्टी तिने त्यामध्ये अतिशय व्यवस्थित रितीने, सूक्ष्मपणे गुंफलेल्या होत्या. वरवर पाहता मोह पाडणारी एक स्त्री एवढेच तिचे रूप नव्हते तर या सगळ्या डामडौलाच्या खेळाची सूत्रधार होती. हवी तर उपभोगावी किंवा फेकून द्यावी अशी स्त्री ही तिची भूमिका नव्हती. अॅन्थनीचं भविष्य उज्ज्वल भविष्य घडवण्याचं सामर्थ्य आपल्या हातात आहे याची जाणीव तिने त्याला त्या प्रदर्शनाद्वारे करून दिली होती. ती स्वत: अॅफ्रोडाइट होती आणि त्याला वाटलं तर आशियाखंडाच्या कल्याणकारी योजनेत तो तिच्या बरोबर भाग घेऊ शकत होता. पौर्वात्य जगावर वर्चस्व मिळवण्यात तो वाटेकरी होऊ शकत होता. जन्म-मृत्यूचा नियंत्रक जगन्नियता डायोनिसिस ह्याचा प्रतिनिधी म्हणून तो स्वत:ची नियुक्ती करून घेऊ शकत होता.



अनुक्रमणिका

पूर्वेकडील देशांनासुद्धा असा कुणीतरी राज्यकर्ता हवाच होता. भूमध्यसमुद्राच्या पूर्वेकडील हेलोनिस्टिक लोक ही रोमची प्रजा होती पण ते असंतुष्ट होते. त्यांना कुणीतरी मुक्तीदाता हवा होता. डायोनिसिस, इसीस, ओसिरीस या देवता त्यांना आपल्याशा वाटत होत्या. इ. स. पूर्व दुसऱ्या शतकात डायोनिसिसच्या भक्त गणांमध्ये जी मोठ्या प्रमाणावर वाढ झाली तिचे वर्णन 'डायोनिसिसच्या पंथाची साथीच्या रोगासारखी लागण झाली असेच केले जाते. त्यांचे उत्सव म्हणजे भ्रष्टाचाराचे कारखाने असे लिव्ही हा इतिहासतज्ज्ञ म्हणतो. स्त्रीपुरुषांचे एकत्र येणे, अंधाराचा फायदा घेणे सर्रास चालू होते. कुठलाही गुन्हा करणं शिल्लक ठेवलं नव्हतं, कोणतीही अनैतिक गोष्ट त्यांना वर्ज्य नव्हती. पण लिव्हीने तेथल्या परराष्ट्रखात्याच्या वकीलाचे भाषण नोंदवले आहे. त्या भाषणात या साऱ्या प्रकारची नाराजी तीव्रपणे व्यक्त केली आहे. रोजच्यारोज गुन्ह्यांच्या संख्येत वाढ होत होती आणि ही प्रवृत्ती फैलावत होती ! राज्याच्या नियंत्रणासाठी या लोकांना शिक्षा करायला हवी असे त्याचे म्हणणे होते. डायोनिसिसच्या संप्रदायातल्या सात हजार भक्तांना या गुन्ह्यांसाठी शिक्षा झाली आणि काहींना फाशी दिले गेले. याप्रकारच्या कडक उपाययोजने विरुद्ध लोक तक्रार करतील म्हणून तो वकील म्हणतो, "तुम्ही असं वागावं, विनाकारण एकत्र यावं अशी तुमच्या पूर्वजांची मुळीच इच्छा नव्हती.

रोममधील डायोनिसिसच्या भक्तामध्ये, इसीसच्या भक्तांप्रमाणे स्त्रियांची संख्या अधिक होती. लिव्हीच्या म्हणण्याप्रमाणे आरंभी या कर्मकांडातून पुरुषांना वगळलेच होते नंतर ज्या पुरुषांना त्यात घेण्यात आले त्यात ग्रीक, आशियाई होते तसेच गुलाम किंवा पूर्वी गुलाम असलेले लोक होते. (लिव्ही म्हणतो की, या भक्तांमध्ये उच्च दर्जाचे लोकही होते) रोममध्ये पौर्वात्य देवांची भक्ती करण्याची पद्धत ही बहुधा विरोधातूनच आली असावी. रोममधील गावांमध्ये जन्मलेल्या पुरुषांनाच प्रथम दर्जाचं नागरिकत्व दिलं जाई. सरकारच्या या धोरणामुळे इतरांना असुरक्षित वाटे आणि आपल्याला कनिष्ठ दर्जाची वागणूक दिली जाते असं वाटे. त्यांच्या या भावनांना कुठेतरी वाट मिळायला हवी होती ती या देवांच्या भक्तीमध्ये त्यांना मिळाली असावी. भूमध्यसमुद्राच्या पूर्वेकडील भागात या दैवतांना अधिकच वाव मिळाला. तेथील लोकांच्या भक्तीमागे राजकीय आणि धार्मिक असे दोन्ही हेतू एकत्र झाले होतेच, याशिवाय बंडखोरीचा उत्साह होता. स्वत:ला रोमपासून अलग करून घेण्याची ज्यांची इच्छा होती त्यांनी हे आयतेच निमित्त होते.

याविरुद्ध चालणारी कुरकुर किंवा विरोध हा छुपा होता. त्याचे काही अवशेष बाकी राहिले. त्यात त्यांच्या साहित्याचा भाग होता त्यात त्यांची वचने, काही भाकिते आदर्श भिन्न इच्छांचे आविष्कार असे दिसून येतात. तसेच भविष्यकालीन चित्रेही दिसतात. 'मॅड प्रिएटर'चे भाकित इ. स. पूर्व १०० मध्ये लिहल गेल होत त्यात असं म्हटलं होतं की, रोमवर मात करण्यासाठी सूर्योदयातून एक सैन्य येईल. (म्हणजेच सूर्यापासून सैन्य निघेल) नंतरच्याही





अनुक्रमणिका

एका भाकितात साधारण अशाच प्रकारचा अंदाज वर्तवला होता. एका पर्शियन साधूशी या भाकिताचा संबंध जोडला जातो. या भाकिताचा वाचनावर रोममध्ये बंदी घातली गेली होती : 'सिबिलियन बुक्स' नावाच्या संग्रहात अशा प्रकारची अनेक भाकिते एकत्र केलेली दिसतात. यामध्ये धर्मगुरूंचे उपदेश आहेत. विविध प्रसंगी 'अंगात आलेल्या' व्यक्तींनी दिलेल्या कौलवजा सूचना एकत्र केल्या आहेत. त्यांचा उगम मूळ सिरियात आणि हेलोनिस्टिक पूर्वेत झाला आणि मग मोठ्या प्रमाणावर प्रसार झाला. रोममध्ये या सगळ्या गोष्टी पारखून शुद्ध करून, गाळून घेतल्या गेल्या. यामध्ये इतरांबरोबर ऑक्टेव्हियस होता. हा जो सगळा लेखनाचा पुरावा सापडला त्याचा निश्चित काळ जसा सांगता येत नाही तसाच लेखकही सांगता येत नाही. पण वेगवेगळ्या ठिकाणांहून एकत्र केलेल्या या गोष्टी आहेत. तत्कालिन लोकांबद्दल, राजकारणाबद्दल एरवी काहीच माहिती मिळत नसताना ही जी माहिती मिळते ती त्या काळावर थोडा तरी प्रकाश टाकू शकते. रोमच्या राज्यकारभारामुळे निर्माण झालेला संताप त्यातून व्यक्त होता दिसतो:-

"रोमला आता जरी मिळाला
आशिया रूपी नजराणा,
तरी आशिया परत मिळवेल
रोमकडून तिप्पट भेटी
आणि रोमच्या असंस्कृत औद्धत्याची
करेल सव्याज फेड."

या अशा प्रकारच्या पद्य ओळीत असंही भाकित वर्तवलेलं असे की, आशिया खंडाची सुटका करून बदला घेण्यासाठी एक स्त्री पुढे येईल. "हे रोमच्या नाजूक, सोनेरी कुमारी, अनेक दु:खी लोकांबरोबर झालेल्या तुझ्या विवाहसोहळ्यात धुंद होऊन एक स्वामिनी तुझ्या शृखंला पुन: पुन: तोडेल आणि तीच न्याय करेल आणि तुला स्वर्गातून पृथ्वीवर आणेल."

या सर्वांचा संदर्भ क्लिओपात्राशी आहे. "नाईलच्या आजूबाजूच्या सर्व प्रदेशाची ती राणी असेल." यापैकी काही ओळी तर थेट तिला दृष्टीसमोर ठेवूनच रचलेल्या आहेत. 'ज्यावेळी इजिप्तच्या विजयाबाबतीत' रोम नाराज असेल, चालढकल करेल 'तेव्हा, त्या अमर्त्य राजाची ती शक्तिमान राणी साऱ्या पुरुषांमधून पुढे येईल. तिघेजण रोमची दयनीय अवस्था करतील.' तो पवित्र देव, साऱ्या पृथ्वीचा राजदंड हाती घेऊन युगानुयुगे राज्य करील.

अशा प्रकारच्या कितीतरी ओळी ह्या भाकित वर्तवणाऱ्या साहित्याशी संबंधित आहेत हे स्पष्टपणे कळतं. त्यातल्या बऱ्याच ओळी नंतर बायबलच्या नव्या व जुन्या करारात समाविष्ट झाल्या आहेत असं लक्षात येतं. रोमन सत्तेखाली दबलेले ज्यू अशा एका प्रेषिताची, राष्ट्रीय नेत्याची वाट पाहात होते की, जो ज्यूंचा राजा असेल आणि देवपुत्र असेल. अशा प्रकारे

सिबिलियन बुक्स मधून एका महान नेत्याबद्दल मुक्तिदात्याबद्दल कल्पनारम्य वर्णन आढळतात. या अशा सर्वसामान्य वर्णनांमधून देखील काही नेमके ऐतिहासिक तपशील हाती लागतात. रोममधील त्रिकूट, इजिप्शियन राणी अशी वास्तव परिस्थिती इथे वर्णिलेली दिसते. क्लिओपात्राच्या कारकीर्दीत अशा प्रकारची भाकितं वर्तवली गेली असावीत. 'क्लिओपात्रा ही अशी गूढ स्त्री आहे की जी जगाचा उद्धार करेल आणि पृथ्वीवर सुवर्णयुग आणेल' हे लोकांच्या मनावर ठसवण्यासाठी ह्या रचना झाल्या असाव्यात. "आणि नंतर हे संपूर्ण जग एका स्त्रीच्या ताब्यात असेल. ती राज्य करेल आणि तिचीच सत्ता सर्वत्र चालेल. ती विधवा स्त्री राणी बनून साऱ्या जगावर राज्य करेल."

खरोखरीच ज्यावेळी क्लिओपात्रा सिडनसला आली त्यावेळी तिचे पती / भाऊ आधीच मृत्यू पावलेले होते. तत्कालिन प्रथा जरी पुनर्विवाहाची होती तरी तिने पुनर्विवाह केला नव्हता. ती 'विधवा' होती, आणि 'आशियाची आशा' होती, मुक्तिदायिनी होती. तार्ससमधील तिचा दिमाखदार प्रवेश म्हणजे खेळासारखा असेल पण तो गंभीर आणि स्मरणीय होता. तिने काही ॲन्थनीला आपल्या या खेळात, वेशभूषेत सामील होण्याचे निमंत्रण दिले नव्हते. ती असं सुचवू पाहात होती की, ती जशी 'विधवा' आहे, शक्तीशाली राणी आहे तसा तो त्या 'पवित्र ईश्वराची', 'अमर्त्य राजाची' भूमिका करू शकतो आणि जगावर राज्य करण्यासाठी तिचा साथीदार बनू शकतो.

आता ॲन्थनी हा नवा डायोनिसिस होता आणि क्लिओपात्रा त्याची सहचरी इसीस किंवा ॲफ्रोडाइट होती. दरम्यान ऑक्टेव्हियस स्वत:ला अपोलो म्हणवून घेत होताच. दंतकथा सांगतात की, तो अपोलोच्या आश्रयाखाली होता. काही कथांनुसार तो अपोलोचं रूप होता. पण ज्यूलियस सीझरचं लक्ष त्याच्याकडे जावं म्हणून ऑक्टेव्हियसच्या आईवडिलांनी रचलेल्या या कथा असण्याची शक्यता आहे. स्यूटोनियस एक दंतकथा पुन्हा सांगतो– अतिया (ऑगस्टसची आई) एकदा मध्यरात्रीच्या प्रार्थनेसाठी अपोलोच्या देवळात गेली. तिथे तिने आपली पालखी खाली ठेवली आणि ती तिथेच इतरांप्रमाणेच झोपी गेली. अचानक एक साप तिच्या अंगावर चढला, तिच्या वस्त्रात शिरला आणि तसाच खाली उतरून गेला. जेव्हा ती जागी झाली तेव्हा तिच्या शरीरावर सर्पाकृतीचं गोंदण आढळलं. त्यानंतर नऊ महिन्यांनी ऑगस्टसचा जन्म झाला. यावरून त्याचा पिता दैवी असावा असं मानलं जातं. त्याचप्रमाणे ऑक्टेव्हियसच्या वडिलांना एक स्वप्न पडलं होतं. त्या स्वप्नात त्यांना अतियाच्या मांड्यांमधून सूर्योदय होताना दिसला. याचा अर्थ ती सूर्यदेवतेच्या अवताराला जन्म देणार. आपल्या आईवडिलांकडून अशा धर्तीची गोष्ट जेव्हा मोठेपणी ऑक्टेव्हियसने ऐकली तेव्हा त्याने रोममध्ये अपोलोच्या मूर्तीची स्थापना केली आणि पॅलेटिन हिलवर त्याचं एक देऊळ बांधले. असं सांगतात की, ॲन्थनीप्रमाणे तोही सार्वजनिक ठिकाणी आपल्या आवडत्या दैवताच्या वेषात येई. अशा प्रकारची वर्णनंही काही पद्यरचनांमध्ये आढळतात.





अनुक्रमणिका

ॲक्टियम येथील लढाईत मिळालेल्या विजयानंतर ऑक्टेव्हियसने तेथील एका टेकडीवर अपोलोचं देऊळ बांधलं आणि लढाईच्या वेळी त्याचा स्वत:चा तंबू जिथे होता तिथे एक कळसासारखा स्तंभ अपोलोच्या नावाने उभारला. या लढाईची वर्णनं करणारे जे भाट, चारण होते त्यांनी ही त्याचं नाव वारंवार या दैवी रक्षकाच्या नावाशी जोडलं जाईल याची काळजी घेतली होती. प्रॉपेर्शियस म्हणतो, "आता अपोलो सांगेल की ही रेघ (लढाईसंदर्भात) कशी वळते" यासारखे उल्लेख यात आढळतात. व्हर्जिल लिहितो–

ॲक्टियन अपोलोने
आपले धनुष्य ताणले
त्याचा आविर्भाव भीतिदायक होता.
त्याच्या त्या आविष्काराने
सगळे भारतीय, अरब,
सेबियन्स, इजिप्शियन्स पळून गेले.

लढाईतील यशानंतर रोमला परतलेला विजयी ऑक्टेव्हियस साऱ्या देशांकडून नजराणे स्वीकारत होता आणि त्यावेळी तो अपोलोच्या पांढऱ्याशुभ्र गादीवर बसला होता अशी वर्णने आढळतात. रोमन लोक जाहीरपणे क्लिओपात्रा व ॲन्थनीची टर उडवत कारण ती दोघे स्वत:ला इसीस आणि ओसिरीस म्हणवून घेत असत. पण रोमचा प्रतिनिधी असणारा ऑक्टेव्हियस हादेखील या बाबतीत त्यांच्यापेक्षा काही कमी नव्हता. आपल्यावर दैवी वरदहस्त आहे. तोही सारखे सांगत फिरे.

एका बाजूला ऑक्टेव्हियस / अपोलो म्हणजे उजेडाचा, बौद्धिक समजूतदार जाणीवेचा देव आणि दुसऱ्या बाजूला क्लिओपात्रा आणि तिचा साथीदार ॲन्थनी डायोनिसिस / इसीस यांच्या रूपात हे दोन्ही देव वैपुल्याचे, सुखसमृद्धीचे, भाजीपाल्याचे, शेतीचे देव ! या दोन्ही दैवतांमधून विरोध म्हणजे ॲन्थनीचा ऑक्टेव्हियस यांच्या संघर्षाचा अन्वय ! आरंभी दोघांनी त्याला पुष्टी दिली पण नंतरच्या हकिकतींमधून मात्र तो भाग वगळला गेलेला दिसतो. ॲन्थनींच्या दैवतीकरणाची टर उडवताना, त्याला हीन लेखताना तत्कालिन लोकांनी या गोष्टीचा जाताजाता उल्लेख केला आहे. ख्रिस्ती कालगणना सुरू झाल्यावर हे सर्व विसरले गेले. मध्ययुगीन काळात ग्रीस व रोम येथील दैवतकथांचा अर्थ लावताना इतका भोंगळपणा झाला की सर लँसीलॉट, हर्क्युलिस आणि ज्यूलियस सीझर या साऱ्यांची 'पूर्वीचे उमराव' एवढ्या शब्दांमध्ये बोळवण झाली, एवढ्याच शब्दांमध्ये त्यांचा निर्देश होऊ लागला. ते सारं अर्थातच निरर्थक होतं. पुढे प्रबोधनकाळात (रेनेसान्स पिरीयड) सुद्धा यात काही सुधारणा केली गेली नाही. शेक्सपियरने हे क्षण नाट्यात पकडताना म्हटले, 'तो हर्क्युलिस होता. ईश्वराचा अवतार. त्याच्यावर ॲन्थनीचं प्रेम होतं.' डायोनिसिस ॲन्थनीला सोडून जाण्याच्या

त्या क्षणाचं नाटकीकरण करताना या देवाचं नाव बदलून टाकलं.

त्यानंतर अगदी अलिकडे ज्यावेळी मानसशास्त्राच्या आधारे प्राचीन दैवतकथांचा सूक्ष्म अभ्यास होऊ लागला, नीत्शेने डायोनिसिस आणि अपोलो या दैवतांबद्दलच्या समजुतींचं सविस्तर मानसशास्त्रीय विश्लेषण केलं त्यावेळी बौद्धिक क्षेत्रात या गोष्टींची पुन: नव्याने चर्चा होऊ लागली. दैवतशास्त्राचे अभ्यासक आणि पुरातत्त्वशास्त्रज्ञ यांनी नीत्शेच्या म्हणण्याला पुरावा सादर केला. या दैवतकथांमध्ये काही अर्थ आहे असं तेव्हा जाणवू लागलं. पण अजून देखील क्लिओपात्रा, ऑक्टेव्हियस आणि ॲन्थनी यांच्या कथेचा पूर्ण उपयोग, पूर्ण विश्लेषण झालं आहे असं म्हणता येणार नाही.

मृत्यूच्या अपरिहार्यतेकडे जाण्याचे दोन मार्ग नीत्शेने सांगितले. व्यक्तीचा विकास हा सौंदर्यातून, सुसंगतीतून करणारा अपोलोचा मार्ग हा एक मार्ग ! अपोलोनियन वृत्तीची व्यक्ती शिस्तीने, आत्मविकासाने अंतिमध्येयाकडे जाते. आपल्या व्यक्तीत्वाची जी बाजू शरीराधीन नही, जी वैषयिक सुखासाठी आसुसलेली नाही, किंवा जी आपल्याला पशूच्या पातळीवर नेत नाही अशी बाजू म्हणजेच आत्मिक बाजू विकसित करण्याकडे या माणसांची प्रवृत्ती असते. शरीरापलिकडे, देहोपभोगापलिकडे जाण्याचा त्याचा प्रयत्न असतो. डायेनिशियन लोकांची वृत्ती याच्या विरुद्ध असते. 'स्व'चा त्याग करण्याची त्यांची वृत्ती असते. स्वत:च्या व्यक्तीनिष्ठ, ऐहिक केंद्राकडून इतरांच्यात मिसळण्याचे काम ते करतात असा मुक्त माणूस मृत्यूची अपरिहार्यता स्वीकारतो आणि इतर प्राणीमात्रांच्या, चराचराच्या अंशात आपला अंश मिसळणार आहे अशी त्याची खात्री असते. पिढ्यानपिढ्या चालत आलेल्य जीवनचक्राचा आपण एक भाग आहोत आणि आपण त्यातच मिसळले जाणार आहोत याची त्याला जाणीव असते.

क्लिओपात्रा आणि ॲन्थनीला या सर्व गोष्टींच कितपत आकलन झालं होतं याची आपण केवळ कल्पनाच करू शकतो. पण एवढं मात्र खरं की त्यांच सहजीवन म्हणजे डायोनिशियन वृत्तीचा उदात्त असा नमुना होता. त्यांनी तो प्रदर्शनीय करून लोकांपुढे मांडला होता. अथेनियस हा लेखक म्हणतो, "अथेन्समध्ये ॲन्थनी पाहुण्यांना एका कृत्रिम गुहेत घेऊन जाई, त्यांना हिरवे गुच्छ देई. डायोनिशियन वृत्तीची दैवताची प्रतीकं असणारी, त्याला प्रिय अशी पानेफुले तो त्या स्वरूपात मांडून ठेवी आणि आलेल्या पाहुण्यांचं स्वागत करी. "इ. स. पूर्व ३४ मध्ये आर्मेनियावर विजय मिळवून त्याने तेथील राजाला कैद करून अलेक्झांड्रिया येथे आणले. शहरात प्रवेश करताना त्याने मोठा थाटमाट केला होता. या समारंभाचा ऑक्टेव्हियसने मात्र गैर अर्थ लावला होता. रोमन विजय साजरा करून तो रोमची उपेक्षा करतोच असं त्याला वाटलं. आपल्या पवित्र पद्धती परदेशी राजधानीत वापरल्या जाव्यात. हे त्याला पसंत पडलं नव्हतं. वेलियस पॅटरक्युलस याने मात्र हा प्रसंग सविस्तर



अनुक्रमणिका

वर्णन केला आहे. तो म्हणतो, "आपल्याला नवीन लिबर पॅटर (डायोनिसिसचं एक लॅटिन नाव) म्हणावं अशी त्याने आज्ञा केली. 'आयव्ही' वेलाची पाने अंगावर घालून फरचा गुच्छ हातात घेऊन, सोनेरी मुकुट धारण करून बाकस सारख्या रथातून त्याने राजधानीत प्रवेश केला. हा काही रोमन विजयाचा नमुना नव्हता. डायोनिशियन मिरवणुकीचा तो प्रकार होता. टॉलेमीच्या उत्सवांपासून अलेक्झांड्रियाच्या लोकाना तो परिचित होता. आपल्या दैवताप्रमाणे विजयी ॲन्थनी पूर्वेकडून आला होता. आणि त्याचे स्वागत करण्यास त्याची बहिण उर्फ पत्नी, क्लिओपात्रा उर्फ इसीस उर्फ ॲफ्रोडाइट हजर होती.

ॲन्थनीच्या आयुष्याच्या अखेरीस मात्र त्याचं हे दैवत त्याला सोडून गेलेलं दिसतं त्याचा अंतिम पराभव आणि मृत्यू ज्या दिवशी झाला त्याचं वर्णन प्लुटार्कने केले आहे. अलेक्झांड्रियाच्या अगदी बाहेरच्या बाजूस ऑक्टेव्हियसचं सैन्य तळ ठोकून होतं. महालामध्ये ॲन्थनीचे सेवक रडत होते. त्याने त्यांना सांगितलं होतं की, "दुसऱ्या दिवशी तुम्ही माझ्यासाठी वाट पाहात असाल की दुसऱ्या मालकाची सेवा करीत असाल हे कुणीच सांगू शकत नाही." तो स्वतः तर मृत्यू पावला असेल. त्याच्या मृत शरीराशिवाय त्याचं काहीच उरलेलं नसेल. "त्या भयानक रात्री, मध्यरात्रीच्या सुमारास सर्वत्र सामसूम असताना, भीती आणि नैराश्य यांची छाया साऱ्या शहरावर पडलेली असताना, अचानक मधुर संगीत ऐकू आलं. त्या संगीताच्या तुकड्यात सर्व प्रकारची वाद्य वाजवलेली असावीत. सुरात गाणारे आवाज येऊ लागले. त्याचवेळी लोकांचे मद्यदेवता बॅकन्सचं रडणं आणि जखमींचं विव्हळणं त्यात मिसळलं गेलं. जणू काही मौजमजा करणाऱ्यांचा घोळका शहर सोडून जातो आहे आणि जाताना हल्लागुल्ला, शोर करतो आहे."

ऑक्टेव्हियसची छावणी जिथे होती त्या दिशेने हे सारे आवाज जात असलेले ऐकू आले. या घटनेचा अर्थ काढू पाहणाऱ्यांनी असा निष्कर्ष काढला की, ॲन्थनीने ज्याची भक्ती केली, ज्याच्याशी मैत्री केली, ज्याचं अनुकरण करण्याचा त्याने प्रयत्न केला तो डायोनिसिस त्याला सोडून जात आहे.

त्याआधी ट्रॉय शहरातील सर्व देवांनी आपापल्या धर्मवेदींचा आणि देवळांचा त्याग आधीच्या रात्रीच केला होता. अथेन्स आणि जेरूसलेम या शहरांवरील आपलं कृपाछत्र या देवतांनी काढून घेतलं होतं. डोमिशियन राजाचा वध होण्याआधीच्या रात्री मिनर्व्हा देवतेने त्याच्या स्वप्नात येऊन त्याला सूचना दिली होती की त्याच्यावरची कृपादृष्टी तिने आता दूर केली आहे. जो हारतो त्याला सोडून जाण्याची उंदरांची सवय असते. हे अभिजात देवही तसेच वागले. ॲन्थनीचा दैवी अंश असण्याचा अभिमान, क्लिओपात्राच्या वंशाचा रक्षणकर्ता डायोनिसिस त्यांना सोडून गेला ह्या गोष्टीची निर्मिती दोन प्रकारे झाली असावी. ऑक्टेव्हियस नेहमी म्हणत असे की देव आणि दैव त्याच्या बाजूला आहे. त्याच्या या म्हणण्यानुसार, त्याच्या समर्थकांनी या गोष्टीची निर्मिती केली असावी किंवा ॲन्थनीच्या मित्रांना शोकाकुल

अवस्थेत असं वाटलं असावं की, त्याचे ग्रह फिरले, दैवाची त्याला साथ नाही म्हणून तो पराभूत झाला. म्हणजे मित्र आणि विरोधक यांनी वेगवेगळ्या हेतूंनी या कथेची निर्मिती केली असावी. आशियाखंडाच्या भल्यासाठी ॲफ्रोडाइट आणि डायोनिसिस कसे काम करीत होते त्या दिवसांची त्या मित्रांना आठवण होत असावी. गोष्टीचा प्रथम उगम कुणाकडूनही झालेला असे, या गोष्टीतून एक बाब स्पष्ट होते की, डायोनिसिस आणि ॲन्थनी यांच्यात साहचर्य होतं आणि क्लिओपात्राच्या जोडीनं त्यांनी एक मोठं काम हाती घेतलं होतं.

ऑक्टेव्हियसने क्लिओपात्रा व ॲन्थनीबद्दलचा कितीही वेडावाकडा प्रचार केला असला तरी त्यातून डायोनिशियन घटक स्पष्ट होतो. क्लिओपात्रा आणि ॲन्थनी हे दारूडे होते असा समज करून देण्यासाठी रोमन लेखकांनी आपली लेखणी झिजवली. ऑक्टेव्हियसने तिचा ॲक्टियन येथे पराभव केला तेव्हा होरेस नावाच्या कवीने केलेल्या काव्यातही तिच्या मद्यप्राशनाचे उल्लेख आहेत. हे सगळे निर्देश उबगवाणे होते; त्रासदायक होते. या सगळयामुळे त्रासून ॲन्थनीने साऱ्या आरोपांचे खंडन करणारे पत्रकच काढले. त्यांच्याविरुद्धचे उथळपट्टीचे आरोपदेखील असेच मुद्दाम केलेले असावेत. प्लुटार्क लिहितो – "ॲन्थनी आणि क्लिओपात्रा यांच्याभोवती एक मित्रमंडळ होते. त्याला ते 'इनिमिटेबल लिव्हर्स' (अलौकिक व्यक्ती) असं म्हणत. प्रत्येक दिवशी पाळीपाळीने एकेकजण मोठ्या थाटामाटात सर्वांना मेजवान्या देई." आधुनिक संशोधक असं म्हणतात की, हे मित्रमंडळ म्हणजे डायोनिसिसच्या भक्तांचं मंडळ असावं आणि त्यांच्या मेजवान्या म्हणजे वैयक्तिक मौजमजा करण्याची ठिकाणं नसून तिथे काही पवित्र समारंभ केले जात असावेत. क्लिओपात्राच्या बोटात अमेथिस्ट या जांभळ्या रंगाच्या खड्याची अंगठी असे. त्यावर मद्यदेवतेची आकृती कोरलेली होती. अमेथिस्ट खड्याचं वैशिष्ट्य असं सांगितलं जाई की, यामुळे मद्याची धुंदी चढत नाही. तिच्या हातात ती अंगठी असणं याचा अर्थ मद्यदेवताही तिच्या ताब्यात होती. यातील गमतीचा विरोधाभास असा की, कालांतराने गूढविद्येतील Sobria Ebrietas ही संकल्पना यावरून आली. ध्यानावस्था ही संकल्पनेची मूर्त स्थिती, ज्याच्या योगे बॅकनो (मद्यधुंद लोक) शहाणपणा, गांभीर्य, समतोलता प्राप्त करू शकत. डायोनिसिसच्या कर्मकांडात मद्याची धुंदी, कैफ आनंदाचा प्रसंग साजरा करण्यासाठी असावा हे म्हटले होते, त्याचप्रमाणे आध्यात्मिक भावावस्थेत स्वत:ची जाणीव विरघळून जावी यासाठी मद्य घ्यावे असेही म्हटले होत क्लिओपात्राच्या मेजवान्यांच्या दंतकथांमध्ये हा धार्मिक भाग आहे आणि मद्यदेवतेच्या भक्तांच्या कर्मकांडांच्या स्मृती देखील आहेत.

क्लिओपात्राला रोमन लोक नेहमी टोमणे मारीत की तिने ॲन्थनीला पुरुषत्वहीन दुर्बळ करून टाकले. या आरोपाचा, टोमण्याचा संबंधदेखील डायोनिस्टिक वैशिष्ट्यांशी जोडता येतो कारण डायोनिसिसचं लैंगिक चारित्र्य संशयास्पदच होतं. त्याचं प्रतिनिधित्व एका युगुलाने करावे, त्यातली स्त्री क्लिओपात्रा, आपल्या साथीदाराएवढीच कर्तबगार, प्रभावशाली असावी



अनुक्रमणिका

हे ही योग्यच होतं. ग्रीक देवतांमध्ये सहसा न आढळणारं आणखी एक वैशिष्ट्य त्याच्याजवळ होतं. त्याला नेहमी पायघोळ झगा घातलेला दाखवला जातो. त्याच्या सेवकांची जी चित्रं आहेत त्यावरून त्यांच्या पुरुषत्वाची खूण लक्षात आली तरी डायोनिसिसची स्वत:ची लिंगनिश्चिती जरा घोटाळ्याची होती. दंतकथांनुसार त्याचं पालनपोषण स्त्रियांनी, नायम्फ्सनी केलं. त्याला त्या गुहेत लपवून ठेवत. त्याचं पोषण मधावर झालं. या सगळ्या स्त्रीराज्यात वाढल्याने तो बायकी झाला. तो बरेचदा स्त्रियांसारखा पोषाख करी. नंतरच्या आयुष्यात त्याने जगप्रवास केला असला तरी तिथे त्याच्या सोबतिणी सर्व स्त्रियाच होत्या. त्या त्याच्याबरोबर लपाछपी खेळत. डोंगरकड्यांवर जात, गात, नाचत, मौजमजा करीत. डायोनिसिस जसा स्त्रियांमध्ये प्रसिद्ध होता. तसाच त्याचा संप्रदायही स्त्रियांमध्ये प्रसिद्ध होता. ऑक्टेव्हियस ज्यावेळी अलेक्झांड्रिया हा नामर्द माणसांचा देश आहे असा आरोप करतो त्यावेळी त्याच्या मनात हा विचार असावा. डायोनिसिस दैवताचं स्त्रीप्रेम, या दैवताचा बायकीपणा त्याला अभिप्रेत, व हिजड्यांनी वेढलेला ॲन्थनी असं तो वर्णन करतो. या बोचरेपणातून डायोनिसिसच्या या अशा बायकी संप्रदायावर त्याला बोट ठेवायचे असावे. ॲन्थनीचा त्या देवतेशी संबंध असल्याने त्याने ॲन्थनीवरही असेच आरोप केले.

डायोनिसिसच्या संदिग्ध आकृतीत लिंगभिन्नत्व जसे लयाला गेल्यासारखे भासत असे. त्याचप्रमाणे सर्व व्यवस्था, त्यातली उतरंडदेखील लयाला गेल्यासारखे वाटे. डायोनिशियन लोक उन्मादामधून संपूर्ण आयुष्यातली सुसंगती शोधायचा प्रयत्न करीत आणि त्या प्रयत्नात चांगल्या, सुसंगत गोष्टींचा नाश होई, नाश करण्याची इतरांना धमकी देत. त्याचप्रमाणे त्यांनी इतर राजकीय व सामाजिक व्यवस्थाही मोडीत काढायचा प्रयत्न केला. नीत्शे म्हणतो, "समाज आणि राज्य, किंवा सर्वसामान्यपणे व्यक्ती आणि व्यक्ती, यांच्यामधील दऱ्या त्यांना नाहीशा करायच्या होत्या. एकत्रीकरणाची संकल्पना मनात ठेवून परत आपण निसर्गाकडे जावे, नैसर्गिक अवस्थांवर भर द्यावा असे त्यांना वाटे." (निसर्गात श्रेष्ठ कनिष्ठ भाव, व्यवस्था, त्यातील उतरंड हे प्रकार नसतात असे त्यांना वाटत असावे)

डायोनिसिसच्या भक्तगणांच्या ह्या अराजक माजवणाऱ्या दृष्टिकोनावरही ऑक्टेव्हियसच्या समर्थकांनी जोरदार हल्ला केला. ॲन्थनीने आपल्या सर्व जबाबदाऱ्या झटकल्या, आपले राजकीय कर्तव्य तो विसरला, एवढेच नव्हे तर अलेक्झांड्रियाच्या नेव्हर-नेव्हर (नको-नकोशा) भूमीवर पाय ठेवल्यापासून त्याचे राजकीय अस्तित्वच संपले असा ओरडा ऑक्टेव्हियसच्या समर्थक इतिहासकारांनी केला. अप्पियन म्हणतो, "क्लिओपात्रा भेटल्यापासून ॲन्थनीचा सार्वजनिक गोष्टींमधला रसच संपला." प्लुटार्कही म्हणतो की, "त्याने स्वत:ला या नवीन प्रेमपात्राच्या हवालीच करून टाकले होते. एखाद्या तरुणाने नवीनच प्रेमात पडल्यावर आपलं सारं भविष्य ज्याप्रमाणे आपल्या प्रेयसीच्या हाती सोपवावं

तशीच अवस्था ॲन्थनीची झाली होती.'' क्लिओपात्रा आणि ॲन्थनी स्वतंत्रपणे कितीही महत्त्वाकांक्षी आणि उत्साही कार्यकर्ते असले, राजकीय आणि सरकारी कामकाजात भाग घेत असले तरी या डायोनिशियन गटात सामील झाल्याने आपल्या सामाजिक जबाबदाऱ्या ते विसरलेच होते. अपोलोनियन रोमन या भूमिकेशी त्यांचे हे वागणं विसंगत होतं. त्याचा फायदा ऑक्टेव्हियसने उठवला आणि 'स्वत: 'अपोलोनियन रोमन' या भूमिकेचं उत्तम उदाहरण आहोत असं तो लोकांच्या मनावर ठसवू लागला. या साऱ्या विरोधांमुळे त्यांची गोष्ट आकर्षक बनली हेही खरेच ! अपोलोनियन लोकांचं सारं वागणंच सौम्य, नेमस्त आणि शिस्तशीर, प्रत्येक गोष्टीत संयमाचा वापर त्यांना करावा लागे. याउलट डायोनिशियन लोकांचं वागणं कसं उन्मुक्त पंथीयांचा जीवनाचा अंत अपोलोनियन पंथीयांना जरी भीतिदायक वाटत असला तरी त्यांना त्याचं आकर्षण होतंच.

या गोष्टीचं कथानक बदललं तरी पूर्ण नाहीसं झालं नाही वा लपवून ठेवलं गेलं नाही. एकदा हाती सत्ता आल्यावर ऑक्टेव्हियसने दोन हजार दस्तऐवज जाळून टाकले. या अग्निसत्रात आपल्या शत्रूंनी केलेला लिखित प्रचारात्मक भाग किंवा त्यांच्या गौरवपर कहाण्या तो जाळू शकला. पण या कहाण्यांनी मौखिक परंपरेनं लोकांच्या मनात स्थान मिळवलेलं होतंच. ते काही तो नष्ट करून शकला नाही. क्लिओपात्रा व ॲन्थनी यांना वैभवशाली, दीर्घ आयुष्य असावं अशी साहजिकच इच्छा होती आणि डायोनिसिसच्या शोकात्म, मृत्यूकल्पनेशी त्यांना हेतूत: साहचर्य नको होतं. पण ते आपोआपच प्रस्थापित झालं. .

क्लिओपात्राबद्दलच्या दंतकथा ॲन्थनीभोवती जशा घोटाळल्या तशाच त्या तिच्या मुलांभोवतीही घोटाळल्या. अलेक्झांड्रियाच्या देणगी समारंभात तिचं प्रचारतंत्र अधिक समृद्ध आणि सुधारित बनलं होतं. प्लुटार्कच्या म्हणण्याप्रमाणे या समारंभासाठी तिथल्या मोकळ्या मैदानावर फार मोठमोठी माणसं जमली होती. इसीससारखी वेषभूषा केलेली क्लिओपात्रा आणि ॲन्थनी सुवर्णसिंहासनांवर बसले हाते. ही सिंहासने चांदीच्या व्यासपीठावर उभारली होती. त्यांची मुलंही लहानलहान सिंहासनांवर बसलेली होती. ॲन्थनीने आपल्या मुलाला अलेक्झांडरला आर्मेनिया व मेडियाचा राजा म्हणून लोकांपुढे आणले. त्या नऊ वर्षांच्या मुलाने मेडियन राजासारखी वेषभूषा केली होती, राजमुकुट घातला होता. आणि त्याच्या शिरोभागी मोरपीस खोवलेलं होतं. हे दृश्य आणखी क्लिओपात्रापासून झालेला आपला धाकटा मुलगा 'टॉलेमी फिलाडेल्फस' यालादेखील जनतेसमोर आणलं. या मुलाचा दुसरा वाढदिवसदेखील साजरा व्हायचा होता. पण त्याने मॅसेडोनियन राजवेष धारण केला होता. बूट, पायघोळ छोटा अंगरखा आणि रुंद पट्टीची किनार असलेली हॅट व त्याभोवती मुकुटाच्या आकाराची पुष्पमाळ असा वेष त्याने परिधान केला होता. याच समारंभात क्लिओपात्राला 'राजांची राणी' ही पदवी देण्यात आली. त्यानंतर झालेल्या टॅब्लोत या

गोष्टीला भरपूर महत्त्व दिलं गेलं. तिच्या त्यादिवशीच्या वेषभूषेत, इसीसच्या रूपात ती खरोखरीच भूलोकीच्या मर्त्य सम्राटांची अमर्त्य, स्वर्गीय राणी वाटत होती. तिची मुलं खरी आणि नव्याने मांडलिक झालेली– तिच्या सिंहासनाच्या आजुबाजूला होती. या पृथ्वीवरील राज्यं आणि तिचं स्वर्गीय राज्य यामधील दरी दाखवणारंच ते प्रतीक होतं जणू ! त्या दृश्याकडे पाहून रेनेसान्स काळातील एखाद्या चित्राची सहज आठवण व्हावी. रेनेसान्स काळात मोठमोठे राजे आपापल्या महालांची, राजधानीची मॉडेल्स हाती घेऊन नवजात येशू खिस्ताला अर्पण करीत आहेत असं चित्र असे; म्हणजे आपली राज्यं येशूला दान दिल्याचं ते प्रतीक असे, तसंच काहीसं हे दृश्य दिसत होतं. क्लिओपात्रानं स्वत:कडे ही दैवी भूमिका घेताना जो उन्मत्तपणा दाखवला होता त्यामुळे रोमन लोकांना धक्का बसला होता. त्यांच्या भावना दुखावल्या गेल्या होत्या. पण तिचा हेतू मात्र त्यांच्यापर्यंत बरोबर पोहोचला होता.

या सर्व प्रसंगात, त्या दृश्याला आणखी वजन प्राप्त झाले. ते तिच्या मुलांच्या नावांमुळे! इ. स. पूर्व ३७च्या शरद ऋतूत ती जेव्हा पुन: अँन्थनीला भेटली, त्याचं मीलन झाल त्यावेळी आपल्या तीन वर्षांच्या जुळ्या मुलांना त्याने प्रथम ओळख दाखवली. त्याचबरोबर नवजात अशा दुसऱ्या मुलालाही त्याने ओळख दिली. त्याचवेळी या मुलांचा नामकरणविधी झाला. बहुतेक त्या जुळ्या मुलांना तेव्हा नवीन नावे ठेवली गेली. याचवेळी एशिया मायनर आणि फिनिशिया येथील भूभाग त्याने क्लिओपात्राला दिला. टॉलेमी वंशाचं जुनं राज्य परत मिळविण्यासाठी हा दीर्घ प्रवास तिला करावा लागला होता. इ. स. पूर्व तिसऱ्या शतकात टॉलेमी साम्राज्य विस्तृत आणि वैभवसंपन्न होतं आणि फिलाडेल्फस नावाचा दुसरा टॉलेमी हा त्या वंशातला आदर्श राजा म्हणून ओळखला जाई. त्याचेच नाव तिने आपल्या मुलाला दिले. हा लहानगा राजपुत्र त्या चिमुकल्या राजवेषात देखणा दिसत होता. मॅसेडोनियन राजासारखा जांभळा पायघोळ अंगरखा घातलेल्या त्या चिमुकल्याला हातात उंच धरून जनतेसमोर आणला गेला. त्या देणगी समारंभाला हजर असलेल्या सर्वांना त्या लहानग्याच्या पूर्वजांची आठवण तेव्हा नक्कीच आली असावी, आणि आता टॉलेमी घराण्याला, टॉलेमी राजसत्तेला पूर्वीचे वैभवाचे दिवस पुन: येणार अशी त्यांची खात्री पटली असावी; त्यामुळे त्यांनी जल्लोष केला.

आणखी एका अर्थाने, काहीसं मोघमपणे म्हणता येईल अशा अर्थाने या मुलांची नावं सूचक होती. इ. स. पूर्व ३७ साली ती नावं क्लिओपात्रा सिलेन– चंद्र या अर्थी आणि अलेक्झांडर हेलिऑस– सूर्य या अर्थी वापरली जाऊ लागली. मुलीचं नाव तसं पारंपरिक होतं. कारण तिची आई टॉलेमी घराण्याची सातवी राणी हिचं नाव 'क्लिओपात्रा' होतंच. या नावाचा साहित्यातील अर्थ होता– आपल्या वडिलांची कीर्ती– क्लिओपात्रा. ती मुलं तीन वर्षांची झाल्यावर या जुळ्या भावंडांचे पितृत्व जाहीरपणे मान्य केलं होतं. त्यामुळे या नावाला विशेष महत्त्व प्राप्त झालं. सेलेन म्हणजे चंद्र ! हेही तसं पारंपरिक, कौटुंबिक नाव

होतं. पण त्या नावाशी जोडले गेलेले संदर्भ विविध होते. जर छोटी क्लिओपात्रा सेलेन ही चंद्र– चंद्रदेवता असेल तर मग ती आपल्या आईप्रमाणे इसीस या चंद्रदेवतेची पृथ्वीवरील प्रतिनिधी ठरणार होती.

या अनेक गोष्टी सांकेतिक होत्या. अर्थात टॉलेमी घराण्यातील राजकन्येला त्या काही अपरिचित, नव्या नव्हत्या. सूर्यावरून नाव ठेवले जाणे हे टॉलेमी राजपुत्राबाबतीत नेहमीचंच होतं. कारण सर्व इजिप्शियन राजे हे 'रा' या सूर्यदेवतेचे वंशज आहेत असे मानले जाई. पण ज्यावेळी चंद्रदेवतारूपी राजकन्येच्या भावाचं नाव सूर्यदेवतेवरून ठेवलं जातं. तेव्हा त्याला अधिकच अर्थ प्राप्त होतो. कारण ग्रीक परंपरेप्रमाणे चंद्र आणि सूर्य ही जुळी भावंडं आहेत. आणि ती दोघं विजयातील भागीदार असतात. या सर्व गोष्टी अँन्थनीला शकुनाच्या वाटल्या कारण पर्थिया जिंकण्याची आपली महत्त्वाकांक्षा तो विसरला नव्हता. शिवाय पर्थियाच्या राजाची पदवी होती– 'चंद्र– सूर्याचा बांधव.' अलेक्झांड्राच्या देणगी प्रसंगी अँन्थनीने अलेक्झांडर हेलिऑसला युफ्रेटिस नदीच्या पूर्वेकडच्या, भारतापर्यंतच्या भागाचा राजा म्हणून घोषित केले. म्हणजेच पर्थियन साम्राज्याचा तो स्वामी झाला. यामुळे आपोआपच पर्थियन राजावर त्याची सत्ता झाल्यासारखं झालं. कारण सूर्याच्या भावावर सूर्याची स्वत:ची सत्ता असणार हेही उघडच होतं.

भूसंपादन करून सत्ता संपादन करण्याच्या लालसेपलीकडे या नावांमागे असणारं वलय वाढत जावं अशी त्यांची इच्छा होती. भूमध्य समुद्राकडून निघून सारं जग पादाक्रांत करण्याचं, पूर्वेवर राज्य करण्याचं ज्यांचं स्वप्न होतं अशांपुढे 'अलेक्झांडर द ग्रेट' हा एक आदर्श नमुना होता. याशिवाय त्याने लोकांपुढे जगाच्या एकीकरणाचं एक स्वप्न ठेवलं होतं. त्याच्या स्वप्नाप्रमाणे युरोप आणि आशिया शांततेनं एकत्र नांदतील, त्यामुळे पूर्व आणि पश्चिम दोन्ही बाजूंची राष्ट्रं संपन्न होतील, युद्धानंतरची शांतता सर्वत्र असेल, युद्धंच थांबतील आणि नवयुगाची, सुवर्णयुगाची पहाट अवतरेल. ते सूर्याचं युग असेल त्याचा स्वामी अर्थातच अलेक्झांडर असेल. तो अलेक्झांडर द ग्रेट असेल किंवा नाही, पण तो 'अलेक्झांडर' असेल. सर्वजण त्याचं प्रेमानं स्वागत करतील. कुणावरही जबरदस्ती केली जाणार नाही. अशा हसतमुख, प्रसन्न, भाग्यवान अलेक्झांडरचा वंशज अशा रूपात आपल्या मुलाची कल्पना करून अँन्थनी आणि क्लिओपात्रानं ते नाव ठेवलं होतं. – अलेक्झांडर हेलिऑस– सूर्यदेवतेचा अलेक्झांडर.

क्लिओपात्राच्या कारकीर्दीतदेखील जागतिक शांतीचं हे स्वप्न चर्चेत होतं. सिबिलियन बुक्समध्ये लोकांचं असमाधान व्यक्त होतं. त्यांच्या रागामधून, हे अनामिक प्रेषित म्हणजे ग्रीक बोलणारी, रोमची पौर्वात्य प्रजा. या स्वप्नाचं पुनरुच्चारण करताना दिसते. 'सूर्याचं जग'च्या ठिकाणी शोषक आणि शोषित हे एकत्र राज्य करतील. सुखाने नांदतील. —

साऱ्या आशिया खंडात शांतता प्रस्थापित होईल आणि युरोप सुखी होईल.



अनुक्रमणिका

दीर्घायुष्य देणारं, शक्तिवर्धक वातावरण, पौष्टिक अन्न आम्हाला मिळेल.

पृथ्वीवरचे पशुपक्षी आनंदात राहतील, वादळं येणार नाहीत.

या अशा काळाची वाट पाहाणाऱ्या स्त्री– पुरुषांना आशीर्वाद असोत.

ज्या शेतकऱ्यांनी कधी महाल पाहिले नाहीत, त्यांना महालामधील ऐश्वर्य पाहून जसं चकित व्हायला होतं. तसेच हे स्त्रीपुरुष अशा सुवर्णकाळाच्या दर्शनाने चकित होतील.

हे असं स्वप्नमय जग त्या सूर्याचं युग असेल. इ. स. पूर्व तिसऱ्या शतकात इयामब्यूलस नावाचा ग्रीक माणूस इथिओपियामध्ये गेला होता. तिथून तो 'सूर्याचं बेटं' नावाच्या द्वीपसमूहावर गेला होता. त्याचा हेतू होता. कम्युनिस्ट प्रणालीत वर्णिलेलं आदर्शराज्य पाहावं. त्या राज्याचं नाव होतं– सूर्यराज्य.

बोलीभाषा इजिप्शियनमधून ग्रीकमध्ये अनुवादित झालेलं, इ. स. पूर्व तिसऱ्या शतकातील एक भाकितकाव्य– 'द पॉटर्स ओरॅकल' म्हणून प्रसिद्ध आहे. या काव्यात वर्णन केलं आहे की, सूर्याकडून एक राजा येईल (पूर्वदिशेने तो राजा येईल) इसीस त्याला राज्यावर बसवेल, तो आपल्याला कल्याणप्रद अशा गोष्टी करेल आणि आपल्याला सुवर्णयुगाकडे नेईल. संपूर्ण युरोपभर वार्षिक सूर्यमहोत्सव साजरे केले जाते. असं म्हटलं जातं की, या सर्वांपैकी एक अतिशय उत्तम महोत्सव इ. स. पूर्व पहिल्या शतकाच्या २५ डिसेंबरला हा स्वर्गाच्या राजाचा पृथ्वीवरील जन्मदिन असल्याने चांगला दिवस ! इटलीमधील क्यूमाच्या सिबलनेदेखील असेच भविष्य वर्तवले होते की, 'एकदा सूर्यदेवतेचे राज्य स्थापन झाले की, सर्वत्र सुख नांदेल.' हे सारे संदर्भ म्हणजे लोकांच्या भिन्न भिन्न अपेक्षांची चित्रंच होती; तशीच त्यांच्या श्रद्धांची प्रतीकं होती. सूर्य काही केवळ उष्णता आणि प्रकाश देणारा देव नव्हता, तर भविष्याचा अधिष्ठाता देव होता, सार्वत्रिक आनंदाचा, समृद्धीचा, सहजतेचा तो देव होता.

राजकीय शोषणामुळे बहुधा अशी स्वप्नं निर्माण होतात. इस्त्रायलमधील मुलं बंदिवासात असताना दूध आणि मध देणाऱ्या गावाचं गाणं म्हणत. त्याप्रमाणे रोमच्या रयतेने सुखाची, अधिक चांगल्या राज्याची स्वप्नं पाहिली. अॅन्थनी आणि क्लिओपात्रा यांनी आपल्या प्रचाराद्वारे आणि प्रत्यक्ष धोरणांद्वारेही लोकांची स्वप्नं खरी ठरतील असं आश्वासन दिलं.

आशियाई सम्राटांकरवी अॅन्थनीनं आशियावर राज्य केलं. अॅमीन्तास, पॉलेमॉन, अर्चिलॉस, हेरॉड आणि क्लिओपात्रा हे त्याचे कधी सहकारी होते, कधी हाताखाली काम करणारे अधिकारी होते, कधी त्याचे मांडलिक होते. त्यांच्यामधलं नातं वेगवेगळं आणि लवचिक होतं. ज्यावेळी अॅन्थनीला आर्थिक, राजकीय वा सैन्याची मदत लागे. त्यावेळी ते त्याला ती मदत देत. पण त्याने आपली सत्ता ढळू दिली नाही. बहुतांश सैन्य त्याच्याच हाताखाली होते. असं असलं तरी त्याने त्यांच्या अंतर्गत व्यवहारात हस्तक्षेप केला नाही. रोमन गव्हर्नर्सच्या ताब्यात असणाऱ्या या काही रोमन वसाहती नव्हत्या. ती हेलेनिस्टिक





अनुक्रमणिका

आशियाई सम्राटांची राज्यं होती. ॲन्थनीचा वरचढपणा पाहता हा सूक्ष्म फरक जाणवत नसेलही, किंवा इतरांच्या लक्षात येत नसेल पण ॲन्थनी आणि क्लिओपात्रा यांनी ज्या जगाची आशा लोकांना दाखवली होती. त्याची झलक यातून नक्कीच दिसत होती. रोमन हेच चांगले सरकार देण्यासाठी योग्य लोक आहेत असं त्यांना कधीच वाटलं नाही. आपलं साम्राज्य जेव्हा अस्तित्वात येईल. तेव्हा ते परस्परावलंबी राज्यांचं गणराज्य असेल आणि केवळ पाश्चिमात्य असणं ही सतता किंवा प्रतिष्ठेची मिळवून देणारी बाब राहणार नाही असं त्या दोघांचं म्हणणं होतं.

चिमुकला अलेक्झांडर हेलिऑस हा आशियातील बहुतेक प्रदेशाचा स्वामी होणार असं नियतीनं ठरवलं होतं. आपल्या नावाप्रमाणे तो असेच समतोल धोरण ठेवील आणि सुवर्णयुग येईल असा विश्वास त्याच्या नावातूनच मिळत होता. ते राज्य कसं असेल याचं वर्णन करताना सिबिल म्हणतो, "ज्यावेळी गरिबी, गरजा, राग, द्वेष, मत्सर, बेकायदेशीरपणा, मूर्खपणा, संघर्ष, हिंसाचार आणि प्रत्येक वाईट गोष्ट या पृथ्वीतलावरून नाहीशी होईल, त्याऐवजी प्रेमाचं राज्य येईल, स्वर्गीय न्याय असेल आणि अपरिचितांबद्दल मैत्री वाटेल त्यावेळी सुवर्णयुग आलं असं मानता येईल."

अलेक्झांड्रियामध्ये ॲन्थनीसमवेत, त्याला आपला साथीदार बनवून क्लिओपात्रा ज्यावेळी गादीवर बसली, तेव्हा तिने एका नाट्यप्रसंगात या जागतिक बंधुत्वाची कल्पना मांडली. तो प्रसंग अर्थातच तिला केंद्र मानून रचलेला होता. आपला आयुष्यात, तिने दुसऱ्यांदा एका रोमन नेत्याची आपला सहचर म्हणून निवड केली होती. इजिप्तची राणी, राजांची राणी असणारी ती क्लिओपात्रा या सहचरामार्फत आणि त्याच्या जोडीने या नवीन, समेट झालेल्या जगावर राज्य करू इच्छित होती. पण तिचे स्वप्न हे स्वप्नच राहिले. क्लिओपात्राला या साऱ्याची जाणीव झाली होती की नाही याबद्दल आपण काहीच सांगू शकत नाही. शिवाय या स्वप्नाबद्दल ती खरोखरी कितपत उत्साही होती हेही आपणास ठाऊक नाही. परंतु सूर्यदेवतेच्या सुवर्णयुगाबद्दलची भाकितं तिला निश्चितपणे माहीत असावीत. आपल्या सर्वात मोठ्या मुलाचं नाव अलेक्झांडर हेलिऑस असं ठेवताना या गोष्टीचा संदर्भ तिच्या मनात असावा, व म्हणून तिने भविष्यातील आशेचं प्रतीक असं त्या मुलाचं रूप लोकांपुढे आणलं. यामुळे तिने आशियाई लोकांच्या विश्वासाला, कल्पना रम्यतेला हात घालून एक भावनात्मक आधार निर्माण केला. चांगल्या जीवनाचं एक तेजस्वीपण ढोबळ, मोघम असं चित्र तिनं त्यांच्यापुढे रंगवलं. त्या स्वप्नाचं स्पष्ट रूप आता दिसणं शक्य नाही. पण त्या स्वप्नातले आंतरराष्ट्रीय संबंध, त्यातील सहनशक्ती, त्यामधील विधायक सहकार्यावर दिलेला भर, स्पर्धात्मक युद्ध प्रवृत्तींचा निषेध, या सर्वांमुळे ते स्वप्न अधिक आकर्षक आणि आशयदृष्ट्या अधिक निर्माणक्षम वाटले असणार. त्यापुढे अनियाजच





अनुक्रमणिका

आपल्या जातीशी एकनिष्ठ असणारी, जुनीपुराणी, उदास वागणूक कुणाला आवडणार?

क्लिओपात्राचे समारंभ, तिच्या राजकारणातील नाट्यपूर्णता या सगळ्या गोष्टी शांतता-काळाला अनुकूल नव्हत्या. इ. स. पूर्व ३२ मध्ये ती आणि ॲन्थनी सामोच्या बेटांवर गेले. युद्ध नजीकच होतं. तिथे, पूर्वी अलेक्झांडर येऊन गेलेलाच होता. त्याने जसे केले तसेच या दोघांनी डायोनिशियन उत्सव तिथे केला. निमित्त सांगितले की, 'आपल्या मोहिमेला आशीर्वाद हवेत.' अर्थात मनात दुसरा हेतू होताच की, आपल्या दोस्तराष्ट्रांना आणि शत्रूंनाही आपल्या वैभवाने दिपवून टाकायचे. उत्सव फारच थाटामाटात साजरा झाला. रोमनांच्या दृष्टीने तिच्या दुराचरणाचा हा आणखी एक पुरावा होता. इतरांच्या दृष्टीने मात्र तो आपलं वर्चस्व सिद्ध करण्याचा, श्रीमंती दाखवण्याचा प्रयोग होता. ज्यामुळे तिच्याबद्दलचा आदर वाढला होता. प्लुटार्क लिहितो -

"सर्व नाट्यगृहे तुडुंब भरली होती. वाद्यवृंद एकमेकांशी स्पर्धा करीत होते. बळी देण्यासाठी प्रत्येक शहरातून एकेक बैल पाठवला गेला होता. ॲन्थनीच्या बरोबर असणारे राजे एकमेकांशी स्पर्धा करीत होते. आपल्याकडील करमणुकीचे, नजराणे इतर राजांपेक्षा चांगले असावेत यासाठी त्यांची स्पर्धा होती. शेवटी अशी कुजबूज सुरू झाली की, "युद्धाच्या तयारीच्या उत्सवासाठी हे लोक एवढा खर्च करतात. तर मग प्रत्यक्ष युद्धानंतर जेता म्हणून आपला विजय साजरा करण्यासाठी हे काय करतील?"

या प्रश्नाचं उत्तर अर्थातच तेव्हा कुणी दिलं नाही; पुढेही कुणी देऊ शकलं नाही, कारण साजरा करण्यासाठी तिला कधी विजयच मिळाला नाही. पण ॲक्टियम येथील पराभवानंतर ती पुन: समारंभाकडे आणि प्रदर्शनीय कार्यक्रमांकडे वळली. कारण त्यामुळे आपल्या हितचिंतकांचं, मित्रांचं नितीधैर्य उंचावेल असं तिला वाटलं. एकदा ॲन्थनी आपल्या नैराश्यातून बाहेर आल्यावर त्या दोघांनी शहरात मेजवान्या, ओल्या पार्ट्या, आणि भरपूर महागड्या भेटवस्तूंची उधळण अशी खैरात सुरू केली. मुलं वयात येतानाचे समारंभ त्यांनी साजरे केले. त्यात ॲन्थनीला आधीच्या बायकोपासून झालेला मुलगा ॲन्टिलस होता. तसेच क्लिओपात्राचा आधीचा - सीझरपासूनचा मुलगा सिझेरियन होता. सिडनस नदीवर झालेला समारंभ हा ॲन्थनीबरोबरच्या सहजीवनाची नांदी होती, अलेक्झांड्राच्या देणगी समारंभात ती दोघे कळसावर होती. पण या दोन्ही मुलांच्या वयात येण्याबद्दलचे समारंभ म्हणजे ज्योत विझण्यापूर्वीचे तळपणे होते. दोघेही पराभूत, मित्र उरलेले नाहीत, ऑक्टेव्हियसच्या दोस्त-राष्ट्रांनी वेढलेले असे ते दोघे होते. त्यांनी हा समारंभ ओढून ताणून साजरा केला. आपल्या सरत्या वैभवाची खूण म्हणून आपल्या सैन्याचं मनोधैर्य वाढावं म्हणून आणि जर आपले कुणी हितचिंतक असलेच तर त्यांना विश्वास वाटावा की, आपल्या मनातील तो उदात्त हेतू

अजून शिल्लक आहे. ग्रीक प्रथेप्रमाणे सिझेरियनला तरुण पुरुष नागरिकांच्या यादीत स्थान मिळाले. तो हेलेनिस्टिक राजांचा राजा होणार होता. उलट अ‍ॅन्टिलसचं तारुण्यातलं पदार्पण हे रोमन प्रथेप्रमाणे साजरं झालं. तो अ‍ॅन्थनीच्या इटालियन इस्टेटीचा वारस होणार होता. त्याला जांभळ्या रंगाची फ्रील असणारा शिरोमुकुट दिला गेला. याप्रकारे युरोप आणि आशिया यांच्या एकीकरणाचा व त्यावर राज्य करण्याचा क्लिओपात्राचा हेतू अगदी स्पष्ट दिसून आला. नेहमीप्रमाणे खूप खर्च करून, थाटामाटाने हा मुद्दा लोकांच्या लक्षात आणून देण्यासाठी स्मरणीय समारंभ केला गेला. यावेळी झालेले करमणुकीचे कार्यक्रम, मेजवान्या आणि दारूच्या पार्ट्यांमुळे शहरातील लोकांना खूप दिवस मोठा विषयच मिळाला होता.

पूर्वीप्रमाणेच आपल्याबरोबर मद्यप्राशनात सहभागी होणाऱ्यांचं त्यांनी एक मंडळ स्थापलं. त्याला नाव दिलं– मृत्यूप्रसंगीही अढळ राहणारी मैत्री वा अशांचं मंडळ. (मृत्यूप्रसंगीही एकमेकांना न सोडून जाणाऱ्यांचं मंडळ). मंडळाचं नाव जरी मोठं तात्त्विक असलं तरी या सगळ्या दुर्दैवी परिस्थितीला गोंडस रूप देण्याचा तो केविलवाणा प्रयत्न होता. गबाळेपणा, गचाळपणा, उद्विग्नता ही सारी पराभवाची लक्षणं असतात. क्लिओपात्राजवळ या साऱ्या गोष्टी जमा होत होत्या. आपल्या मदतनीसांचा धीर टिकून राहावा म्हणून ती अशा प्रकारे थातुरमातुर पण स्टायलीश गोष्टी करीत होती. अ‍ॅन्थनीचा वाढदिवस तिने अशीच उधळपट्टी करून साजरा केला. असं म्हणतात की, त्या मेजवानीला आलेले भिकारी श्रीमंत होऊन परत गेले.

वस्तुस्थितीला हवा तसा आकार देण्यात, ती सजवण्यात क्लिओपात्रा चतुर होती. कधी कधी ती आणि अ‍ॅन्थनी वस्तुस्थितीचं इतकं निराळं वर्णन करीत, अतिशयोक्ती करीत की, ते खोटंच वाटे. पर्थियातील त्याच्या पराभवाच्या वेळी अ‍ॅन्थनी रोमला जे वृत्तांत पाठवी ते इतके असत्य होते की, त्यात त्याने आपण फार मोठा विजय संपादला आहे. इथपर्यंत वर्णन केले होते. ऑक्टेव्हियस दुसऱ्या कुणाकडून स्वतंत्र वृत्तांत मागवी आणि अ‍ॅन्थनीचा खोटेपणा त्यांच्या लक्षात येई. पण आपण अ‍ॅन्थनीच्या वृत्तांतावरच विश्वास ठेवला आहे असे तो भासवे. त्याच्या दृष्टीने सत्य काय यापेक्षा धोरण कसे असावे याला महत्त्व होते; आणि त्यावेळी तरी अ‍ॅन्थनीला उघडपणे आव्हान देण्याचे धैर्य त्याच्याजवळ नव्हते. ॲक्टियमच्या पराभवानंतर क्लिओपात्रानेसुद्धा स्वत:चे वर्णन असेच करवून घेतले की,'विजय मिळवल्याप्रमाणे पुष्प–मंडित होऊन तिची नौका अलेक्झांड्रियाकडे निघाली. बासरीवादकांबरोबरीने इतरही तिच्या विजयाची गाणी गात होते.''

क्लिओपात्राने आपले आत्मचरित्र पुन:पुन: लिहिले. ज्यावेळी मृत्यू दाराशी होता. तेव्हा सुद्धा तिचा शांतपणा आणि तिचे चातुर्य, प्रदर्शनाची हौस तशीच कायम होती. आपल्या मृत्यूचेदेखील तिने असेच स्मरणीय प्रदर्शन केले.

---



अनुक्रमणिका

# नोंदवही

## तळटीप

इतिहास, तत्त्वज्ञान, वैचारिक वाङ्‌मय इत्यादी विषयावर अनेक विद्वान आणि विचारवंतानी आजपर्यंत विपुल लेखन केले आहे. आपल्या विषयाबद्दलचे गहन विचार मांडताना किंवा तात्त्विक चर्चा करताना त्या लेखानाच्या समर्थनार्थ टीपा देण्याची पद्धत रूढ झाली. आपल्या लेखनात वापरलेल्या एखाद्या संदर्भाविषयी अधिक माहिती द्यावयाची असल्यास त्या शब्दाच्या डोक्यावर उजव्या बाजूस चांदणी काढून अथवा एक, दोन, तीन असे क्रमांक घालून त्या पानाच्या तळाशी त्या शब्दाविषयाची टीप देण्याचा पायंडा पडला. अशा तळटीपांविषयीची ही नोंद एकही तळटीप न देता लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

भारतावर इंग्रजांचे राज्य आले आणि त्याचबरोबर जेत्यांची संस्कृती चोरपावलांनी शिरली. संस्कृतीबरोबर जेत्यांची भाषाही भारतीय समाजमनावर अम्मल गाजवू लागली. इंग्रजी भाषेतील ज्ञान विज्ञान, गद्यपद्यरचनांचा अभ्यास भारतीय विद्वान करू लागले आणि कळत नकळत इंग्रजीतील साहित्य प्रकारांची छाया मराठी साहित्यात आढळू लागली. साहित्याचे तर सोडाच पण विरामचिन्हे सुद्धा आपण इंग्रजी भाषेकडून घेतली. याविषयी इतिहासाचार्य वि. का. राजवाड्यांनी मूळ संशोधन करून 'शुद्धलेखन व विरामचिन्हे' या शीर्षकाचा लेख लिहिला होता.

इतिहासाचार्यांच्या मते कारकून, बखरकार वगैरे फर्डे लेखक मोडीत लिहित आणि कोणतीही चिन्हे न वापरता एक बाब संपली म्हणजे नवीन एकाना सुरू करीत; पण त्या प्राचीन लेखनात कुठेही तळटीपा आढळत नसत. म्हणजेच विरामचिन्हांप्रमाणे तळटीपासुद्धा इंग्रजीतून मराठीत आल्या आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात अनेक उच्चशिक्षित मराठी भाषिकांनी इंग्रजी भाषेवर प्रभुत्त्व मिळवले आणि विविध विषयांवरील इंग्रजीमधील पांडित्यपूर्ण ग्रंथ अभ्यासले. एखाद्या विषयाबद्दलची अधिक माहिती अथवा अवतरणांबद्दलचे संदर्भ देण्यासाठी इंग्रजी ग्रंथात तळटीपा देण्याची प्रथा रूढ होती. तळटीपांमुळे विषयाची सखोल व तंतोतंत माहिती वाचकाना होते. तसेच ग्रंथकाराच्या पांडित्याची झलक या तळटीपांमध्ये बघावयास मिळते. तळटीपांमुळे होणारे हे फायदे लक्षात घेऊन मराठी ग्रंथकारानीही तळटीपा देण्यास सुरुवात केली. अनेक विद्वत्ताप्रचुर ग्रंथात पानागणिक तळटीपा



अनुक्रमणिका

वाचावयास मिळतात. उदा. आचार्य जावडेकरांच्या 'आधुनिक भारत' या ग्रंथात अनेक पांडित्यपूर्ण तळटीपांचा समावेश आहे.

तळटीपांमध्ये एखाद्या संदर्भाची माहिती ग्रंथाच्या आधीच्या पानात आलेली असल्यास पुनरावृत्ती टाळण्यासाठी इंग्रजी वाङ्मयात इबिड Ibid हा शब्द वापरतात. एखाद्या शब्दाच्या वरच्या बाजूस इबिड असे लिहिले असेल तर "त्या शब्दाचा संदर्भ पूर्वीच्या लेखनात आला असून त्या शब्दाचे तेच स्पष्टीकरण येथेही घ्यावे" असा अर्थ त्यात अंतर्भूत असतो. मुळात इबिड हा शब्द Ibidem इबिडेम या लॅटिन शब्दाचा अपभ्रंश होऊन तयार झाला आहे. इबी ibi म्हणजे तेथे आणि डेम dem म्हणजे त्याच परिच्छेदात, प्रकरणात पुस्तकात इ. 'इबिड' या शब्दाचा हा अर्थ माहित नसलेल्या अनेकांना 'इबिड' हे कोणा इंग्रजी साहेबाचे नाव आहे असे वाटे.

मराठी ग्रंथकारानी तळटीपा देण्याची प्रथा इंग्रजी ग्रंथावरून घेतली. परंतु मूळ इंग्रजी भाषेत या तळटीपांबद्दल भरपूर विचारमंथन झाले. तळटीपांच्या समर्थनार्थ आणि विरोधात अनेक विधाने केली गेली. या विचारमंथनाचा दृश्य परिणाम म्हणजे उत्तम ग्रंथातून तळटीपांचे झालेले उच्चाटन. अलिकडच्या इंग्रजी वाङ्मयात काही ग्रंथात तळटीपा अजिबात घालत नाहीत किंवा काही ग्रंथात त्या पुस्तकाच्या शेवटी देतात. अशा तऱ्हेचे विचारमंथन मराठी वाङ्मयात झालेले आढळत नाही. मराठी भाषिक विद्वान आणि विचारवंतात तळटीपांविषयी असे चर्चासत्र घडून आलेले ऐकीवात नाही. पण विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील मराठी साहित्यात तळटीपांचा लोप झाला आहे एवढे मात्र खरे ! म्हणून इंग्रजी भाषेत झालेल्या तळटीपांविषयीच्या चर्चेचा साद्यंत वृत्तांत मराठी वाचकांना समजावा या दृष्टिने ही नोंद तयार केली आहे.

पहिली तळटीप कोणी लिहिली हे कोणालाच माहित नाही. परंतु सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात फ्रेंच विद्वतजनानी देकार्तच्या लेखनाला आव्हान करण्यासाठी शस्त्र म्हणून या तळटीपांचा वापर केला. तेव्हापासून तळटीपा लिहिण्याची प्रथा रूढ झाली. ज्ञान मिळवण्याच्या पद्धतीबद्दल देकार्तने आपले विचार मांडले आहेत. "तर्काला धरून युक्तीवाद केल्यामुळे व्यक्तीला जगाबद्दलचे ज्ञान होते. भूतकाळाच्या अभ्यासाने नव्हे" असे देकार्तचे म्हणणे होते. तर रूसोच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणारे बुद्धिमान विचारवंत रूसोने लिहिलेल्या टीपांच्या वाचनात व्यस्त असतात. रूसोच्या लेखात अथवा पुस्तकात न सापडणारा गूढार्थ त्यांना त्याच्या टीपांमध्ये आढळतो. म्हणूनच बुद्धिवंत या टीपांकडे उपेक्षित दृष्टीने पाहात नाहीत. उलट त्या टीपा अधिक काळजीपूर्वक लक्ष देऊन आणि गांभीर्याने



अनुक्रमणिका

वाचल्या पाहिजेत असाच रूसोच्या सूचनेचा अन्वयार्थ ते लावतात. पण केवळ शब्दार्थ घेणारे महाभाग रूसोच्या विचारांची ढाल पुढे करून या प्रथेचे समर्थनच करतील. प्रत्यक्ष पुस्तकात एक गोष्ट लिहावयाची आणि टीपेमध्ये दुसराच मुद्दा घालायला अशा गोष्टी तत्त्वज्ञ सहजपणे करतात. परंतु विद्वत्‌जनांनी गर्विष्ठ होऊन विद्वतेचे फाजिल प्रदर्शन करण्यासाठी या तळटीपांचा वापर केल्यामुळे तळटीपांचे अवमूल्यन झाले आहे. तळटीपाना पूर्वी जे आदरणीय स्थान होते; ते नाहीसे झाले आहे. तळटीपांभोवतीचे विद्वतेचे वलय जाऊन त्याना अगदी सामान्य स्वरूप आले आहे.

एडवर्ड गिब्बन हा अठराव्या शतकातील ब्रिटिश इतिहासकार. विद्वत्‌जनांनी एडवर्डला 'तळटीपांचा शेक्सपिअर' असा किताब बहाल केला होता. 'डिक्लाईन अँड फॉल ऑफ दि रोमन एम्पायर' ('रोमन साम्राज्याचा ऱ्हास') या ग्रंथात विचित्र आणि चातुर्यपूर्ण अशा भरपूर तळटीपा आहेत. 'तळटीपा या विद्वत्ताप्रचुर असतात' या विचाराला अपवादात्मक ठरणाऱ्या काही टीपा गिब्बनने लिहिल्या आहेत. वानगीदाखल एक तळटीप पुढे देत आहे. "आपली पत्नी फॅस्टीना आपल्याशी अप्रामाणिक आहे हे माहित नसलेली संपूर्ण राज्यातील एकमेव व्यक्ती म्हणजे राजा आर्कस ऑरेलियस !" राज्यकर्त्यांची खिल्ली उडवताना उपहासगर्भ विधाने करण्यासाठीसुद्धा काही वेळा एडवर्ड गिब्बनने तळटीपांचे साहय घेतलेले आढळते.

विश्वविद्यालयीन नियतकालिकांवर अजूनही विद्वत्‌जनांची पकड कायम आहे. हे विद्वत्‌जन आपल्या लेखनाचे स्पष्टीकरण देण्यासाठी आणि त्या ज्ञानाचा स्त्रोत कोणता हे सांगण्यासाठी (किंवा त्यांच्या पांडित्याची शेखी मिरवण्यासाठी) तळटीपांचा वापर करतात. संशोधनात्मक प्रबंध लिहिण्याचे तंत्र विद्यार्थ्यांना आजही शिकवले जाते. प्रिन्स्टन विद्यापीठातील सुप्रसिद्ध इतिहासकार अँथनी ग्रॅफ्टन यांचे एक पुस्तक जर्मनीमध्ये १९९६ साली प्रसिद्ध झाल विश्वविद्यालयाने इ. स. १८६० साली केलेल्या संशोधनानुसार प्राप्त झालेले निष्कर्ष या पुस्तकात नोंदवले आहेत; ते असे :– "तळटीपांमुळे विद्वतेला नैतिक अधिकार प्राप्त होतात आणि लेखकाच्या विचारांवर जर कोणी आक्षेप घेतले तर तळटीपांमधील स्पष्टीकरणामुळे लेखकाला या आक्षेपांना तोंड देता येते."

जर्ट्रुड हिम्मलफार्ब यानी लिहिलेल्या ज्या निबंधाचा वर निर्देश केला आहे, तोच निबंध वाचल्यामुळे अँथनी ग्रॅफ्टन याना स्फूर्ती झाली आणि त्यानी 'दि ट्रॅजिक ऑफ जर्मन फूटनोट' ('जर्मन तळटीपांचा शोकदायक उगम') हे पुस्तक लिहिले. हार्वर्ड विश्वविद्यालयातर्फे १९९७ साली ते प्रकाशित झाले. या पुस्तकामुळे तळटीपांच्या विविध मुद्यांची अधिकाधिक चर्चा झाली. याच ग्रॅफटन महाशयानी सर्वात मोठ्या तळटीपेचा शोध घेतला. जॉन हॉजसन



अनुक्रमणिका

यानी इ. स. १८०४ साली 'दि हिस्टरी ऑफ नॉर्दम्बरलॅंड' हा ग्रंथ प्रकाशित केला. या ग्रंथातील एक तळटीप १६५ पानांची होती. हीच साहित्यातील सर्वात मोठी तळटीप !

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस युरोपमधील विद्वानांच्या वर्तुळात तळटीपाना मान्यता तर मिळालीच. पण 'उत्तमोत्तम ग्रंथात तळटीपा असणे अनिवार्य आहे' हा विचारही रुजला. Ulrich Von Wilamowitz Moellendorff (उलरिक फॉन विलामोविट्झ म्युलेंडॉर्फ) हे जर्मन विद्वान ! ग्रीक सांस्कृतिक इतिहासावरील एक ग्रंथ स्विस भाषेत प्रकाशित झाला. हा ग्रंथ अतिशय विद्वत्ताप्रचुर होता. तरीसुद्धा "त्या ग्रंथात तळटीपा नाहीत" या एकमेव कारणासाठी म्युलेंडॉर्फ यानी तो ग्रंथ शास्त्रीय दृष्ट्या निरुपयोगी ठरवला आणि त्या विद्वत्ताप्रचुर ग्रंथाचा जोरदार निषेध केला.

एखाद्या ग्रंथात सुप्रसिद्ध लेखकांची अवतरणे नसणे किंवा तळटीपा नसणे ही त्या ग्रंथाच्या दृष्टीने दुर्दैवाची गोष्ट मानली जाऊ लागली. १९२० ते ३० या दशकात कार्ल सॅंडबर्ग यानी अनेक खंडात लिहिलेले अब्राहम लिंकन याचे चरित्र प्रकाशित केले. या ग्रंथात कोणत्याही लेखकाची अवतरणे उद्धृत केली नव्हती. तसेच सॅंडबर्गनी संपूर्ण चरित्रात एकही तळटीप दिली नव्हती. "जॉन बून या माथेफिरूने झाडलेल्या गोळ्यांमुळे मृत्यू येणे हा लिंकनच्या आयुष्यातील भयंकर आघात नव्हता, तर सॅंडबर्गच्या लेखनाचा विषय होणे हाच लिंकनचा नाश घडवणारा प्रहार होता." असे मत ते चरित्र वाचून संतप्त झालेल्या एका तरुण टीकाकाराने व्यक्त केले होते. त्याच्या मते अमेरिकन राष्ट्राध्यक्षांच्या विद्वत्तापूर्ण चरित्रात तळटीपा नसणे हा जणु काही भयंकर गुन्हा होता.

हळूहळू विद्वत्ताप्रचुर लेखनाची शैली बदलू लागली. या बदलाला सामोरे जाताना ज्येष्ठ विद्वानानी तळटीपांच्या बंधनातून आपली सुटका करून घेतली. पण अजूनही तळटीपांच्या आवश्यकतेचा मनावरील पगडा पूर्णपणे नाहीसा झाला नव्हता. त्यामुळे तरुण लेखकानी तळटीपा दिल्या नाहीत तर तो त्यांचा उद्धटपणा मानला जाऊ लागला.

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात म्हणजे विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात विद्वानांनी आपल्या लेखनात अवतरणे उद्धृत करणे सोडून दिले. एफ. एम्. एन्. थॉमसन यानी १९८८ साली 'व्हिक्टोरियाकालीन ब्रिटनचा इतिहास' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथात मोठमोठ्या लेखकांची अवतरणे तळटीपामध्ये न देण्याचे पथ्य सांभाळले आहे. असे करण्यामागचा हेतू थॉम्सन यांनी आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत व्यक्त केला आहे. मधेमधे अवतरणे आणि तळटीपा नसल्यामुळे एखाद्या विषयाची मांडणी अत्यंत प्रवाहीपणे करता येते असे त्यांचे मत आहे. ठिकठिकाणी निर्देश करून तळटीपा बघावयास लावणे, स्पष्टीकरण देणे किंवा

विषयाची मर्यादा समजावून सांगणे या गोष्टी काही वाचकाना अडथळ्यासारख्या वाटतात तर काही वाचकाना असे करणे निरर्थक आणि अनावश्यक वाटते.

अनेक पुस्तकात तळटीपा स्थानभ्रष्ट होऊन पुस्तकाच्या शेवटी टाकल्या गेल्या. प्रकाशकानीं आर्थिक कारणाकरीता तळटीपा पुस्तकाच्या अखेरीस देण्याची प्रथा रूढ केली. आपले लेखन वाचनाभिमुख व्हावे आणि ते अधिक लोकांपर्यंत पोचावे म्हणून विद्वतेचे प्रदर्शन करणारी ही तळटीपांची साधनसामुग्री लपविताना लेखकानी कोणतीही हरकत घेतली नाही. सामान्य वाचक पुस्तकातील छोट्या चांदण्या व आकडे आणि बारीक अक्षरातील तळटीपांकडे नेहमीच दुर्लक्ष करीत. तळटीपा पुस्तकाच्या शेवटी छापल्यामुळे या वाचकांच्या दृष्टीने फारसे नुकसान झाले नाही. याउलट विद्वत्‌जनांना मात्र तळटीपा वाचायला आवडतात. काही विद्वान मंडळी तर फक्त बुद्धीला उत्तेजक ठरणाऱ्या तळटीपाच वाचतात. तळटीपा पुस्तकाच्या शेवटी घातल्यामुळे अशा वाचकांची गैरसोय झाली. या टीपा जेव्हा त्याच पानाच्या तळाशी असत तेव्हा पुस्तकात लिहिलेले अवतरण कोणत्या मूळ ग्रंथातून घेतले आहे हे पाहाण्यासाठी विद्वानांच्या नजरा पृष्ठाच्या तळाकडे वळत असत आणि संदर्भ बघितल्याबरोबर पुन्हा एकदा नजर वर करून मूळ विषय वाचण्यात हे विद्वत्‌जन गढून जात. तळटीपा पुस्तकाच्या शेवटी आल्यामुळे अशा वाचकांना मागील पाने उलटून त्या विभागाचा क्रमांक पाहावा लागतो व नंतर पुस्तकाची पुढची पाने उलटून त्या विभागाच्या टीपामधून आपल्याला हवी असलेली टीप वाचावी लागते. हा सोपस्कार पार पडल्यावर पुन्हा एकदा पुस्तकातील मूळ वाचनाचे पान शोधून आपला अभ्यास चालू करावा लागतो. म्हणजेच वाचताना अशा वाचकाला सोयीसाठी पुस्तकात घालावयाच्या दोन खुणा घालाव्या लागतात. तळटीपांची पुस्तकातील जागा बदलल्यामुळे सतत पानांची ही अशी उलटापालट करावी लागते.

तळटीपांची पुस्तकातील जागा बदलल्यामुळे होणारी ही गैरसोय कमीत कमी त्रासदायक आहे. पण तळटीपांच्या स्थानभ्रष्टतेचा लेखकावर होणारा परिणाम अधिक गंभीर स्वरूपाचा आहे. तळटीपा पुस्तकाच्या शेवटी टाकल्यामुळे लेखक चांगलाच निरुत्साही होतो. या निरुत्साहतेचा दृश्य परिणाम म्हणजे अवतरणांकडे बघण्याची लेखकाची दृष्टी जुजबी होते. मूळ लेखातील अवतरण कोणत्या लेखकाचे आहे. ते कोणत्या ग्रंथातील आहे त्या ग्रंथाचे नाव. प्रकाशकाचे नाव व पत्ता, प्रकाशनाची तारीख, तो त्या ग्रंथाचा कितवा भाग आहे त्याचा आकडा इत्यादी माहिती बरोबर आहे की नाही हे पाहताना लेखक निष्काळजीपणा करण्याचा धोका संभवतो. अनुक्रम, विरामचिन्हे यासारख्या अनेक बाबतीत समर्पकतेला



अनुक्रमणिका

तिलांजली दिल्यामुळे बिनचूक आणि यथार्थ माहिती देण्याच्या बाबतीत दुर्लक्ष करण्याकडे लेखकाचा कल असतो. पृष्ठाच्या तळापेक्षा पुस्तकाच्या शेवटी सदोष किंवा अपूर्ण अवतरणे देणे सोपे असते. पुस्तकातील विषयाशी सुसंगत असे एखादेच अवतरण देण्याऐवजी डझनभर अवतरणांची मालिका सादर करून आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करण्यास वाव असतो.

पुस्तक प्रकाशनाच्या व्यवसायात बदल घडून आल्यामुळे तळटीपांचे महत्त्व उतरणीला लागण्याची प्रक्रिया वेगाने घडून आली असे विद्वत्‌जन विश्वविद्यालयीन व अन्य प्रकाशक या सर्वांचे मत आहे. १९८१ ते ९० हे दशक युरोप अमेरिकेतील प्रकाशनव्यावसायिकांच्या दृष्टीने कलाटणी देणारे ठरले. या दशकात विश्वविद्यालयीन नियतकालिकांच्या वर्गणी शुल्कात अचानक खूप वाढ झाली. कित्येक नियतकालिकांची वार्षिक वर्गणी एक हजार डॉलरपेक्षा जास्त होती. परिणामत: जगभरातल्या ग्रंथालयांच्या ग्रंथार्जन अर्थसंकल्पात फक्त नियतकालिकेच घेता येऊ लागली. पुस्तके खरेदी करण्यासाठी फारच थोडा निधी उपलब्ध होऊ लागला. जवळपास त्याच सुमारास ख्यातनाम पुस्तकविक्रेत्यांनी एकत्र येऊन विविध विषयावरील भरपूर पुस्तके वाचकाना उपलब्ध करून दिली. अर्थात् मनपसंद पुस्तकांची निवड करण्यास ग्राहकांना भरपूर वाव मिळाला. पुस्तकविक्रीच्या या स्पर्धेत टिकाव धरण्यासाठी विश्वविद्यालयीन प्रकाशकानी आपले धोरण बदलले. त्यानी प्रत्येक पुस्तकाला लक्षवेधी शीर्षक, आकर्षक मुखपृष्ठ, पुस्तकातील मुद्यांच्या स्पष्टीकरणासाठी उत्तम व मुबलक चित्रे, आकृत्या देण्यास सुरुवात केली. त्याचबरोबर पुस्तकातील प्रत्येक पानाची काही जागा व्यापणाऱ्या आणि सर्वसामान्य वाचकाना किचकट वाटणाऱ्या तळटीपाच या प्रकाशकांनी काढून टाकल्या.

हार्वर्ड विश्वविद्यालयीन प्रकाशिका श्रीमती जेनीफर स्नॉडग्रेस यांच्या मतानुसार त्यांचे बहुतांश लेखक सर्वसामान्य वाचक डोळ्यापुढे ठेवून लिहित असतात. सर्वसामान्य माणसे तळटीपांमुळे भिऊन पुस्तकापासून दूर जातात असे मत हार्वर्ड विश्वविद्यालयाच्या बाजारसर्वेक्षण खात्याने व्यक्त केले आहे.

मिशिगन विश्वविद्यालयातील प्रकाशक कॉलिन डे यांच्या म्हणण्याप्रमाणे पुस्तक नीटनेटके करण्यासाठी प्रकाशक खूप मेहनत घेतात. छापण्याकरता आलेला मजकूर डे आणि त्यांचे सहकारी वाचतात. विद्वत्‌जनांचे हे लेखन अधिकाधिक परिणामकारक करण्यासाठी आणि जास्तीतजास्त वाचकवर्गाच्या दृष्टीने ते वेधक करण्यासाठी काय करावे असा विचार ते सातत्याने करतात. अशा विचारपद्धतीमुळे विद्वानांच्या लेखनातील तळटीपाना कात्री लावावी लागते.

फ्रँक सुलिव्हॅन हे मागच्या शतकातील विनोदी लेखक. पांडित्यपूर्ण लेखनावर विडंबनात्मक भाष्य करताना फ्रँक सुलिव्हॅन यानी म्हटलं होतं. "या पांडित्यपूर्ण विद्वत्ताप्रचुर लिखाणाला एक इंचाची तळटीप द्या. म्हणजे ते लेखन विद्वानांचे लक्ष वेधून घेईल. "अर्थात् या उपरोधिक वक्तव्यामुळे विद्यापीठीय सदस्य मात्र सुलिव्हॅन यांच्यावर नाराज झाले.

सुप्रसिद्ध इतिहासकार आणि ग्रंथपाल डॅनियल बूर्स्टीन म्हणतात. "माझ्या लेखनात मी तळटीपांचा वापर अजिबात करत नाही. तळटीपा देऊन इतर इतिहासकारांची मते वाचकांवर लादण्यापेक्षा माझी मतं जाणून घेण्यासाठी वाचकांनी माझी पुस्तकं वाचावीत असं मला वाटतं"

स्टॅनफोर्ड विश्वविद्यालयातील इतिहासाचे सुप्रसिद्ध प्राध्यापक गॉर्डन क्रेग यांचे लेखन अनेक ठिकाणी प्रसिद्ध झाले आहे. ते सुद्धा सुलिव्हॅन यांच्या मताशी सहमत आहेत. ते म्हणतात, "माझ्या प्रारंभीच्या लेखनात अनेक तळटीपा देऊन मी त्या लेखनाला जणू गुदमरवून टाकत असे. त्यानंतर मी अनेक पुस्तके लिहिली. त्यात मी तळटीपांचा वापर अजिबात केला नाही. उत्तम अभिरुची असलेल्या सर्वसामान्य वाचकाकरता मी लिहित असतो. त्यांना तळटीपांमधील विद्वत्तापूर्ण ज्ञानामध्ये आणि जडबंबाळ शब्दच्छलामध्ये अजिबात रस नसतो असं माझं निरीक्षण आहे.

अर्वाचीन भाषा संस्थेतर्फे प्रकाशित होणाऱ्या नियतकालिकाच्या संपादिका आहेत डॉग्मा स्टॅटन. त्या म्हणतात, "आत्मचरित्रात्मक निबंध लिहिण्याची नवीन शैली विश्वविद्यालयात अलिकडे इतकी प्रचारात आहे की आमचा एक संपूर्ण अंकच आत्मचरित्र या विषयाला वाहिलेला आहे. अशा लेखनात विद्वत्तापूर्ण अवतरणांचा जवळजवळ अभावच असतो."

तळटीपा देऊ नये अशा मताचा पुरस्कार करणारी अनेक मंडळी. आहेत उत्तरोत्तर अशा मंडळींची संख्या भराभर वाढत आहे. तळटीपांचा उद्देश साध्य करणारे तळटीपांचे रुपांतरण एकविसाव्या शतकातील साहित्यात आकार घेईलही कदाचित, पण ते काळच ठरवील!

**– सुमती जोशी**

---



अनुक्रमणिका

**फ्रांझ काफ्का**
**(१८८३-१९२४)**

**जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा**
**जर्मन कथा-कादंबरीकार.**

**विसाव्या शतकातील**
**या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा**
**मराठीमधील पहिला ग्रंथ**

# थोडाबहुत काफ्का

**शकु नी. कनयाळकर**

**१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.**
**'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.**

चरित्रपट, वाङ्मयसूची इ.आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

**मूळ किंमत रु. २००**
**'नवी क्षितिजे' च्या वर्गणीदारांना सवलतीची किंमत रु. १२०**

त्वरित संपर्क साधा

**नाना जोशी**
**४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०० ०१२**

अनुक्रमणिका

